न माधवसमो देवो न च मध्वसमो गुरुः।
न च द्वैतसमं शास्त्रं न च तत्सदृशः पुमान् ॥

श्रीमन्
# मध्वाचार्य व त्यांचें तत्त्वज्ञान



—: लेखक :—
रा. बा. अवधानी

शाके १८७१



किंमत ] [ पांच रुपये

# अनुक्रमणिका



## तत्त्वज्ञान विभाग





## चित्रसूचि



## शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | १३ | शके ११३१ | शके ११२१ |
| १२७ | २१ | अनुमान पंचावयवी असावें. | अनुमानास पंचावयवांची जरूरी नाहीं. |

# वै. बाळाचार्य प्रल्हादाचार्य अवधानी



जन्म इ. स १८७८ मृत्यु इ स. १९१८

## अर्पणपत्रिका

ज्यांच्या आशीर्वादानें या इह लोकांत मी सुखसमाधानानें काळ घालवीत आहें त्या परमपूज्य पितृचरणीं ही प्रथम कृति समर्पण करीत आहें.

# हकीकत



श्रीहरिगुरुकृपेनें सदर मध्वाचार्यांचें चरित्र व तत्त्वज्ञान विषयक पुस्तक वाचकांचे सेवेस सादर करतांना मनास अत्यंत आनंद होत आहे. ह्यांत जरी पुष्कळसें न्यून असलें तरी वाचक त्याचा प्रेमानें पुरस्कार करतील अशी खात्री असल्यामुळें सदर पुस्तक वाचकांस सादर करण्याचें धैर्य करीत आहें.

हें पुस्तक लिहितांना व लिहिल्यावर अनेकांची मजला मदत झाली आहे. म. शा. सं. न्याय–वेदांत–विद्वान् एम्. आर. गोपालाचार्य, चालक वाणीविहारविद्यालय, मुंबई, यांनीं या पुस्तकांतील तत्त्वज्ञानविभागांपैकीं कांहीं भाग वाचला व त्यांत सुधारणा सुचविल्या.

विद्याभूषण बाळाचार्य खुपेरकर कोल्हापूर, यांनीं यांतील कांहीं भाग वाचून पाहिला, व सूचना केल्या. म. शा. सं. कृष्णाचार्य वर्खेडकर पुणें यांनीं सर्व तत्त्वविभाग वाचून त्यांत मार्गदर्शन केलेलें आहे.

या आचार्यांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून अनेक सूचना केल्या याविषयीं त्यांचे अत्यंत मनःपूर्वक आभार मानतों.

या पुस्तकाचें प्रकाशनाचे कामीं मदत म्हणून श्रीमती राणी पद्मावती बाईसाहेब देशमुख, संजीवनपेठकर यांनीं शंभर रुपये देणगीदाखल दिले याविषयीं त्यांचे आभार मानतों.

पुस्तक मूळ हस्तलिखिताप्रमाणें छापावयाचें ठरलें असतें तर चारशें तरी पृष्ठसंख्या झाली असती. म्हणून त्यांतील पुष्कळसा भाग गाळावा लागला. त्यामुळें कांहीं ठिकाणीं त्रुटितपणा वाटेल.

पुस्तकांत शब्ददोष राहिलेले आहेत. त्यांचें शुद्धिपत्रक जोडलें नाहीं. पण अर्थदोषाचें शुद्धिपत्रक जोडलें आहे.

या पुस्तकाचे करितां रा. रा. वेंकटेश वासुदेव उर्फ दादासाहेब पंडितराव B. Sc, यांनीं कागद दिला नसतां तर......

त्याचप्रमाणें माझे बंधु राघवेंद्र अवधानी यांनीं द्रव्यसाहाय्य केलें नसतें तर......

म्हणून या उभयतांचें आभार अंतकरणपूर्वक मानतों.

पुणें, शके १८७१
वैशाख वद्य ८

—लेखक

## श्रीमदानंदतीर्थ भगवत्पादाचार्य



अवतार शक ११२१

भूतलावरून अदृश्य
झालेला शक १२१६

॥ श्री लक्ष्मीनृसिंहाय नमः ॥

॥ श्रीमध्वराजाय नमः ॥

# श्रीमन्मध्वाचार्य व त्यांचें तत्त्वज्ञान

## प्रकरण १ लें

## भूतलावर अवतार.

श्रीमदानंदतीर्थ उर्फ मध्वाचार्य यानां सर्व सुबुद्ध जनता वायुदेवाचे अवतार मानते.

प्रथमो हनुमान्नाम द्वितीयो भीम एव च।
पूर्णप्रज्ञस्तृतीयस्तु भगवत्कार्यसाधकः ॥

वायुदेवाचा पहिला अवतार हनुमान्, दुसरा अवतार भीम व तिसरा मध्वाचार्य हे होत.

श्रीमध्वाचार्यांचे एकनिष्ठ शिष्य व त्यांचे समकालीन, व त्यांचें चरित्र त्यांचेजवळ राहून पाहणारे त्रिविक्रमपंडिताचार्य यांनीं त्यांचें अत्यद्भुत सामर्थ्य पाहून त्यांना वायुदेवाचे अवतार असें ठरविलें व श्रीमन्मध्वाचार्यांना उद्देशून वायुस्तुती या नांवाचें एक स्तोत्र रचलें आहे. या स्तोत्र रचनेविषयीं एक कथा प्रचलित आहे.

त्रिविक्रमपंडिताचार्यांनीं श्रीमध्वाचार्यांच्या अपूर्व पांडित्यानें, व्यक्तिमत्वानें मोहित होऊन त्यांचें शिष्यत्व पत्करल्यावर ते नेहमीं श्रीमध्वाचार्यांच्या अगदीं संनिध असत. एकदां ते श्रीमध्वाचार्यांबरोबर बदरी यात्रेला गेले असतां मार्गांत एके ठिकाणीं एका मुख्यप्राणाचे देवालयांत

दार लावून आचार्य ध्यानस्थ बसले होते. त्यावेळीं त्रिविक्रमपंडिताचार्यांनीं देवालयांत दार लावून श्रीमदाचार्य काय करीत आहेत हें झरोक्यांतून पाहिलें. त्यावेळीं श्रीमध्वाचार्य हे हनुमदाकारांत दिसले. तेव्हां आचार्य हे श्रीवायुदेवाचे अवतार होत याविषयीं खात्री पटून अत्यंत भक्तियुक्त अंत:करणानें त्यांनीं त्यांची स्तुति केली. तीच स्तुति "वायुस्तुति" या नांवानें प्रसिद्ध आहे. शिवाय बलित्थासूक्ताच्या द्वारां वेदांमध्यें वायुदेवाच्या तीन अवतारांचें वर्णन केलें आहे. या बलित्थासूक्ताशिवाय वेदांतील कोणत्या ऋचांनी वायुदेवाचें वर्णन केलें जातें हें वादिराजस्वामीनीं आपल्या "युक्तिमल्लिका" नांवाच्या ग्रंथांत दाखविलें असून नारायणाचार्य व्यास यांनीं याच विषयावर "मध्वमंत्रार्थ–मंजरी" या नांवाचा एक ग्रंथ रचला आहे. या सर्व गोष्टीवरुन आचार्यांनां अखिल वैष्णव वायुदेवाचे अवतार मानतात.

श्रीमन्मध्वाचार्यांचा अवतार शके, ११३१ या संवत्सरीं आश्विन शुद्ध दशमीच्या दिवशीं दुपारीं बारा वाजतां झाला.

> आश्विनशुक्लदशमीदिवसे भुवि पावने
> पाजकाख्ये शुचिक्षेत्रे दुर्गया चाभिवीक्षिते ।
> जातो मध्यान्हवेलायां बुधवारे मरुत्तनुः ॥

आचार्यांच्या जन्मग्रामाचें नांव "पाजकक्षेत्र" होय. सध्यांच्या नकाशांत हे गांव सांपडणार नाहीं. मुंबई ते मंगलोर असा जो समुद्रकिनारा आहे त्या किनाऱ्यावर मालपा बंदर आहे. तें मंगलूरच्या अलिकडचेंच बंदर होय. या बंदरापासून तीन मैलांवर उडुपी या नांवाच्या तालुक्याचे ठिकाणापासून आठ मैलांवर हें पाजकक्षेत्र आहे. या ठिकाणीं सध्यां कोणतीच वस्ती नाहीं. येथें फक्त एक जुनाट घर आहे. त्याच्या सभोवतीं नारळ, पोफळ, फणस इत्यादि झाडी आहे. हेंच श्रीमदाचार्यांचें जन्मस्थल होय. या ठिकाणीं श्रीमदाचार्यांचे वडील राहत असत. त्याच्या आजूबाजूस अनेक तीर्थें आहेत. या स्थलाचें रक्षण उडुपी येथील मध्वाचार्यांनीं स्थापन केलेल्या अष्टमठापैकीं काणूरमठाकडून होत आहे. या पाजकक्षेत्राच्या आजूबाजूस परशुरामविनिर्मित धनुतीर्थ, शरतीर्थ,

अंबुतीर्थ, परशुरामतीर्थ व गदातीर्थ अशी पांच तीर्थें असून खुद्द पाजक-क्षेत्रांत श्रीमध्वाचार्यांनीं निर्माण केलेलें वासुदेवतीर्थ या नांवाचें तीर्थ आहे. या वासुदेवतीर्थाजवळच एका शिलेवर आचार्यांच्या पाउलांचे ठसे उमटले आहेत. या पाजकक्षेत्राजवळच उदयावरम् नांवाचें एक खेडें आहे. तेथें आचार्यांनीं आपल्या दंडानें निर्माण केलेलें एक तीर्थ आहे. त्यास दंडतीर्थ असें म्हणतात, व यांतील पाणी, वाटेल तेवढा पाण्याचा दुष्काळ पडला तरी आटत नाहीं असें तेथील जनता सांगते.

आचार्यांच्या वडिलांचें नांव "मध्यगेहभट्ट" असें होतें. कित्येकजण आचार्यांच्या वडिलांचें नांव नारायणाचार्य असें होतें असें म्हणतात. त्रिविक्रमपंडिताचार्यांचे पुत्र नारायणपंडिताचार्य यांनीं "मणिमंजरी" या नांवाचा काव्यग्रंथ रचला आहे. त्याच्या शेवटच्या श्लोकांतील "नारायणप्रोद्भवः" या शब्दाचा अर्थ "नारायणापासून उत्पन्न झालेले मध्वाचार्य त्यांचा विजय" असा कित्येक टीकाकार करतात. व त्यावरून आचार्यांच्या वडिलांचे नांव 'नारायणाचार्य' असावें असें अनुमान कित्येक-जण काढतात. मध्यगेहभट्ट तुलुव ब्राह्मण असून सदाचारसंपन्न होते.

श्रीमध्वाचार्यांच्या मातेचें नांव 'वेदवती' असें होतें. मध्वविजय-कारांनीं त्यांच्या मातेचें नांव दिलें नाहीं. पण जगन्नाथदासांनीं एक हरिकथामृतसार नांवाचा ग्रंथ रचला आहे त्यावरील टीकाकारांनीं श्रीमध्वाचार्यांच्या मातेचें नांव वेदवती असल्याविषयीं प्रमाण दिलें आहे.

उक्तं च ऋक्संहितायां ... ...
वेदवत्याख्यभार्यायां तस्माज्जातो महाप्रभुः ॥

कित्येकांनीं आचार्यांच्या मातेचें नांव 'रेणुका' असें दिलें आहे. पण त्याला आधार कांहींच नाहीं.

मध्यगेहाचार्य उर्फ नारायणाचार्य हे पाजकक्षेत्रीं येऊन राहण्याचें अगोदर तेथूनच जवळच असणाऱ्या शिववल्ली या गांवीं राहून भारत, भागवत इत्यादि पुराणकथनावर आपली उपजीविका करीत असत. यदृच्छालाभसंतुष्ट राहून श्रीहरीची सेवा करीत आपला काळ घालविण्यांत ते स्वतःला धन्य मानीत असत.

वास्तविक पाहतां श्रीमदाचार्यांच्या वडिलांचें नांव मध्यगेहभट्ट हें नसावें असेंच त्या नांवावरून प्रतीत होणाऱ्या अर्थामुळें वाटतें. शिववल्ली नांवाच्या खेड्यांत ब्राह्मणवस्तींत मध्यभागीं त्यांचें घर असावें म्हणूनच त्यांना ' मध्यगेहभट्ट ' असें नांव पडलें असावें.

शिववल्ली गावांत राहात असतां मध्यगेहभट्टांना आपली उपजीविका मोठ्या कष्टानें चालवावी लागत असे. तरी पण त्याबद्दल असंतोष न बाळगतां ते आपलें जीवन व्यतीत करीत असत. मध्यगेहभट्टांना अनुरूप अशीच त्यांची पत्नी होती. घरांत पतीच्या स्वभावाला अनुरूप पत्नी असेल तर संसार सुखासमाधानाचा होतो. दारिद्र्यांतहि त्या संसाराला नंदनवनाचें स्वरुप येतें. नारायणाचार्य शास्त्रांत पारंगत होते म्हणून त्यांस भट्ट अशी संज्ञा होती. श्रीमध्वाचार्यांचे अगोदर त्यांना दोन मुलें व एक मुलगी अशीं तीन अपत्यें झालीं होतीं. पण दुर्दैवानें त्यापैकीं दोन मुलें बालवयांतच निवर्तलीं. त्यामुळें संसारांत एक प्रकारचें औदासिन्य आलें होतें. त्या कारणानें त्यांना शिववल्ली गांवांत बरें वाटेना. आणि त्या गांवांत त्यांची उपजीविकाहि मोठ्या कष्टानें चालत असल्यामुळें उभयतां पतिपत्नींनीं एकमेकांच्या विचारें त्या शिववल्ली गांवाचा त्याग करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें थोडक्याच दिवसांत शिववल्ली गांव सोडून आचार्य पाजकक्षेत्रीं राहण्यास आले.

पाजकक्षेत्र हें जरी फार मोठें शहर नसलें, तरी नारायणाचार्यांच्या विद्वत्तेला वाव मिळेल अशा तऱ्हेचा जनसमुदाय होता. त्या ठिकाणीं पाठशाळा होत्या. तें विद्वानांचें आगर होतें. त्यामुळें थोड्याच दिवसांत विनायासें त्यांचें जीवन व्यतीत होऊं लागलें. वारंवार शास्त्राभ्यास, चिंतन यांमुळें नारायणाचार्यांनीं ज्या तत्वज्ञानाचा अभ्यास केला होता त्यावरील त्यांचा विश्वास कमी होत चालला. त्या पाजकक्षेत्रांत व इतरत्र अनेक विद्वानांची अशी स्थिती झाली होती. त्यावेळीं शंकराचार्यांनीं पुरस्कारि-लेल्या मायावादाचें खंडन रामानुजाचार्यांनीं केलें होतें त्यामुळें मायावाद विद्वानांच्या चिकित्सक बुद्धिस पटला नाहीं. पुढें रामानुजाचार्यांनी प्रसृत केलेली विशिष्टाद्वैतमतांची तत्त्वेंहि चिकित्सेच्या सूक्ष्म कसोटीवर टिकेनात; मायावादी तत्वज्ञान मनास तर पटत नाहीं, पण पूर्वसंस्कारामुळें

त्याचा त्यागहि करवत नाहीं अशी त्रिशंकूवत् स्थिति कित्येक विद्वानांची झाली होती. जी स्थिति इतर विद्वान् मंडळींची तीच स्थिति नारायणाचार्यांची झाली होती. आणि त्यांतच आपणांस पुत्रसंतान नाहीं या गोष्टीची जाणीव वारंवार होत असे. अनेक व्रतवैकल्यें करूनहि संतान होईना. त्यामुळें त्यांच्या मनाचें स्वास्थ्य नाहींसें होऊं लागले. मानवी प्रयत्नांची पराकाष्ठा झाली म्हणजे मानव हा दैवी अनुग्रहाकडे वळतो. त्याप्रमाणें मध्यगेहाचार्यांनीं विचार केला कीं, आजपर्यंत अनेक मानवी प्रयत्न केले, पण ते सर्व व्यर्थ गेले आहेत. तर आतां आपण श्रीहरीची उपासना करून त्यामुळें तरी आपणाला पुत्रप्राप्ति होते का पहावे? या विचारानें उडुपी येथील अनंतेश्वराची उपासना करण्यास त्यांनीं प्रारंभ केला. मध्यगेहभट्ट व त्यांच्या पत्नी या उभयतांनीं अनंतेश्वराची बारा वर्षे उपासना अखंडपणें केली. कर्दम, पराशर, अत्रि इत्यादि ऋषींना श्रीहरीच्या सेवेमुळेंच जगदुद्धारक असें पुत्र झाले. त्याप्रमाणें अनंतेश्वराच्या कृपाप्रसादानें नारायणाचार्यांनाहि एक पुत्ररत्न झालें.

अगदीं याच वेळेस नारायणाचार्यांप्रमाणें इतर अनेक पंडितांनीं श्रीहरीची एकान्तिक मनानें प्रार्थना करण्यास प्रारंभ केला होता.

"हे प्रभो, आमच्या अंतःकरणांतील अज्ञान आपल्यावांचून कोण बरें नाहीसें करील?"

सर्व सज्जनगण अशा तळमळत्या स्थितींत असतां एकदां एका अनंतेश्वरांच्या यात्रेच्या प्रसंगीं श्रीहरीनें एका ब्राह्मणाच्या शरीरांत आविष्ट होऊन ब्राह्मणमुखानें सांगितलें कीं, 'सर्व सुजीवांच्या उद्धारासाठीं व त्यानां यथार्थज्ञानप्राप्ति व्हावी याकरितां वायुदेव लवकरच अवतार धारण करतील.' याप्रमाणें ब्राह्मणमुखांतून निघालेली आवेशयुक्त प्रासादिक भविष्यवाणी ऐकून जमलेल्या सर्व पंडितानां अत्यंत आनंद झाला. त्यानंतर सर्व मंडळी आपआपल्या स्थानीं परत गेली.

यानंतर काहीं दिवसांनीं नारायणाचार्यांची पत्नी गर्भवती होऊन यथाकालीं प्रसूत झाली. हेच आमचे चरित्रनायक होत.



# प्रकरण २ रें

## बालपण



मध्यगेहाचार्यांनां आपणास पुत्र झाल्याचें वर्तमान ऐकून अतिशय आनंद झाला. त्यांच्या आप्तेष्टादिकांनाहि अत्यानंद झाला. पुत्रजन्माचा आनंद राजापासून तो रंकापर्यंत सर्वत्र सारखाच असतो. त्यांतून त्या मुलाचें सौंदर्य व सुलक्षणें पाहून तर त्यांना आपल्या घरीं देवताविशेष अवतीर्ण झालेले आहेत याविषयीं मुळींच संशय उरला नाहीं. त्यामुळें त्यानां अत्यानंद झाला. मध्यगेहाचार्य आपल्या पवित्र आचरणानें सर्व लोकांना वंद्य होते. तात्काळ त्यांनीं विद्वान् ब्राह्मणांच्या नेतृत्वाखालीं स्वतः त्या मुलाचा जातकर्मसंस्कार केला. पुढें यथाक्रम जननाशौच संपल्यानंतर त्या मुलाचें "**वासुदेव**" असें अन्वर्थक नांव ठेवलें. मध्यगेहाचार्यांना पुत्र झाल्याचें वर्तमान ऐकून त्या मुलाच्या नामकरणविधीचें दिवशीं त्या मुलाकरितां अनेकांनीं अनेक देणग्या दिल्या. त्यामध्यें एका ब्राह्मणानें मध्यगेहाचार्यांना एक दुभती गाय दिली.

सामान्यतः एखाद्या देवतेला नवस करून पुत्र झाल्यास त्या बालकासह त्या देवतेच्या दर्शनास जाण्याची वहिवाट असते. त्याप्रमाणें मध्यगेहाचार्यांनीं विचार केला कीं, आपण सतत बारा वर्षे रजतपीठपुरांतील अनंतेश्वराची उपासना केली. आणि उपासनेचा प्रभाव म्हणूनच अनंतेश्वराच्या कृपेनें आपणांस सुलक्षणी पुत्र झाला. तर आपण सहकुटुंब त्या मुलासह अनंतेश्वराच्या दर्शनास जावें. असा विचार करून एका सुमुहुर्तावर ते आपल्या गांवाहून रजतपीठपुरास आले. त्या ठिकाणीं आल्यावर अनंतेश्वराच्या चरणाजवळ मुलास ठेवून मोठ्या भक्तिभावानें उभयतांनीं साष्टांग नमस्कार केला. नंतर अनंतेश्वराला अभिषेक, नैवेद्य वगैरे करण्यांत त्यांनीं तो दिवस घालविला. रजतपीठपुरा (उडुपी) पासून पाजक क्षेत्र अवघे आठ मैल होतें. मध्यगेहाचार्यांना नैवेद्यादि सर्व

कार्यक्रम आटोपण्यास उशीर झाला. तरीपण बरोबर मंडळी पुष्कळ, रस्ता नेहमीं पायाखालचा, चांदणीरात्र, यामुळें सर्वांच्या अनुमतीनें मध्यगेहाचार्य पाजकक्षेत्रांस येण्याकरितां म्हणून रात्र झाली तरी निघाले. चांदण्या रात्रीं अनेक मित्रासमवेत गप्पागोष्टी करीत प्रवास करणें मोठ्या मौजेचें व आनंददायक असतें. मध्यगेहाचार्यांनाहि त्यांत कांहीं वाटलें नाहीं. प्रवास करीत असतां, सामान्यतः अर्धी अधिक वाट चालून झाली असेल. सर्वजण प्रसन्न मनानें मार्ग आक्रमण करित असतानांच एकाएकीं, त्यांच्या परिवारांतील एका मनुष्यास रक्ताची वांति होऊं लागली. त्याबरोबर सर्वजण घाबरले. रक्ताची वांति होण्याबरोबर त्याला मूर्च्छा प्राप्त झाली.

आपल्या घरीं कोणत्याहि मंगल कार्यास सुरुवात झाल्यानंतर ते कार्य सुरळीतपणें पार पडून कार्यासाठीं आलेली मंडळी परत आपआपल्या घरीं गेली कीं, मुख्य यजमानास आनंद होतो. पण जर कां कोणावर कांहीं संकट आलें तर यजमानाची अवस्था मोठी चमत्कारिक होते. मध्यगेहाचार्यांची स्थिति तशीच झाली. इतक्यांत ज्याला वांति झाली होती तो मनुष्य मोठमोठ्यानें बडबडूं लागला.

"ही मध्यरात्र म्हणजे आमची क्रीडा करण्याची वेळ. यावेळीं आलेल्या सर्वांचा मी नाश केला असता. पण तुमच्या परिवारांत जें बालक आहे त्याच्या तेजामुळें मी तुम्हांस त्रास देऊं शकत नाहीं. तें बालक म्हणजे साक्षात् लोकेश्वर **वायुदेव** होत. ते या परिवारांत आहेत म्हणूनच मी तुम्हांस नष्ट करीत नाहीं."

याप्रमाणें आविष्ट होऊन त्या ब्रह्मराक्षसानें त्या सर्व मंडळींनां बजावलें; कांहीं कालानें तो मनुष्य सावध झाला. त्या बरोबर एका मोठ्या संकटांतून वांचविल्याबद्दल त्या अनंतेश्वराचें कीर्तन करीत ती सर्व मंडळी थोड्याच कालांत आपआपल्या घरीं परत आली. पण त्यावेळेपासून मध्यगेहाचार्यांना आपल्या मुलाबद्दल आत्यंतिक प्रेम वाटूं लागलें.

**वासुदेव** आपल्या पित्याच्या घरीं वाढूं लागले. वासुदेव जात्याच सुंदर बाळसेदार असल्यामुळें त्या आळींतील सर्व स्त्रीपुरुषांचा त्यांवर मोठा लोभ असे. एकदां पाहण्याबरोबर कोणाच्याहि मनांत प्रेम उत्पन्न व्हावे इतकी आकर्षकता व गुण त्या मुलांत होते. या बालकाची पुष्ट, सतेज, हंसरी मूर्ति

पाहून पाहाणाऱ्यास त्याला उचलून घेऊन त्याचा एक तरी पापा घेण्याचा मोह आवरत नसे. त्यामुळें ते नेहमी कोणाच्या तरीं आंगाखांद्यावरच असत. तरी पण वासुदेवाला वेदवती केव्हांहि आपल्या नजरेआड होऊं देत नसे.

एके दिवशीं वेदवतीला कांहीं कारणानें अगदीं जरूरीच्या कामास्तव नाइलाजानें बाहेर जाणें भाग पडलें. तेव्हां वासुदेवास आपल्या थोरल्या मुलीच्या स्वाधीन करून वेदवती बाहेर गेली. वासुदेवाच्या बहिणीनें त्याला पुष्कळ वेळ खेळविलें. पुढें वासुदेव रडूं लागला. त्याचें रडें थांबविण्याकरितां अनेक तऱ्हेनें त्यांच्या बहिणीनें प्रयत्न केला. पण वासुदेव कांही केल्या उगी राहिना. तेव्हां त्याला भूक लागली असेल अशी तिनें कल्पना केली. त्या लहान मुलीला मुलांस भूक लागल्यानंतर काय खावयास द्यावें याचें तारतम्य कोठून असणार ? घरांत हुलग्याची उसळ करून ठेविली होती. ती हुलग्याची उसळच वासुदेवाच्या बहिणीनें वासुदेवास खाण्यास दिली. वासुदेवांनींहि ती उसळ सर्वच्या सर्व खाऊन टाकली. वास्तविक पहातां हे धान्य चांगल्या माणसासहि व्यथा उत्पन्न करणारें आहे. वासुदेवाची माता वेदवती घरीं आल्यावर तिला ही हकीकत कळली. तेव्हां तिला आपलें बालक आजारी पडणार अशी भीति पडली पण वासुदेवाच्या प्रकृतीवर त्या हुलग्याच्या उसळीचा कांहींहि अनिष्ट परिणाम झाला नाहीं. ते पाहून वेदवतीस अतिशय आश्चर्य वाटलें, वासुदेवांनीं या वेळेस आपल्या भीमसेन अवतारांतील आपलें जाठर-माहात्म्य अंशतः प्रकट केलें.

वासुदेव जसजसे मोठे होऊं लागले तसतशा तऱ्हेनें त्यांचें क्रीडाक्षेत्रहि विस्तृत झालें. त्यांनीं आपल्या नानाविध क्रीडांनीं सर्वांना आनंदित करावें.

भगवान् श्रीकृष्ण मोठे झाल्यानंतर जशी त्यांच्या मातांना काळजी उत्पन्न झाली होती, तद्वत् वेदवतीस वासुदेवाबद्दल चिंता उत्पन्न झाली. मुलगा सामान्यतः चालूं लागला म्हणजे त्याचेबद्दल अनेक तऱ्हेची भीति त्याचे पालकांचे मनांत उत्पन्न होते. त्यांतून मुलगा चपळ असला म्हणजे मग तर विचारावयास नको. मुलगा रस्त्यावर जाईल, मुलगा उंचावरून खालीं पडेल, रस्त्यांत जनावरें मारतील, दिवा धरील, अशा एक का दोन,

अनेक तऱ्हेनें काळजी उत्पन्न होते. वेदवतीची स्थिति हुबेहुब अशीच झाली. आपल्या हातांतलें काम घडोघडीं बाजूस ठेवून वासुदेव काय करतो हें ती पाहत असे. थोडेंसे दुर्लक्ष व्हायचा अवकाश, कीं लगेच वासुदेवानें बाहेर धूम ठोकलीच. एके दिवशीं एक उन्मत्त झालेला पोळ गावांत धिंगाणा घालीत होता. मध्यगेहाचार्यांच्या या वासुदेवानें आपल्या मातेची नजर चुकवून बैलाजवळ आगमन करून त्याचें शेपूट धरलें, व शेपटीच्या लोंबकळतच वासुदेव रानांत गेले. थोड्या वेळानें वेदवतीला वासुदेव कोठें दिसेना. त्यावेळीं तिनें आजूबाजूस व गावांत पाहिलें. इकडे गावांत वासुदेवाच्या शोधाशोधीस सुरवात झाली. गांवांत वासुदेव कोठेंहि दिसेनात. सर्वजण चिंताक्रान्त झाले. इतक्यांत रानांतून कांहीं गुराखी आले. त्या गुराख्यांनीं सांगितलें कीं, मुलगा रानांत अमक्या ठिकाणीं एका बैलाबरोबर खेळत आहे. ...

तेव्हां तात्काल मध्यगेहाचार्यप्रभृति मंडळी तिकडे जाऊन पाहतात, तों त्यांना गांवांतल्या प्रचंड पोळाच्या शेपटीबरोबर वासुदेव खेळत आहेत असें दिसलें. त्याबरोबर सर्वांना अत्यानंद झाला. दरिद्र्याला चिंतामणि प्राप्त झाला असतां आनंद व्हावा, तद्वत् त्या सर्व मंडळींना आनंद झाला. सर्व मंडळी वासुदेवाला घेऊन परतली.

वासुदेव हे आपल्या पित्याच्या घरीं सर्वांना आनंदवीत होते व आपल्या बाललीलांनीं अद्भुत महिमा प्रकट करीत होते.

मध्यगेहभट्ट पाजक क्षेत्रास आल्यापासून जरी त्यांच्या नित्याचा योगक्षेम चालत असे, तरी त्यांना कित्येक वेळां कांहीं प्रसंगाकरितां कर्ज काढण्याची वेळ येत असे. एकदां त्यांना शेतीच्या कामासाठीं बैल घेण्याकरितां कांहीं कर्ज काढणें भाग पडलें. पण पुढें योग्य मुदतींत कर्ज फिटलें नाहीं: त्यामुळें त्यांचा सावकार अगदीं दाराशीं धरणें धरून बसला. तो सावकार आपणहि जेवीना व मध्यगेहाचार्यांनाहि जेवूं देईना. माझें कर्ज द्या व तुम्ही उठा, असें तो मध्यगेहभट्टांना म्हणूं लागला. मध्यगेहाचार्यांसारख्या-जवळ एकदम आपल्या सावकाराच्या पैशाची भरपाई करण्याजोगी रक्कम कोठून असणार? त्यांनीं आणखीन् थोडी मुदत देण्याबद्दल त्या सावकाराची नाना तऱ्हेनें विनवणी केली. पण मुदत देण्याला सावकार

# प्रकरण २ रें

## बालपण



मध्यगेहाचार्यांनां आपणास पुत्र झाल्याचें वर्तमान ऐकून अतिशय आनंद झाला. त्यांच्या आप्तेष्टादिकांनाहि अत्यानंद झाला. पुत्रजन्माचा आनंद राजापासून तो रंकापर्यंत सर्वत्र सारखाच असतो. त्यांतून त्या मुलाचें सौंदर्य व सुलक्षणें पाहून तर त्यांना आपल्या घरीं देवताविशेष अवतीर्ण झालेले आहेत याविषयीं मुळींच संशय उरला नाहीं. त्यामुळें त्यानां अत्यानंद झाला. मध्यगेहाचार्य आपल्या पवित्र आचरणानें सर्व लोकांना वंद्य होते. तात्काळ त्यांनीं विद्वान् ब्राह्मणांच्या नेतृत्वाखालीं स्वतः त्या मुलाचा जातकर्मसंस्कार केला. पुढें यथाक्रम जननाशौच संपल्यानंतर त्या मुलाचें "**वासुदेव**" असें अन्वर्थक नांव ठेवलें. मध्यगेहाचार्यांना पुत्र झाल्याचें वर्तमान ऐकून त्या मुलाच्या नामकरणविधीचें दिवशीं त्या मुलाकरितां अनेकांनीं अनेक देणग्या दिल्या. त्यामध्यें एका ब्राह्मणानें मध्यगेहाचार्यांना एक दुभती गाय दिली.

सामान्यतः एखाद्या देवतेला नवस करून पुत्र झाल्यास त्या बालकासह त्या देवतेच्या दर्शनास जाण्याची वहिवाट असते. त्याप्रमाणें मध्यगेहाचार्यांनीं विचार केला कीं, आपण सतत बारा वर्षे रजतपीठपुरांतील अनंतेश्वराची उपासना केली. आणि उपासनेचा प्रभाव म्हणूनच अनंतेश्वराच्या कृपेनें आपणांस सुलक्षणी पुत्र झाला. तर आपण सहकुटुंब त्या मुलासह अनंतेश्वराच्या दर्शनास जावें. असा विचार करून एका सुमुहुर्तावर ते आपल्या गांवाहून रजतपीठपुरास आले. त्या ठिकाणीं आल्यावर अनंतेश्वराच्या चरणाजवळ मुलास ठेवून मोठ्या भक्तिभावानें उभयतांनीं साष्टांग नमस्कार केला. नंतर अनंतेश्वराला अभिषेक, नैवेद्य वगैरे करण्यांत त्यांनीं तो दिवस घालविला. रजतपीठपुरा (उडुपी) पासून पाजक क्षेत्र अवघे आठ मैल होतें. मध्यगेहाचार्यांना नैवेद्यादि सर्व

कार्यक्रम आटोपण्यास उशीर झाला. तरीपण बरोबर मंडळी पुष्कळ, रस्ता नेहमीं पायाखालचा, चांदणीरात्र, यामुळें सर्वांच्या अनुमतीनें मध्यगेहाचार्य पाजकक्षेत्रांस येण्याकरितां म्हणून रात्र झाली तरी निघाले. चांदण्या रात्रीं अनेक मित्रासमवेत गप्पागोष्टी करीत प्रवास करणें मोठ्या मौजेचें व आनंददायक असतें. मध्यगेहाचार्यांनाहि त्यांत कांहीं वाटलें नाहीं. प्रवास करीत असतां, सामान्यतः अर्धी अधिक वाट चालून झाली असेल. सर्वजण प्रसन्न मनानें मार्ग आक्रमण करित असतानांच एकाएकीं, त्यांच्या परिवारांतील एका मनुष्यास रक्ताची वांति होऊं लागली. त्याबरोबर सर्वजण घाबरले. रक्ताची वांति होण्याबरोबर त्याला मूर्च्छा प्राप्त झाली.

आपल्या घरी कोणत्याहि मंगल कार्यास सुरुवात झाल्यानंतर ते कार्य सुरळींतपणें पार पडून कार्यासाटीं आलेली मंडळी परत आपआपल्या घरीं गेली कीं, मुख्य यजमानास आनंद होतो. पण जर कां कोणावर कांहीं संकट आलें तर यजमानाची अवस्था मोठी चमत्कारिक होते. मध्यगेहाचार्यांची स्थिति तशीच झाली. इतक्यांत ज्याला वांति झाली होती तो मनुष्य मोटमोठ्यानें बडबडूं लागला.

"ही मध्यरात्र म्हणजे आमची क्रीडा करण्याची वेळ. यावेळीं आलेल्या सर्वांचा मी नाश केला असता. पण तुमच्या परिवारांत जें बालक आहे त्याच्या तेजामुळें मी तुम्हांस त्रास देऊं शकत नाहीं. तें बालक म्हणजे साक्षात् लोकेश्वर वायुदेव होत. ते या परिवारांत आहेत म्हणूनच मी तुम्हांस नष्ट करीत नाहीं."

याप्रमाणें आविष्ट होऊन त्या ब्रह्मराक्षसानें त्या सर्व मंडळींनां बजावलें; कांहीं कालानें तो मनुष्य सावध झाला. त्या बरोबर एका मोठ्या संकटांतून वांचविल्याबद्दल त्या अनंतेश्वराचें कीर्तन करीत ती सर्व मंडळी थोड्याच कालांत आपआपल्या धरीं परत आली. पण त्यावेळेपासून मध्यगेहाचार्यांना आपल्या मुलाबद्दल आत्यंतिक प्रेम वाटूं लागलें.

**वासुदेव** आपल्या पित्याच्या घरीं वाढूं लागले. वासुदेव जात्याच सुंदर बाळसेदार असल्यामुळें त्या आळींतील सर्व स्त्रीपुरुषांचा त्यांवर मोठा लोभ असे. एकदां पाहण्याबरोबर कोणाच्याहि मनांत प्रेम उत्पन्न व्हावे इतकी आकर्षकता व गुण त्या मुलांत होते. या बालकाची पुष्ट, सतेज, हंसरी मूर्ति

पाहून पाहाणाऱ्यास त्याला उचलून घेऊन त्याचा एक तरी पापा घेण्याचा मोह आवरत नसे. त्यामुळें ते नेहमी कोणाच्या तरीं आंगाखांद्यावरच असत. तरी पण वासुदेवाला वेदवती केव्हांहि आपल्या नजरेआड होऊं देत नसे.

एके दिवशीं वेदवतीला कांहीं कारणानें अगदीं जरूरीच्या कामास्तव नाइलाजानें बाहेर जाणें भाग पडलें. तेव्हां वासुदेवास आपल्या थोरल्या मुलीच्या स्वाधीन करून वेदवती बाहेर गेली. वासुदेवाच्या बहिणीनें त्याला पुष्कळ वेळ खेळविलें. पुढें वासुदेव रडूं लागला. त्याचें रडें थांबविण्याकरितां अनेक तऱ्हेनें त्यांच्या बहिणीनें प्रयत्न केला. पण वासुदेव कांही केल्या उगी राहिना. तेव्हां त्याला भूक लागली असेल अशी तिनें कल्पना केली. त्या लहान मुलीला मुलांस भूक लागल्यानंतर काय खावयास द्यावें याचें तारतम्य कोठून असणार ? घरांत हुलग्याची उसळ करून ठेविली होती. ती हुलग्याची उसळच वासुदेवाच्या बहिणीनें वासुदेवास खाण्यास दिली. वासुदेवांनींहि ती उसळ सर्वच्या सर्व खाऊन टाकली. वास्तविक पहातां हे धान्य चांगल्या माणसासहि व्यथा उत्पन्न करणारें आहे. वासुदेवाची माता वेदवती घरीं आल्यावर तिला ही हकीकत कळली. तेव्हां तिला आपलें बालक आजारी पडणार अशी भीति पडली पण वासुदेवाच्या प्रकृतीवर त्या हुलग्याच्या उसळीचा कांहींहि अनिष्ट परिणाम झाला नाहीं. ते पाहून वेदवतीस अतिशय आश्चर्य वाटलें. वासुदेवांनीं या वेळेस आपल्या भीमसेन अवतारांतील आपलें जाठर-माहात्म्य अंशतः प्रकट केलें.

वासुदेव जसजसे मोठे होऊं लागले तसतशा तऱ्हेनें त्यांचें क्रीडाक्षेत्रहि विस्तृत झालें. त्यांनीं आपल्या नानाविध क्रीडांनीं सर्वांना आनंदित करावें.

भगवान् श्रीकृष्ण मोठे झाल्यानंतर जशी त्यांच्या मातांना काळजी उत्पन्न झाली होती, तद्वत् वेदवतीस वासुदेवाबद्दल चिंता उत्पन्न झाली. मुलगा सामान्यतः चालूं लागला म्हणजे त्याचेबद्दल अनेक तऱ्हेची भीति त्याचे पालकांचे मनांत उत्पन्न होते. त्यांतून मुलगा चपळ असला म्हणजे मग तर विचारावयास नको. मुलगा रस्त्यावर जाईल, मुलगा उंचावरून खालीं पडेल, रस्त्यांत जनावरें मारतील, दिवा धरील, अशा एक का दोन,

अनेक तऱ्हेनें काळजी उत्पन्न होते. वेदवतीची स्थिति हुबेहुब अशीच झाली. आपल्या हातांतलें काम घडोघडीं बाजूस ठेवून वासुदेव काय करतो हें ती पाहत असे. थोडेंसें दुर्लक्ष व्हायचा अवकाश, कीं लगेंच वासुदेवानें बाहेर धूम ठोकलीच. एके दिवशीं एक उन्मत्त झालेला पोळ गावांत धिंगाणा घालीत होता. मध्यगेहाचार्यांच्या या वासुदेवानें आपल्या मातेची नजर चुकवून बैलाजवळ आगमन करून त्याचें शेपूट धरलें, व शेपटीला लोंबकळतच वासुदेव रानांत गेले. थोड्या वेळानें वेदवतीला वासुदेव कोठे दिसेना. त्यावेळीं तिनें आजूबाजला व गावांत पाहिलें. इकडे गावांत वासुदेवाच्या शोधाशोधीस सुरुवात झाली. गांवांत वासुदेव कोठेंहि दिसेनात. सर्वजण चिंताक्रान्त झाले. इतक्यांत रानांतून कांहीं गुराखी आले. त्या गुराख्यांनीं सांगितलें कीं, मुलगा रानांत अमक्या ठिकाणीं एका बैलाबरोबर खेळत आहे. ...

तेव्हां तात्काल मध्यगेहाचार्यप्रभृति मंडळी तिकडे जाऊन पाहतात, तों त्यांना गांवांतल्या प्रचंड पोळाच्या शेपटीबरोबर वासुदेव खेळत आहेत असें दिसलें. त्याबरोबर सर्वांना अत्यानंद झाला. दरिद्याला चिंतामणि प्राप्त झाला असतां आनंद व्हावा, तद्वत् त्या सर्व मंडळींना आनंद झाला. सर्व मंडळी वासुदेवाला घेऊन परतली.

वासुदेव हे आपल्या पित्याच्या घरीं सर्वांना आनंदवीत होते व आपल्या बाललीलांनीं अद्भुत महिमा प्रकट करीत होते.

मध्यगेहभट्ट पाजक क्षेत्रास आल्यापासून जरी त्यांचा नित्याचा योगक्षेम चालत असे, तरी त्यांना कित्येक वेळां कांहीं प्रसंगाकरितां कर्ज काढण्याची वेळ येत असे. एकदां त्यांना शेतीच्या कामासाठीं बैल घेण्याकरितां कांहीं कर्ज काढणें भाग पडलें. पण पुढें योग्य मुदतींत कर्ज फिटलें नाहीं; त्यामुळें त्यांचा सावकार अगदीं दाराशीं धरणें धरून बसला. तो सावकार आपणहि जेवीना व मध्यगेहाचार्यांनाहि जेवूं देईना. माझें कर्ज द्या व तुम्ही उठा, असें तो मध्यगेहभट्टांना म्हणूं लागला. मध्यगेहाचार्यांसारख्या-जवळ एकदम आपल्या सावकाराच्या पैशाची भरपाई करण्याजोगी रक्कम कोठून असणार? त्यांनीं आणखीन् थोडी मुदत देण्याबद्दल त्या सावकाराची नाना तऱ्हेनें विनवणी केली. पण मुदत देण्याला सावकार

कबूल होईना! इतक्यांत वासुदेव हे भोजनाची वेळ झाल्यामुळें बोलवावयास आले. तेव्हां त्यांनीं वासुदेवास सांगितलें कीं, 'हा सावकार मला त्याचें देणें दिल्याशिवाय जेऊं देत नाहीं. म्हणून तूं जेवण करून घे.' आपल्या पित्याचें भाषण ऐकून वासुदेवानें घरांतून पैसे म्हणून चिंचोके आणून दिले. चिंचोक्यांची पिशवी त्याचे पदरांत टाकल्याबरोबर त्याचे रूपांतर द्रव्यांत झालें. त्याबरोबर त्या सावकाराला आनंद व आश्चर्य वाटलें. त्यांनीं मध्यगेहभट्टास सांगितल कीं, 'आज तुम्ही तुमच्या मुलाच्या योगानें ऋणमुक्त झालांत!' त्यावेळीं मध्यगेहाचार्यांना अतिशय आनंद झाला व आपल्या मुलाच्या दैवी अंशाबद्दल तर खात्रीच पटली. त्यानंतर त्यांनीं मोठ्या आनंदयुक्त मनानें मुलासहवर्तमान भोजनादि व्यवहार आटोपले.

एकदां मध्यगेहाचार्य नडुवेरी नांवाच्या गांवीं आपल्या आप्तांतल्या एका गृहस्थाच्या घरीं विवाहमहोत्सवानिमित्त सहकुटुंब गेले होते. त्या ठिकाणीं त्यांचे अनेक आप्तेष्ट जमा झाले होते. साहजीकच त्या महोत्सवांत कामधंद्याच्या गर्दीमुळें वेदवतीबाईला वासुदेवाच्याकडे लक्ष देण्यास सवड झाली नाहीं. त्या महोत्सवांत एके दिवशीं सर्वांचा डोळा चुकवून ते *कुडेवूर (कुडुवर) नांवाच्या गांवीं असलेल्या विष्णुमंदिरांत आले. तेथें श्रीहरीस नमस्कार करून ताळेकुड येथें आले. तेथील विष्णुमंदिरांत जाऊन मोठ्या भक्तिभावानें श्रीविष्णूस नमस्कार केला. तेथून ते उडुपीस

* उपरिलिखित स्थळांचा उल्लेख मध्वविजयकार नारायणपंडिताचार्य यांनीं मोठ्या गमतीदार शब्दांनीं केला आहे.

'कुडवूर' या गांवचा उल्लेख "काननदेवतासदन" (३·२)

'ताळेकुड' या गांवचा निर्देश "नारिकेल्युपपदांतर" (३–२) या पदानें केला आहे.

मध्वविजयावर मंदोपकारिणी नांवाची छलारी आचार्यांच्या शिष्याची एक टीका उपलब्ध आहे. त्याप्रमाणें त्यांच्यापूर्वीं खुद्द नारायणपंडिताचार्यांची एक संक्षिप्त टीका आहे. त्याप्रमाण मध्वविजयावर वेदांगतीर्थांची एक टीका आहे. वेदांगतीर्थ हें सोदेमठांवरील तेरावे स्वामी होत. या उभय टीकाकारांनीं निरनिराळ्या

आले. तेथें प्रथमतः पूर्वदिगालयांतील देवतेचें दर्शन घेऊन नंतर ते पश्चिम दिगालयांत आले. तोपर्यंत नडुवेरी गांवीं मध्यगेहाचार्यांचा मुलगा वासुदेव हा हरवल्याचा बोभाटा झाला. सर्वत्र गांवांत मंडळींनीं .शोध केला. पण त्याचा तपास लागेना. सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. मुलाच्या शोधाकरितां आजूच्या खेड्याकडे माणसें रवाना झालीं. खुद्द मध्यगेहाचार्य त्याच्या शोधाकरितां निघाले. आपला एकुलता एक मुलगा नाहींसा झाल्याचें पाहून त्यांना कांहींच सुचेना. शोध करीत असतां वाटेंत जो भेटेल त्याला "अशा खुणा असलेला, चार पांच वर्षांचा, गौरवर्णीय मुलगा पाहिला काय?" असें त्यांनीं विचारावें. अशा रीतीनें शोध करीत हिंडत असतांनाच "एक लहान मुलगा आपण उडुपीकडे जातांना पाहिला" असें कांहीं जणांनीं सांगितले. तेव्हां आचार्य थेट उडुपीस आले, तेथें शोध करतां करतां वासुदेव हे *देवालयांत असल्याचें त्यांना कळलें. तेव्हां जवळ जवळ धांवतच मध्यगेहाचार्य पश्चिम देवालयीं आले. वासुदेव त्याठिकाणीं होते. त्यांना पाहिल्याबरोबर मध्यगेहाचार्यांना अतिशय आनंद झाला. वासुदेवाला आपल्या जवळ त्यांनीं घेतलें. एखाद्या दरिद्री मनुष्याला एखाद्या रत्नाची प्राप्ति झाली असतां जसा आनंद वाटावा त्याप्रमाणें त्यांना अत्यानंद झाला. आनंदाचा भर ओसरल्यावर मध्यगेहाचार्यांनीं वासुदेवास विचारलेः—

"बाळ, तुला इतक्या लांब येतांना भय कसें वाटलें नाहीं? तुझ्यासोबत कोण आले होते?" आपल्या वडिलांचा प्रश्न ऐकून वासुदेव म्हणालेः—

---

स्थळांचा उल्लेख केला आहे. वेदांगतीर्थांनीं रचलेल्या टीकेचें नांव पदार्थदीपिका असें असून नारायणपंडिताचार्य यांनीं रचलेल्या टीकेचें नांव भावप्रकाशिका असें आहे.

पदार्थ विशदीकरणाच्या दृष्टीनें पदार्थदीपिका ही टीका अत्यंत सुबोध आहे.

या चरित्रांत स्थलकालांचा जो निर्देश केला आहे तो या दोन टीकांतील उल्लेखाला प्रमाण मानून केला आहे.

* उडुपी येथें पूर्व दिशेला एक देवालय असून पश्चिम दिशेला एक देवालय आहे. पहिल्या प्रथम दर्शनेच्छूनें पूर्व देवालयांत येऊन दर्शन घ्यावें व नंतर पश्चिम देवालयांत दर्शनास यावें अशी पद्धत आहे.

" मीं घरून निघाल्यापासून माझ्या सोबतीला कुडेवूरचे ( कुडवर ) श्रीहरी होते. त्यानंतर त्यांनींच मला सोबत करून ताळेकूड येथें आणून सोडलें. नंतर ताळेकुडच्या श्रीहरीनें उडुपी येथील पूर्व देवालयापर्यंत आणलें. पूर्व-देवालयांतील हरीनें मला येथपर्यंत ( पश्चिम देवालयापर्यंत ) आणलें.

हें त्या बालकाचें बोबडें भाषण ऐकल्यावर सर्वांना तें भाषण खरें वाटलें. प्रत्यक्ष श्रीहरीनेंच या मुलाचें रक्षण केलें याबद्दल कोणासहि संशय उरला नाहीं.

नंतर मध्यगेहाचार्यांनीं आपल्या मुलाचे अशा स्थितींत श्रीहरीनेंच रक्षण केलें असें समजून आपली कुलदेवता—अनंतेश्वराचें दर्शन घेतलें. व अशा तऱ्हेनेंच वारंवार रक्षण करावें म्हणून प्रार्थना करून मग मध्यगेहाचार्य परिवारासह पाजकक्षेत्रास परत आले. यावेळीं वासुदेवाचें वय अवघें पांच वर्षांचें होतें. याप्रमाणें वासुदेव आपल्या पित्याच्या घरीं वाढत असतां मध्यगेहाचार्यांनीं एका शुभ मुहूर्तावर धुळाक्षरें काढून दिलीं. थोडा वेळ धुळाक्षरें वासुदेवांनीं गिरविली व पुन्हा खेळण्यास प्रारंभ केला. मध्यगेहा-चार्यांनीं पुन्हां दुसऱ्यांदा तींच धुळाक्षरें गिरविण्याकरितां काढून दिली असतां वासुदेवानें आपल्या पित्यास सांगितलें कीं, "एकदां गिरविलेलीं अक्षरें पुन्हां गिरवण्यास देऊं नका." असें म्हणून आदले दिवशीं काढून दिलेलीं धुळाक्षरें तशींच वासुदेवानें आपल्या पित्यास काढून दाखविली. तेव्हां आपला मुलगा एकपाठी असावा असें त्यांना वाटूं लागलें. पुढेंपुढें तर त्यांची वासुदेवाच्या एकपाठीपणाबद्दल व बुद्धिच्या तीक्ष्णतेविषयीं खात्रीच पटली. तेवढ्या लहान वयांतहि वासुदेवाची वाचनशक्ति दांडगी होती. हातीं जें पुस्तक येईल तें ते वाचून काढीत असत. त्यामुळें वासुदेवाची बुद्धिमत्ता त्या वयाच्या मानानें पुष्कळच वाढली होती. त्यामुळें वासुदेवा-बद्दल सर्वांच्या मनांत प्रेम आदर वसूं लागला. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें मध्यगेहाचार्यांनीं आपल्या मुलांस काव्यव्युत्पत्ति करून दिली होती.

## वासुदेवाचें व्युत्पत्तिकौशल्य

एकदां अशाच कांहीं कार्याकरितां म्हणून वासुदेवासह वेदवती आपल्या

भावाकडे *नैयमपल्ली नांवाच्या गांवीं आली. वेदवती कोठेंहि जरी गेली तरी तिचा पुराणश्रवणाचा नियम चुकत नसे. त्याप्रमाणें सायंकाळीं वासुदेवासह देवालयांत ती पुराणश्रवणाकरिता आली. त्या ठिकाणीं देवालयांत शिवभट्ट नांवाचे पुराणिक पुराण सांगत असतानांच त्यांचा अर्थ चुकला असें वाटून वासुदेवानें त्या पुराणिकाला मध्येंच हटकून विचारलें,

"अहो पुराणिकमहाराज, तुम्ही सांगितलेला अर्थ बरोबर नाहीं. तुमचा अर्थ वेदव्यासांना अभिप्रेत नाहीं."

हें त्या मुलाचें भाषण ऐकल्याबरोबर जमलेल्या सर्व श्रोत्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें. कारण वासुदेवाचें या वेळीं जें वय होतें त्या वयाच्या मुलांना नुसती पुराणाचीं नांवें तरी माहिती असतील कीं नाहीं, याची वानवा होती. पण या बालकानें त्या पुराणिकांची चूक काढलेली पाहून सर्व लोकांना अतिशय आश्चर्य वाटलें. यःकश्चित् मुलानें आपण चुकलों असें म्हणावें हें पुराणिकबुवांना तरी कसें खपणार ? पुराणिकबुवा व तत्पक्षपाती मंडळी वासुदेवाला धाक दाखवून गप्प बसविणार होती. पण कांहीं विद्वान् मंडळी होती, त्यांना वासुदेवाबद्दल कौतुक वाटून त्यांनीं वासुदेवास सांगितलें,

"मुला, पुराणिकबुवांनीं सांगितलेला अर्थ जर वेदव्यासांना अभिप्रेत नाहीं म्हणतोस, तर त्यांना अभिप्रेत अर्थ कोणता तो सांग पाहूं."

त्याबरोबर वासुदेवानें त्यावेळीं लगेच पुराणिकबुवांनीं सांगितलेला अर्थ चुकीचा कसा आहे हें दाखवून देऊन, सिद्धान्ताला अनुकूल असा अर्थ कोणता हें श्रोत्यांना सप्रमाण पटवून दिलें. त्यावेळीं एकमुखानें वासुदेवाचा गौरव झाला. इतक्या लहान वयांतील त्यांच्या बुद्धिमत्तेची तीव्रता व व्युत्पत्तिकौशल्य पाहून सर्व लोकांना अत्यंत आश्चर्य वाटलें. त्यामुळें त्या लहान मुलाचा सर्वांनीं सर्वतऱ्हेनें सन्मान केला. यावेळीं मध्यगेहाचार्य पाजकक्षेत्रांत

* मध्वविजयकारांनीं "प्रतियया प्रभुणा घृतवल्यांप" (३-२१) असा उल्लेख केला आहे. घृतवल्ली या गांवाचा नामनिर्देश वेदांगतीर्थांनीं आपल्या मध्वविजयावरील टीकेंत "घृतवल्लीत्यस्य नैय्यपल्लीत्यपभ्रष्टभाषा" असा उल्लेख केला आहे. त्यावरून नैयमपल्ली अशें त्या गांवाचें नांव असावें.

होते. कांहीं दिवसांनीं वेदवती परत वासुदेवासह पाजकक्षेत्रास आली. तेव्हां वासुदेवांनीं नैयमपल्ली गांवांत घडलेली पुराणाच्या वेळची हकीकत आपल्या वडिलांस सांगून विचारलें कीं, "मी सांगितलेला अर्थ बरोबर आहे कीं, त्या पुराणिकानें सांगितलेला अर्थ बरोबर आहे?"

तेव्हां मध्यगेहाचार्यांनीं वासुदेवास सांगितले कीं, तूं जो अर्थ सांगितलास तोच बरोबर आहे.

वासुदेवाचें व्युत्पत्तिकौशल्य आणखीन् एकदा सर्वांच्या नजरेस आलें. खुद्द मध्यगेहभट्ट एकदा पाजकगांवात पुराण सांगत असतां 'लिकुच' असें पद आले मध्यगेहभट्टांनीं त्या पदाचा अर्थ न सांगतांच पुढील श्लोकांचे व्याख्यानास सुरुवात केली. त्यावेळीं वासुदेव त्या ठिकाणीं होते. त्यांनीं आपल्या पित्यास पूर्वश्लोकाचा पदपदार्थ पुन्हां सांगा अशी विनंति केल्यावर मध्यगेहभट्टांनीं पूर्वश्लोकाचा अर्थ सांगितला पण दुसऱ्या वेळींहि मध्यगेहभट्टांनीं 'लिकुच' या पदाचा अर्थ न सांगतां पुढें अर्थ सांगण्यास प्रारंभ केला. तेव्हां मध्येंच वासुदेवांनीं त्या लिकुच पदाचा अर्थ विशद करून सांगितला. त्या बालकानें सांगितलेला अर्थ ऐकून मध्यगेहभट्टांना व जमलेल्या श्रोते मंडळींना अत्यंत आनंद व अभिमान वाटला.

---

## प्रकरण ३ रें

# वासुदेवाचें उपनयन

याप्रमाणें वासुदेव आपल्या पित्याच्या घरीं शुक्लेन्दुवत् वाढत असतां त्यांना आठवें वर्ष लागलें. "अष्टवर्षं ब्राह्मणमुपनयीत" या श्रुतीच्या आज्ञेप्रमाणें मध्यगेहभट्टांनीं आपल्या मुलाचें उपनयन करण्याचें ठरविलें. ब्राह्मणांत उपनयन संस्कार हा फार महत्त्वाचा असा गणला जातो. उपनयनोत्तर मुलास द्विजत्व येऊन वेदपठणाचा अधिकार प्राप्त होतो. उपनयनानंतर गायत्री मंत्राचा जप करण्याचा अधिकार प्राप्त होतो. उपनयन-संस्कार पुढील सर्व गोष्टीला मूल कारण आहे. उपनयन झाल्यावर बटूनें अग्नि, सूर्य या प्रतीकरुपानें श्रीहरीची वेदोक्त उपासना करावी लागते. आतां सध्यांच्या कालांत उपनयनाचें स्वरूप विकृत झालेलें असलें तरी त्याचें स्वरूप फार शुद्ध उदात्त असें आहे. मध्यगेहाचार्य स्वतः उत्तम पुराणिक होते. भारत, भागवत इत्यादि ग्रंथामध्यें त्यांची अप्रतिम गति होती. कित्येक लोक पुराणिक म्हटला कीं, त्याचेकडे किंचित् उपहासबुद्धीनें पहातात. पण भारत, भागवत हे ग्रंथ लोकांना विशद करून सांगणें सामान्य तऱ्हेच्या व्युत्पन्न मनुष्याला शक्य होत नाहीं. म्हणून "**विद्यावतां भागवते परीक्षा**" अशी म्हण पडली आहे. मध्यगेहाचार्यांनीं वासुदेवास मौंजीबंधनाच्या अगोदर व्युत्पत्तिज्ञान उत्तम करून दिलें होतेच, पण वेदाचें अध्ययन होणें जरुर होतें. म्हणून गुरुबल वगैरे पाहून एका शुभमुहूर्तावर त्यांनीं आपल्या चिरंजीवाचें उपनयन केलें. तो त्यांच्या घरांत होणारा मंगलमहोत्सव प्रथम व एकुलत्या एक मुलाचा असल्यामुळें साहजिकच विशेष संभ्रमानें केला असल्यास नवल नाहीं.

वासुदेवाचें मध्यगेहाचार्यांनीं उपनयन केल्यानंतर धर्मशास्त्राप्रमाणें वेदाध्ययनाचा अधिकार प्राप्त झाला. लोकशिक्षणार्थ अवतार घेतलेल्या वासुदेवांनीं आपल्या उपनयनोत्तर ब्रह्मचर्याश्रमांतील सर्व आन्हिक कृत्यें

अत्यंत विधियुक्त करावींत. ब्रह्मचर्याश्रमांतील सर्व नियम त्यांनीं अगदीं तंतोतंत पाळावेत. आपला मुलगा न सांगतांहि व्यवस्थितपणें सर्व धर्माचरण करीत आहे हें पाहून मध्यगेहाचार्यांना व वेदवतीला अत्यंत आनंद व्हावा. त्यांनाच काय? वासुदेवाची बटुमूर्ति पाहून कोणालाहि संतोषच झाला असता. वासुदेव हे जात्याच अतिशय सुन्दर होते. त्यांतून ब्रह्मचर्याचें तेज त्यांचे मुखावर दिसे. त्यामुळें बालरविकडे पाहतांना जी मनुष्याची स्थिति होते, तद्वत् प्रत्येकाची स्थिति वासुदेवाच्या सान्निध्यांत होत असे.

## बाल वासुदेवाचें सामर्थ्य

हा बालब्रह्मचारी नेहमीं सर्वत्र संचार करीत असे. अशा तऱ्हेनें एकदां हिंडत असतां एका अत्यंत विषारी सापावर त्याचा पाय पडला. तमोगुणी सर्पास तेवढें तरी कसें सहन होणार? त्यानें तात्काल वासुदेवास दंश करण्याकरतां धांव घेतली. दुसरा एखादा मुलगा असतां तर तो भीतिनेंच अर्धमेला झाला असता. आजूबाजूला वासुदेवाच्या मदतीलाहि कोणी येण्यासारखें नव्हतें. जवळजवळ वासुदेवाच्या जीवावरचेंच ते संकट होते. मोठा शक्तिसंपन्न मनुष्यसुद्धां त्या विषारी सापाचें भयंकर स्वरुप पाहून घाबरला असता. पण वासुदेव अगदीं शांत होते. तो सर्प जवळ येण्याबरोबर त्याच्या तोंडावर त्यांनीं आपली टांच ठेवली व हातानें त्याची शेपटी धरून टाचेखालीं चिरडून त्या सापास ठार मारलें. अशा तऱ्हेनें वासुदेवास दंश करावयास आलेल्या सर्पास स्वतःच्याच जीवितास मुकावें लागले.

वासुदेवाच्या उपनयनानंतर थोड्याच दिवसांनीं मध्यगेहाचार्यांनीं पूगवन* वंशांतील एका विद्वान् आचार्याकडे वासुदेवास अध्ययनाकरितां पाठविले.

या ठिकाणीं वासुदेवाचें वेदाध्ययन व शास्त्राध्ययन सुरू झाले. यावेळीं वासुदेवाच्या अंगीं लहानपणचा हूडपणा भरपूर होता. अध्ययनाच्या बाबतींत जसें त्यांच्यापेक्षां बरचढ कोणीहि नव्हते तद्वत्च हूडपणांतहि

* नारायणपंडिताचार्यांनीं आपल्या टीकेंत पूगवन शब्दाचा उल्लेख "तोटिल्लाय इत्यपभ्रष्टभाषा" असा केला आहे.

त्यांच्यापेक्षां वरचढ कोणीहि नव्हते. लांब उडी मारणें, उंचावरून उडी मारणें, नदी, सरोवर यांत पोहणें व इतर खेळ यामध्यें तेवढया लहान वयांतहि त्यांची बरोबरी कोणी करूं शकत नसे. समवयस्क विद्यार्थ्यांबरोबर पाठ घ्यावा पण सर्वांच्या अगोदर त्यांनीं हस्तगत करून पुन्हां खेळावयास तयार व्हावें. दहा–पांचजणांनीं घट्ट धरावें, पण वासुदेवानें सर्वांच्या हातून आपली सुटका करून घ्यावी. वासुदेवांच्या हातून मात्र कोणासहि स्वतःस सोडवून घेतां येत नसे. तीच गोष्ट कुस्त्या वगैरे बाबतींत असे. हीं सर्व कृत्यें भीमसेन अवतारी केलेल्या अचाट कृत्याच्या मानानें कांहींच नव्हेत.

ज्यावेळीं पाहावें त्यावेळीं वासुदेव हा खेळण्यांत गर्क असतो हें पाहून गुरुजींनीं रागवावें. त्यावेळीं वासुदेवांनें गुरुजींनीं दिलेले सर्व पाठ बिनचूक म्हणून दाखवावेत. त्यामुळें वासुदेवाच्या अलौकिक बुद्धिमत्तेबद्दल सर्वांची खात्री पटूं लागली. त्यामुळें पुढें पुढें गुरुजींनीं सर्व विद्यार्थ्यांना सोडून एकट्यालाच पाठ सांगावा. त्याचा परिणाम असा झाला कीं तीन चार वर्षांतच संहिता, पद, ब्राह्मण, क्रम, जटा, घन इत्यादिकांत व न्यायादि शास्त्रांत त्यांनीं अप्रतिहतगति मिळवली. पुढें पुढें वासुदेवाची विलक्षण बुद्धिमत्ता, सामर्थ्य इत्यादिकांमुळें वासुदेव हा सामान्य कोणीतरी नसून हा दैवी अंशांनीं युक्त असावा असेंच त्यांना वाटूं लागलें. पुढें तर एका गोष्टीमुळें त्यांच्या समजुतींत भरच पडली.

या गुरुजींचा मुलगा लहानपणापासून मस्तकशूळाच्या व्यथेनें अतिशय त्रस्त असे. यावर अनेक नामांकित वैद्यांचे उपाय या गुरुजींनीं करविले होते. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. इतकेंच नव्हे तर ती व्यथा उत्तरोत्तर वाढतच होती. एके दिवशीं या मस्तकशूळाच्या व्यथेनें तो त्रस्त झाला असतां त्याची ती स्थिति पाहून वासुदेवाचें दयाळु मन द्रवलें व त्यांनीं तात्काल त्या मुलाजवळ जाऊन त्याच्या कानांत दोनतीनदां फुंकर मारली. त्याबरोबर काय चमत्कार ? अनेक प्रभावी औषधांनीं जी व्यथा गेली नाहीं ती व्यथा वासुदेवाच्या नुसत्या फुंकरानेंच नाहींशी झाली. पुन्हां कधीं त्या मुलाला मस्तकशूळ झाला नाहीं. या कृत्यामुळें सर्वांची वासुदेवाच्या दैवी अंशाबद्दल खात्री झाली.

या वेळेपर्यंत वासुदेवाची विद्यार्थिदशा परिपूर्ण होत आली होती. त्यांच्या बरोबरीचे सर्व विद्यार्थी वासुदेवाबरोबर अध्ययन करूं न शकल्या-मुळें बरेंच मागे राहिले होते. त्यामुळें त्यांचे गुरुजी वासुदेवास एकट्या-लाच स्वतंत्रपणें पाठ सांगत असत. अध्ययन संपल्यानंतर आतां गुरु-दक्षिणा म्हणून काय द्यावी याचा विचार वासुदेवांनीं चालविला होता.

उपनिषदांचा पाठ चालू होता. वासुदेवांनीं तो पाठ ऐकून घ्यावा. अशा तऱ्हेनें पाठ चालू असतां ऐतरेय उपनिषद् सुरू झालें. त्यांच्या गुरुजींनीं नेहमींच्या पद्धतीनें ऐतरेय उपनिषदाचाहि पाठ सुरू केला. त्यावेळीं वासुदेवांनीं आपल्या गुरुजीस ऐतरेय उपनिषदाचा वास्तविक अर्थ कोणता ? हें विशद करून सांगितलें. त्यांमुळें गुरुजींना अत्यंत विस्मय वाटला. त्यांचे ठिकाणीं वासुदेवांनीं ऐतरेय उपनिषदाच्या सांगितलेल्या अर्थामुळें निश्चयात्मक रीतीनें विष्णुसर्वोत्तमज्ञान उत्पन्न झालें व त्यामुळें श्रीहरीचे ठिकाणीं अनन्यभक्ति निर्माण झाली. वासुदेवांनीं आपल्या गुरुस हीच परमश्रेष्ठ अशी श्रीहरीची भक्तिरुपी दक्षिणा दिली. गुरुजींना वासुदेवानें सांगितलेल्या अर्थामुळें नवीन दृष्टि प्राप्त झाली. त्यामुळें आपले आयुष्य सफल झाले म्हणून त्यांना परमानंद झाला.

लोकशिक्षणार्थ अध्ययनार्थ पत्करलेला गुरुकुलवास संपल्याबरोबर वासुदेवांनीं आपल्या घरीं परत जाण्याची तयारी चालविली. इतक्यांत अदृश्यरूपानें सर्व देवांनीं येऊन प्रार्थना केली.

अयि स्वामिन् दुष्टान् दमय दमय व्यक्तमचिराद्
गुणान् गूढान् विष्णोः कथय कथय स्वान् प्रमदयन् ( म. ३–५६ )

[प्रभो, दुष्टांचे निराकरण करा, श्रीहरीचे गूढ असणारे गुणसमुदाय स्पष्टतया सांगून विष्णुभक्तांना आनंद द्या. ]

याप्रमाणें सर्व देवांची प्रार्थना ऐकून वासुदेव आपल्या गुरुजींची आज्ञा घेऊन लगेच घरीं परतले.

आपला मुलगा विद्वान् झाला हें पाहून कोणत्या मातापित्यांस आनंद वाटणार नाहीं ? मध्यगेहाचार्य व वेदवती यांना वाटूं लागलें कीं, आतां आपल्या मुलाचा एकदां विवाह करून त्याला संसाराला जोडलें कीं, आपण कृतकार्य झालों. मग आपला पुत्र धन, कीर्ति मिळवील व नातू

आपल्या अंगावर खेळतील. व आपली वृद्धावस्था तरी आनंदांत व सुखांत जाईल. पण विधिघटना निराळीच होती. वासुदेवांच्या मातापित्यांच्या मनांत जे विचार सुरू होते त्याच्या अगदीं नेमके विरुद्ध असे विचारतरंग वासुदेवांच्या मानससरोवरांत उठत होते.

"आपण ज्या कार्यासाठीं अवतार घेतला आहे तें कार्य गृहस्थाश्रम स्वीकारून करतां येणार नाहीं. त्याकरितां आपण संन्यासच ग्रहण केला पाहिजे." अशा तऱ्हेनें वासुदेव जो जो विचार करूं लागले तों तों त्यांचा संन्यासग्रहणाचा निश्चय पक्का होऊं लागला.

एके दिवशीं वासुदेवांनीं ठाम निश्चय करून सर्वांना न कळत ते गुरुच्या शोधार्थ बाहेर पडले. गुरुच्या शोधाकरितां घराबाहेर पडल्याबरोबर रजतपीठपुरास कोणी एक सन्यासी येऊन राहिले आहेत अशी त्यांस वार्ता कळली. त्याबरोबर त्यांनीं रजतपीठपुराकडे गमन केलें. त्या ठिकाणीं अच्युतप्रेक्ष नांवाचे यति अनंतेश्वराची उपासना करीत राहिले होते. त्यांचेकडे येऊन साष्टांग नमस्कार केला व आपणास संन्यास द्यावा अशी प्रार्थना वासुदेवांनीं अच्युतप्रेक्षमुनींची केली.

---

## प्रकरण ४ थें

# अच्युतप्रेक्ष यतींची परंपरा

श्रीआनंदतीर्थ उर्फ मध्वाचार्यांनीं ज्यांचेपासून संन्यासाश्रम स्वीकारला त्यांची पूर्वपीठिका सांगणें जरूर आहे.

श्रीहरीच्या नाभिकमलांतून प्रगट झालेले ब्रह्मदेव यांचे मानसपुत्र सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार असे चार होत. हे स्वभावतःच सत्त्वगुणी असल्यामुळें ते आध्यात्मिक ज्ञानांत मग्न होते. ब्रह्मदेवापासून त्यांनीं श्रीहरीविषयक यथार्थ ज्ञान मिळविलें. याच वेळीं गरुडशेषरुद्रादिकांनींहि हें हरिसर्वोत्तमत्त्वज्ञान मिळविलें.

सनकादिकांकडून पुढें हरिसर्वोत्तमत्त्व ज्ञानपरंपरा अखंडपणें कित्येक शतकें चालू होती. मध्यंतरीं याला कृतयुगाच्या शेवटीं किंचित् उतरती कळा लागली होती. प्रबल झालेल्या दैत्यापुढें सत्वगुणी जीवांचें कांहीं चालेना. तेव्हां तन्नाशार्थ श्रीहरीनीं श्रीरामचंद्र या नांवाचा अवतार घेतला. श्रीरामचंद्रांची सेवा घडावी म्हणून वायुदेवांनीं हनुमंत हा प्रथम अवतार घेतला. रावणादि दैत्यांचा वध होऊन भूभारहरण केल्यानंतर सनकादिकांच्या वंशजांना वायुदेवांनीं लुप्त होत चाललेल्या विष्णुसर्वोत्तमज्ञानाचा उपदेश केला. त्यानंतर मात्र हा ज्ञानदीप कित्येक सहस्र वर्षें अखंड तेवत राहिला. सनकादिकांचे शिष्य मरीच्यादि ऋषि त्यांची परंपरा दुर्वासांनीं चालविली. दुर्वासानंतर या विष्णुसर्वोत्तमज्ञानाचा प्रसार करणारे गरुडवाहनतीर्थ नांवांचे यति होऊन गेले. गरुडवाहनतीर्थांनीं या ज्ञानाचा अखंडपणें प्रसार केला. त्याचा लोकांच्या मनावर झालेला परिणाम शतकानुशतकें राहिला, यांत शंका नाहीं तेजस्वी असें नांव त्यांनाच येतें कीं, ज्यांची कृति सतत शतकानुशतकें प्रकाशमान् होते. गरुडवाहनतीर्थानंतर कित्येक शतकांनीं कैवल्यतीर्थ नांवांचे यति होऊन गेले. या यतींनीहि

**विष्णुसर्वोत्तमत्वरूप** ज्ञानदीपावर जी काजळी आली होती ती झाडून तो दीप पुन्हां प्रज्वलित केला.

कैवल्यतीर्थानंतर ज्ञानेशतीर्थ नांवाच्या यतींनीं महान् कामगिरी बजावली. वास्तविक पहातां हा इतिहास, मध्यंतरी होऊन गेलेल्या श्रीपादांची नांवें, हीं सर्व देणें जरूर होतें. पण कालाच्या ओघामध्यें पुष्कळ ग्रंथसंपत्ति नष्ट झाल्यामुळें उपलब्ध साधनांवरून सुसंगत इतिहास लिहिणें कठीण झालें आहे. ज्ञानेशतीर्थानंतर कित्येक वर्षांनीं परतीर्थ नांवाचे यति पीठावर आले. परतीर्थ हे जसे विद्वान् होते, तसेच ते अत्यंत तपस्वी होते. यांचे ठिकाणीं शापानुग्रहाचें सामर्थ्य होतें. ज्ञानेशतीर्थानंतर बौद्धमताचा प्रसार झाला होता. बौद्धमताचा पाडाव करण्याचे कामीं परतीर्थांनीं* अत्यंत परिश्रम केले. त्यामुळें बौद्धांचा पाडाव झाला वर्णाश्रमधर्मास पुन्हां चालना मिळून यज्ञयागादिक पूर्ववत् सुरू झाले. त्यामुळें वर्णाश्रमधर्मीयांचे मनांत परतीर्थांबद्दल अतिशय प्रेम व आदर निर्माण झाला होता. परतीर्थानंतर सत्यप्रज्ञतीर्थ हे पीठावर आले. सत्यप्रज्ञतीर्थ अतिशय विद्वान् होते. त्यांनीं विष्णुसर्वोत्तमत्त्वज्ञानाचा प्रसार केला. याच वेळीं शंकराचार्यांनीं आपल्या सुप्रसिद्ध मायावादाचा प्रसार चालविला. त्यांनीं अनेकांना वादांत पराभूत केले, पण सत्यप्रज्ञतीर्थांना जिंकणें शक्य झालें नाहीं. सत्यप्रज्ञतीर्थ नंदिग्राम नांवाच्या गांवीं राहून आपल्या शिष्यांना विष्णुसर्वोत्तमत्वाचा उपदेश करीत होते. सत्यप्रज्ञांचा पाडाव करणें शंकराचार्यांना शक्य झालें नाहीं. **शंकराचार्य** समाधिस्थ होण्याचे वेळीं त्यांच्या चार शिष्यांनीं त्यांना विचारलें कीं, महाराज आपली काय आज्ञा आहे ? त्यावेळीं शंकराचार्यांनी सांगितलें कीं, “ विष्णुसर्वोत्तमत्वाचा प्रसार करणारे परतीर्थांचे शिष्यपरंपरेंतील सत्यप्रज्ञादिक संन्यासी आहेत त्यांचा पाडाव करा.” याबद्दल नारायण पंडिताचार्यांनी खालीलप्रमाणें लिहिलें आहे.

*बौद्धमताचा पाडाव करण्याचे कामीं शंकराचार्यांनीं महान् परिश्रम केले अशी किंवदन्ती आहे. त्याला कांहीच आधार नाहीं. वै. श्रीमत्सत्यध्यानतीर्थांनीं या विषयावर एक स्वतंत्र पुस्तक लिहिलें असून त्यांत या विषयाचा सांगोपांग विचार केला आहे.

मुमूर्षुं स्वगुरुं दृष्ट्वा मायिनो वेदविद्विषः।
भगवन्नपरः कृत्यं किमपृच्छन् ससंभ्रमाः ॥
स स्माह तान् कृतप्रायं सत्यं कृत्यं महासुराः।
उत्साद्यतामथ क्षिप्रं परतीर्थार्यशिष्यकाः ॥

मणिमंजरी ७ स. १८।१९

याचवेळीं सत्यप्रज्ञतीर्थ वृंदावनस्थ झाले. सत्यप्रज्ञतीर्थानंतर प्राज्ञतीर्थ नांवाचे यति पीठावर आले. ज्या सत्यप्रज्ञांचा पाडाव करणें खुद्द शंकराचार्यांनाहि शक्य झालें नाहीं त्याच मठाचा पाडाव निराळ्या तऱ्हेनें त्यांच्या शिष्यांनीं सत्यप्रज्ञतीर्थांच्या मृत्युनंतर केला.

शंकराचार्यांनीं अनुज्ञा दिल्याप्रमाणें सत्यतीर्थांशीं वादविवाद करून त्यांचा पराभव करण्यासाठीं अनेक शिष्य, पंडित निघाले. पण ही गोष्ट साधी व शक्य कोटींतील आहे असें त्यांच्या मनास वाटेना. तेव्हां त्या शिष्यांनीं एका निराळ्या पद्धतीचा अवलंब केला. पुढाऱ्यांनीं एखादी गोष्ट सांगितली नसली तरी उत्साहाच्या भरांत सूक्तासूक्त मार्गाचा अवलंब अनुयायी करीत असतात. या नियमाप्रमाणें त्या शिष्यांनीं आपल्याबरोबर कांहीं लोक घेऊन सत्यतीर्थांच्या मठावर आक्रमण केलें. मठ व मठांतील चीजवस्तू जाळून पोळून उध्वस्त करून टाकल्या. आपल्या मठाचा नाश झालेला पाहून प्राज्ञतीर्थ आपल्या शिष्यांसह जगन्नाथक्षेत्रास आले. त्यांचे पाठोपाठ ते शंकराचार्यांचे शिष्यहि आलेच. त्यांनीं प्राज्ञतीर्थांना एकस्थानां गांठून बलात्कारानें अद्वैतज्ञानाचा उपदेश करून त्यांना भस्म लावण्यास भाग पाडलें. शांकरभाष्यहि ऐकविलें. पण या सर्व गोष्टींचा परिणाम प्राज्ञतीर्थांवर मात्र उलटा झाला; पण बाहेरून मात्र भस्मधारणादि त्यांनीं केलें. त्यामुळें शंकराचार्यांच्या शिष्यांना प्राज्ञतीर्थ हे आपल्या मताचे अनुयायी झाले असें वाटलें. पण पुढें प्राज्ञतीर्थ म्हणजे जळजळीत निखारा आहे असें त्यांना दिसून येऊं लागलें. प्राज्ञतीर्थ हे अत्यंत आचारसंपन्न होते. त्यामुळें दुराचारी मायावादी संन्याशांचा तिरस्कार करीत. मनुष्य कितीहि जरी दुष्ट झाला तरी त्याला कधींना कधीं सत्वगुणापुढें पराभूत व्हावें लागतेंच. त्यामुळेंच शंकराचार्यांच्या शिष्यांना

त्यांच्या दुराचरणाबद्दल केलेला तिरस्कार सहन करवेना! व इंद्रियलौल्यहि स्वस्थ बसूं देईना! त्यामुळे ते प्राज्ञतीर्थांपासून दूर राहण्याचा प्रयत्न करूं लागले. हलके हलके प्राज्ञतीर्थांसभोंवती असणारा दुष्ट मानवांचा गराडा नाहींसा झाला. कालांतरानें आपल्या सभोंवती कोणीच महत्वाचा मायावादी उरला नाहीं हें पाहून त्यांनीं आपल्या सच्छिष्यांना एकांतीं बोलावून सांगितलें कीं, माझ्या सभोंवती असणारे मायावादी निघून गेले आहेत. तरी मी चातुर्मास्यानंतर परत नंदिग्रामाकडे जाणार आहे. तरी तुम्ही सर्वजण तिकडे चला.

या प्राज्ञतीर्थांच्या आज्ञेप्रमाणें सर्व शिष्यपरिवार परत नंदिग्रामास गेला चातुर्मास्य आटोपल्यावर प्राज्ञतीर्थांनीं ज्ञाताज्ञात दोषपरिहारार्थ गंगास्नान केले, व तेहि परत नंदिग्रामास आले. त्यावेळीं तेथील सर्व आबालवृद्धांना अत्यानंद झाला. कांहीं दिवस नंदिग्रामांत राहून आपल्या शिष्यांसमवेत बदरिकाश्रमीं अलकनंदा नदीच्या तीरीं तपश्चर्या करण्याकरितां प्राज्ञतीर्थ आले. प्राज्ञतीर्थांनीं नित्यशः श्रीहरीची प्रार्थना करावी.

नारायण नमस्तुभ्यं नमो वस्तात्विकास्सुराः ।
हा हा नः सुगतिं देहि गुरो नाथेति चुक्रुशुः ॥

याप्रमाणें नित्यशः तपश्चर्या व प्रार्थना चालू असतांना अनेक महर्षि-सहवर्तमान साक्षात् सत्यप्रज्ञतीर्थांनीं प्राज्ञतीर्थांना दर्शन देऊन सांगितले,

'हे सच्छिष्यांनो, तुम्ही घाबरूं नका. तुम्ही सर्वजण पुरुषोत्तमाच्या संनिध (जगन्नाथक्षेत्रांत) राहून त्याची उपासना करा. तुम्ही तूर्त मायावाद्यांच्या छंदानें बेलाशक वागा. पण अंतःकरणांत मात्र सत्तत्वाचें चिंतन करा.

नारायणः परस्वामी सत्यज्ञानादिसद्गुणः ।
तस्य दासोस्म्यहं सत्यमित्युपासापि वर्ततां ॥

अशा रीतीनें आपल्या हरिप्रणीत तत्वाचा विसर पडूं न देतां क्रमाक्रमानें या तत्वावर निष्ठा असणाऱ्यांसच शिष्यत्व द्या, कालांतरानें या तत्वाचा उद्धार करून त्याचा प्रसार करणारा महानुभव श्रीहरीप्रेरणेनें पृथ्वीतलावर अवतीर्ण होईल."

याप्रमाणें प्राज्ञतीर्थांना संदेश मिळाल्यावर अत्यंत प्रमुदित मनानें सर्वजण जगन्नाथक्षेत्रांत आले. कांहींजण नंदिग्रामाकडे आले. याप्रमाणें परत स्वस्थानीं आल्यावर वैदिक तत्वावरील श्रद्धा ढळू न देतां श्रीहरीची उपासना करीत आपली कालक्रमणा करूं लागले. सत्यप्रज्ञतीर्थांनीं दिलेल्या संदेशाप्रमाणें प्राज्ञतीर्थांनीं आपल्या वृद्धावस्थेंत आपल्या एका सच्छिष्यांस विष्णुसर्वोत्तमत्वज्ञानाचा उपदेश करून आश्रम दिला व स्वतः वृंदावनस्थ झाले. अशा तऱ्हेचा क्रम अनेक वर्षें चालला होता. प्राज्ञतीर्थांप्रमाणेंच प्रत्येक शिष्यास गुरुनीं उपदेश करावा.

या तऱ्हेनेंच या पीटावरील यतींचा कार्यक्रम चालू असतां अच्युतप्रेक्षतीर्थ नांवाचे यति त्या पीठावर आले. यांचे गुरूंनीं पूर्वपद्धतीप्रमाणें आपल्या शिष्यास उपदेश केला कीं,

" हे सच्छिष्या, आजपर्यंत ज्या ब्रह्मात्म्यैक्यवादाचा अभ्यास केलेला आहेस तें तत्त्व खरें नाहीं. माझ्या आयुष्यांतहि त्याचा प्रत्यय आला नाहीं. इतकेंच नव्हे, माझ्या पूर्वी जे मोठमोठे विरक्त व तपस्वी असे आमच्या परंपरेमध्यें होऊन गेले, त्यांनाहि हें तत्त्व पटलें नाहीं. एवढ्याकरितां यांचेवर तूं मुळींच विश्वास ठेवूं नकोस. ( मध्वविजय सर्ग ४ श्लोक १०–११ ) लवकरच तुला सच्छास्त्राचें यथार्थज्ञान देणारा शिष्य लाभेल.

याप्रमाणें अच्युतप्रेक्षाचार्यांना त्यांच्या गुरूंनीं सांगितलें असल्यामुळें अशा शिष्याची वाट पहात अच्युतप्रेक्षयती आपल्या त्या प्रांतांत संचार करीत असत. अशातऱ्हेनें ते संचार करीत रजतपीठपुर ( उडुपी ) येथें आले असतां वासुदेवांनीं त्यांचेजवळ जाऊन आपणांस संन्यासदीक्षा देण्याबद्दल प्रार्थना केली.



## प्रकरण ५ वें

# संन्यासग्रहण



वासुदेव आपल्या गांवाहून संन्यासाश्रम स्वीकारण्याच्या उद्देशानें उडुपी येथें अच्युतप्रेक्षयतीकडे आले. याचवेळीं मध्यगेहभट्टांनी वासुदेव कोठेंहि दिसेना म्हणून शोध चालविला. गांवांत कोठेंहि वासुदेव नाहीं हें पाहून त्यांना अतिशय चिंता उत्पन्न झाली वासुदेव नेहमीं उडुपीस जात असत. म्हणून वासुदेव कदाचित् तिकडे गेले असावेत असा विचार करून मध्यगेहाचार्य उडुपीस आले. वासुदेव त्याठिकाणीं होतेच. मध्यगेहाचार्यांना वासुदेवास पाहून अत्यानंद झाला. पुढें त्यांनीं वासुदेवास घरीं चलण्यास सांगितलें. पण वासुदेवांनीं सांगितलें कीं, " मी याच ठिकाणीं मठांत राहणार असून स्वामीपासून संन्यासाश्रम घेणार आहे. "

हें ऐकल्याबरोबर मध्यगेहाचार्यांना फारच दुःख झालें. " मनसा चिंतितं कार्यं दैवमन्यत्र चिंतयेत् " या सुभाषिताप्रमाणें त्यांची स्थिति झाली. त्यांना वासुदेवास संन्यासग्रहणापासून परावृत्त कसें करावें हें सुचेना. ते भांबावून गेले. त्यांच्या मनास हा अनपेक्षित धक्का बसला. कांहीं वेळानें मध्यगेहभट्टांनीं निरनिराळ्या तऱ्हेनें गोड बोलून, किंचित् रागावून, धाकदपटशा दाखवून त्यांना संन्यासग्रहणापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्याबरोबर मध्यगेहभट्टांनी धर्मशास्त्राच्या आधारें वादविवादहि केला. " वृद्धावस्थेंत मातापित्यांची सेवा करणें " हेंच खरें पुत्राचें कर्तव्यकर्म आहे, असें मध्यगेहभट्टांनीं वासुदेवास पटवून देण्याचा प्रयत्न केला. वासुदेवांनी त्यांचें भाषण ऐकून अत्यंत नम्रपणानें सांगितलें कीं,

" तात, या तऱ्हेनें परमात्मपदाची प्राप्ति व्हावी या इच्छेनें संन्यासाश्रम स्वीकारणाऱ्यास प्रतिबंध करूं नये असें शास्त्रवचन आहे, तरी तुम्ही कां अडथळे आणतां ! "

मध्यगेहाचार्यांनीं आपल्या आयुष्यांत सुख असें फारच थोडें भोगलें होतें. त्यांची सर्व दृष्टि वासुदेवावर होती. वासुदेव विद्वान् झाला आहे, त्याचा विवाह करावा, त्याला चारदोन मुलें झालीं कीं संसाराची धुरा वासुदेवाच्या खांद्यावर सोंपवून आपण हरिनामस्मरण करीत रहावें अशी त्यांची इच्छा होती. पण झालें भलतेंच. वासुदेव कोणत्याहि मार्गानें वळत नाहीं हें पाहून मध्यगेहाचार्यांनीं त्यांना नमस्कार केला. त्याबरोबर वासुदेव अत्यानंदानं म्हणाले:—

"अहो तात, या नमस्कारानें तुम्ही मला संन्यासग्रहणास परवानगीच दिली आहे. कारण वडील मंडळी, संन्यासी मनुष्याशिवाय इतरांना—आपल्यापेक्षां लहान असणाऱ्यांना—नमस्कार करीत नाहींत. मी तुमचा पुत्र आहें, तुम्ही मला नमस्कार करणें योग्य नव्हतें. तरी पण तुम्ही मला नमस्कार केलात त्यामुळें मला संन्यासग्रहणास परवानगी दिल्यासारखी झाली आहे."

वासुदेवांचें भाषण ऐकून मध्यगेहभट्टांना कांहींच सुचेना. ते परत आपल्या गांवीं आले. पण त्यांना कांहीं सुचेना! जेवणखाण करावेंसें वाटेना. झोंप उडाली. कामधंदा सुचेना. आयुष्यांत जिकडे तिकडे अंधःकार दिसूं लागला. मध्यगेहाचार्यांप्रमाणेंच त्यांच्या पत्नीची स्थिति झाली. नारदाच्या उपदेशानें हर्यश्वानीं संसाराचा त्याग केला म्हणून प्राचेतस दक्ष प्रजापतीला जसें अनिवार दुःख झालें, तद्वत् स्थिति मध्यगेहाचार्यांची व त्यांच्या पत्नीची झाली. शेवटीं त्यांना कांहींच सुचेना. वासुदेवावांचून त्यांना जगणेंहि अशक्य वाटूं लागलें. म्हणून ते उभयतां पतिपत्नी वासुदेवाची भेट घेण्याकरितां परत उडुपीस आले. पण त्यावेळीं अच्युतप्रेक्ष यती तेथें नव्हते. ते संचार करूं लागले होते. तेव्हां त्यांचा शोध करीत असतां कर्पुर या गांवीं ते असल्याचे त्यांना कळलें. कर्पुर हा गांव मंगरूळ जिल्ह्यांत असून तेथें नेत्रावती नांवाची नदी वाहते. त्या ठिकाणीं अच्युतप्रेक्षतीर्थांचा मुक्काम होता. त्या ठिकाणीं मध्यगेहभट्ट व वेदवती हीं उभयता आलीं. यावेळीं मध्यगेहभट्टांनीं व त्यांच्या पत्नीनीं नानातऱ्हेनें उपदेश केला. पण त्याचा कांहींच परिणाम त्यांचे मनावर झाला नाहीं. शेवटीं मध्यगेह रागावून म्हणाले:—

"आम्ही तुझे जन्मदाते, पण आमची किंमत तुला कांहींच नाहीं. आमच्या अंतःकरणाची स्थिति तुला जाणतां येत नाहीं. आम्हीं म्हातारपणीं कोणाच्या तोंडाकडे पहावें ? आईबापास त्रास देऊन संन्यास घेतलास तर त्यापासून काय फळ मिळणार आहे ? उलट मातृपितृद्रोह मात्र होईल."

आपल्या वडिलांचें रागाचें भाषण ऐकून वासुदेवांचा निश्चय मुळींच ढळला नाहीं. आपल्या वडिलांचा क्रोध शांत झाल्यावर त्यांनीं शांत व मधुर वाणीनें बोलण्यास प्रारंभ केला. निरनिराळ्या रीतीनें कोणाच्याहि संन्यासग्रहणास प्रतिबंध करूं नये असें समजावून सांगितलें. शेवटीं वासुदेव म्हणतातः—

"तुम्हांस तुमचे वृद्धावस्थेंत रक्षण करणारा एक पुत्र होईल, मग तर तुमचें समाधान होईल ना ?"

वासुदेवांच्या भाषणावर मध्यगेहाचार्यांना कांहींच बोलणें सुचेना ! म्हणून मध्यगेहाचार्यांनीं वासुदेवास सांगितलें कीं, "तुझी माता जर तुला अनुज्ञा देईल तर बेलाशक तूं संन्यासाश्रम स्वीकार."

मध्यगेहाचार्यांचें समाधान करणें वासुदेवांना सहज शक्य होतें. पण वेदवतीचें—आपल्या मातेचें—समाधान करणें अतिशय कठिण होतें. कारण त्यांना आपल्यावर असलेल्या मातेच्या प्रेमाची पूर्ण जाणीव होती. पितृसेवेचें महत्वहि ते जाणून होते. म्हणून त्यांना आपल्या आईचें समाधान करण्याची जरुरी वाटली. त्यांनीं आपल्या मातेस नाना तऱ्हेनें उपदेश करून शेवटीं आपल्या आईलाहि सांगितलें कीं,

"तुम्हांस अत्यंत सुलक्षणी असा आणखीन् एक पुत्र होईल. व तोपर्यंत मी तुमचेजवळ राहीन." याप्रमाणें सांगून आपल्या मातापित्यासमवेत ते अच्युतप्रेक्षयतींची अनुज्ञा घेऊन परत आपल्या गावीं आले. वासुदेव आपल्या आईबापाजवळ एक वर्षभर होते. पुढें वासुदेवांनीं सांगितल्याप्रमाणें वेदवतीला मुलगा झाला. (हेच पुढें विष्णुतीर्थ या नांवानें प्रसिद्ध झाले.) आपल्या बंधूचा जन्म झाल्यानंतर वासुदेवांनीं कबूल केल्याप्रमाणें संन्यासग्रहणाची अनुज्ञा मागितली. कोणत्या मातेला आपल्या मुलानें संन्यास घ्यावा असें वाटेल ? वेदवतीबाई संन्यासग्रहणास परवानगी देईना, हें पाहून मग मात्र वासुदेवांनीं सांगितलें कीं,

" तुम्ही जर मला संन्यासग्रहणासाठीं परवानगी दिली नाहींत तर मी देशांतरीं निघून जाईन व पुन्हां दृष्टीसहि पडणार नाहीं. "

या तऱ्हेनें म्हटल्यानंतर वेदवतीनें विचार केला कीं, वासुदेव बोलल्याप्रमाणें करण्यास चुकणार नाहीं. अशा स्थितींत संन्यास घेतल्यानंतर निदान तो आपल्या दृष्टीला तरी पडेल, अशा विचारानें त्या उभयतांनीं संन्याग्रहणास परवानगी दिली. मातापितरांची परवानगी मिळाल्याबरोबर लगेच ते अच्युतप्रेक्षयतीकडे आले व त्यांनीं तात्काळ संन्यास ग्रहण केला. अच्युतप्रेक्षयतींनीं त्यांचें नांव " पूर्णप्रज्ञ " असें ठेवलें.

वेदवतीनें अनुज्ञा दिल्यावर वासुदेवानीं पुढें मुळींच विलंब न लावतां अच्युतप्रेक्षयतीकडून संन्यासाश्रम स्वीकारला. संन्यास स्वीकारल्यानंतर त्यांचें नांव यतीनां ' पूर्णप्रज्ञतीर्थ " असें ठेवलें. एवढ्या लहान वयांत संन्यास स्वीकारला व त्यांच्या अलौकिक व्यक्तिमत्वामुळें ते सर्वांस वंद्य झाले असल्यास नवल तें काय ? यांनांच पुढें " मध्वाचार्य " असें नांव पडलें.

संन्यासग्रहणानंतर पूर्णप्रज्ञतीर्थांना गंगास्नानासाठीं जावें असें वाटूं लागलें. त्याप्रमाणें त्यांनीं गंगास्नानार्थ जाण्यासाठीं परवानगी मागितली. पण शिष्याचा व आपला वियोग होईल म्हणून त्यांना परवानगी देववेना. अशा वस्तस्थितींतच त्यांनीं आपल्या कुलदेवतेचें स्मरण केलें. त्यानंतर अनंतेश्वरांनीं एका पुरुषांत आविष्ट होऊन सांगितलें कीं, " तुम्हांस गंगास्नानास जाण्याची जरूरी नाहीं कारण आजपासून तिसऱ्या दिवशीं गंगा या सरोवरांत येईल व त्यानंतर प्रत्येक बारा वर्षांनीं येईल. या रीतीनें हा संदेश मिळाल्यानंतर त्या उभयतांना अत्यानंद झाला. पुढें तिसऱ्या दिवशीं गंगा प्रत्यक्ष प्रगट झाली. त्यावेळीं उभयतां गुरुशिष्यांनींत्यांत स्नान केलें. त्यांचे प्रमाणेंच इतरानीं स्नान करून स्वतःस पवित्र करून घेतलें.

आचार्यांनीं संन्यास वयाच्या कोणत्या वर्षी घेतला याविषयीं फार मतभेद आहेत. कोणी त्यांनीं वयाच्या सातव्या वर्षी, दहाव्या वर्षी, अठराव्या वर्षी आचार्यांनीं संन्यास घेतला असावा असें म्हणतात. याविषयीं दिलेलीं प्रमाणें आमचे मतें अगदीं निरुपयोगी आहेत. आमचे मतें आचार्यांच्या संन्यासग्रहणाचा काल काढण्याचा एक राजमार्ग आहे. यांत रूढ असलेल्या गोष्टी गृहीत धरल्या आहेत. आचार्य शके ११२१ या सालीं अवतरले व

शके १२१६ या सालीं अंतर्धान पावले. म्हणजे एकूण या मृत्युलोकावर ९५ वर्षे होते. त्यापैकीं ऐंशी ८० वर्षे ते पीठावर होते. यावरून शक ११३६ या सालीं म्हणजे वयाच्या पंधराव्या वर्षी त्यांनीं संन्यास घेतला असावा.

यानंतर थोड्या दिवसांनीं संचार करून पंडितांना जिंकण्याची इच्छा करणारे वासुदेवादिक नैयायिक श्रीमदाचार्यांबरोबर वादविवाद करण्यासाठीं आले असतां पूर्णप्रज्ञतीर्थांनीं त्यांचेबरोबर वादविवाद करून त्यांना वादांत जिंकलें.

अच्युतप्रेक्ष यतींना किंचित् अद्वैतमताबद्दल अभिमान असल्यामुळें आचार्यांना अच्युतप्रेक्ष यतींनीं इष्टसिद्धि नामक ग्रंथाचा पाट सांगण्यास प्रारंभ केला. पण आचार्यांनीं पहिल्या मंगलाचरणाच्या श्लोकांवर अनेक दूषणें दिलीं व आपल्या गुरूची प्रार्थना केली कीं, " महाराज, या दूषणांचा परिहार करा." पण अच्युतप्रेक्षयतींना त्या दूषणांचा परिहार करतां आला नाहीं. त्यामुळें अच्युतप्रेक्षयतींनीं सरळपणानें सांगितलें कीं, "तुम्ही पहिल्याच श्लोकांवर दिलेल्या दूषणांचा परिहार करणें हें माझ्या शक्तिबाहेरचें आहे." हें त्यांचें उत्तर ऐकून श्रवणार्थ आलेल्या श्रोत्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें. हा कालपर्यंत अद्वैतमताच्या प्रामाणिकपणाबद्दल कित्येकांच्या मनांत किंचित् संशय निर्माण झाला होता. पण आचार्यांनी घेतलेल्या या आक्षेपांचें आपआपल्यापरीनें सर्वांनीं निराकरण करण्याचा प्रयत्न मताभिमानानें केला, तरी श्रोत्यांचें समाधान मुळींच झालें नाहीं. त्यामुळें अद्वैतमतावरील विश्वास डळमळूं लागला. श्रोत्यांनाहि आचार्यांनी मांडलेल्या अश्रुतपूर्व विचारसरणीमुळें आनंद वाटूं लागला अच्युतप्रेक्ष यतींनीं त्यानंतर पुन्हां अद्वैतमताविषयीं प्रवचन केलें नाहीं. किंबहुना, जवळ जवळ प्रवचन करण्याचेंच सोडून दिलें. तेव्हां आचार्यांनीं प्रवचनें करण्यास प्रारंभ केला.प्रवचनाचे वेळीं अनेक तऱ्हांनीं मायावादाची अप्रामाणिकता त्यांनीं श्रोत्यांना दाखवावी. आचार्यांच्या अभिनव विचारसरणीमुळें चिकित्सक व निःपक्षपाती विद्वानांची मनें आचार्यांकडे आकर्षित होऊं लागलीं. आचार्यांचा प्रवचनाचे वेळीं एकदां वाक्प्रवाह सुरू झाला कीं, श्रोत्यांना तो गंगानदीप्रमाणें वाटत असे. या प्रवाहांत एकदां तरी अवगाहन करून स्वतःस पावित्र्य यावें एवढ्याकरितां सर्वांत अहमहमिका

चालत् असे. आचार्यांचे ग्रंथ जरी सूत्रमय असले तरी त्यांचें प्रवचन सुलभतेनें होत असावें असें मध्वविजयांतील वर्णनावरून वाटतें. बिनतोड कोटिक्रम, अप्रतिहत वक्तृत्व, वाणीचें माधुर्य, संशयनिवृत्ति करण्याची तत्परता इत्यादि गुणांमुळें आचार्यांचें प्रवचन ऐकण्यास श्रोत्यांची गर्दी उसळत असेल यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

श्रीमदाचार्यांच्या वक्तृत्वामुळें ज्या ठिकाणीं यांचा मुक्काम असे त्या ठिकाणीं अनेक चिकित्सक श्रोते येत असत. एकदां भागवताचें पूराण चालू असतां अनेकांच्या हातांत भागवताच्या निरनिराळया पाठभेदाच्या पोथ्या असतांनाहि वेदव्यासांना अभिमत असा पाठ कोणता हें आचार्यांनीं सांगावें. कित्येक श्रोत्यांनीं व एखादे वेळेस अच्युतप्रेक्षयतीनींहि, "हाच तुम्ही सांगितलेला भागवताचा पाठ वेदव्यासांना अभिमत आहे हें कशावरून?" असें मध्येंच विचारावें. आचार्यांनी सोपपत्तिक वेदव्यासाभिमत पाठ तो आपण सांगितलेलाच होय हें सिद्ध करून द्यावें. एकदां सर्वांनीं मिळून आचार्यांची परीक्षा पहाण्याचा निश्चय केला. एके दिवशीं नित्याप्रमाणें भागवतावर चर्चा चालू असतां अच्युतप्रेक्षयतींनीं विचारलें कीं, "नेहमीं हा अमका पाठ वेदव्यासांना अभिमत आहे असें म्हणतां. तर या पंचमस्कंधाचें वेदव्यासांना अभिमत असणाऱ्या पाठाला धरून पारायण करा." असें अच्युतप्रेक्षयतींनीं म्हटल्याबरोबर पंचमस्कंधाचें पारायण मुखोद्गत रीतीनें करण्यास प्रारंभ केला. अनेकांनीं परीक्षा पाहण्याकरितां निरनिराळया पाठभेदाच्या भागवताच्या पोथ्या घेतल्या होत्या. त्यांत एका पोथींतील पाठाला अनुसरून आचार्यांचे तोंडपाठ पारायण चालू झालें व तें पारायण क्रमानें जेव्हां संपलें त्यावेळीं जमलेल्या यच्चावत् श्रोत्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें. कारण पंचमस्कंध हा गद्यमय असल्यामुळें पोथी घेऊन सरळ शुद्ध रीतीनें वाचणें मोठमोठ्यांना शक्य होत नाहीं. मग आचार्यांनीं तर तो पंचमस्कंध तोंडपाठ म्हणून दाखविला, याबद्दल त्यांना आश्चर्य वाटणें साहजिक आहे.

या तऱ्हेनें आचार्यांच्या विद्वत्तेची कीर्ति सर्वत्र पसरूं लागली, त्यामुळें दुर्जनांच्या मनांत भीति निर्माण झाली. सज्जनांना आनंद झाला.

---

## प्रकरण ६ वें

# दिग्विजय



श्रीमन्मध्वाचार्य हे आपल्या विद्वत्तेनें व अप्रतिहत वक्तृत्वादिकांमुळें उत्तरोत्तर लोकप्रिय होऊं लागले. लोकांची त्यांचेवर श्रद्धा बसूं लागली. लोकांना त्यांच्या अलौकिकत्वाबद्दल खात्री वाटूं लागली. याचवेळीं अच्युत-प्रेक्षतीर्थ हे वृद्ध झाल्यामुळें मठाचा उत्तराधिकारी निश्चित करावा असा विचार त्यांचे मनांत आला. श्रीमध्वाचार्यासारखे समीप असतां दुसऱ्यांस उत्तराधिकारी अच्युतप्रेक्षतीर्थ कसे नेमतील ? अनेक दिवस विचार करून अच्युतप्रेक्षयतींनीं मध्वाचार्यांना युवराजपद देण्याचें ठरविलें

एके दिवशीं सुमुहूर्तावर स्वहस्तें अच्युतप्रेक्षयतींनीं मध्वाचार्यांना शंखा-भिषेक करून त्यांचें "आनंदतीर्थ" असें अन्वर्थक नांव ठेविलें. आनंदरुप श्रीहरीच्या अनुग्रहास पात्र असणारे किंवा मोक्षेच्छु जीवांना आनंददायक असें शास्त्र प्रवृत्त करणारे म्हणून त्यांचे नांव आनंदतीर्थ असें त्यांनीं ठेवलें. तेव्हांपासून श्रीमध्वाचार्यांना 'आनंदतीर्थ' असें सर्वजण म्हणूं लागले.

> तार्किकद्विरदपुंजभंजने मध्वकेसरिणि हंत जृंभिते।
> संकटेन च भयेन मायिगोमायवो दश दिशः पराद्रवन् ॥

यावेळीं आनंदतीर्थरूपी बालरवीची प्रभा सर्वत्र पसरूं लागली होती. त्यामुळें त्यांच्याबरोबर अनेक पंडित वादविवाद करण्यासाटीं येऊं लागले. एकदां अच्युतप्रेक्षयतींचे स्नेही म्हणविणारे एक यती अच्युतप्रेक्षयतीकडे आनंदतीर्थांबरोबर वादविवाद करण्यासाठीं आले. हे स्वतः तर उत्तम तऱ्हेचे नैय्यायिक होतेच. पण यांचे शिष्यप्रशिष्यहि अत्यंत जाडे पंडित होते. यांचेंजवळ पांडित्यातिशयामुळें येणारे औद्धत्यहि परिपूर्ण होतेंच. अशा रीतीनें औद्धत्यपूर्ण स्थितींतच वादविवाद करण्यास आले. पण हे किती जरी जाडे पंडित असले तरी आनंदतीर्थांपुढें त्यांचे काय चालणार ?

उडुपी येथील मठांत रोजच्यारोज वादविवाद नैय्यायिक पद्धतीनें चालत. शेवटीं आचार्यांनीं त्यांच्या प्रत्येक अनुमानाला नाना दूषणें दिलीं व सर्वांना त्यांनीं जगत्मिथ्यात्वानुमानाचें वैयर्थ्य पटविलें. इतकेंच नव्हे तर अनुमानप्रमाण हे प्रत्यक्षानुकुल अगर आगमानुकूल नसेल तर त्याला प्रामाण्यहि देतां येत नाहीं हें सिद्ध केलें. या पंडितांना आचार्यांच्यापुढें अनुमानानें एकाहि तत्वाची सिद्धि करून दाखवितां आली नाहीं. अच्युत-प्रेक्षयतींचे स्नेही असणारे हे संन्यासी हेहि त्यावेळीं ख्यातनाम होते. त्यांनाहि वादांत निरुत्तर केल्यामुळें मध्वाचार्यांबद्दल लोकांत भक्ति निर्माण झाली. पूर्णप्रज्ञतीर्थांनीं अनुमानांत अशा तऱ्हेचें प्रावीण्य दाखविलेलें पाहून लोकांनीं त्यांना ' अनुमानतीर्थ ' अशी पदवी दिली.

श्रीमदानंदतीर्थ ऊर्फ मध्वाचार्यांना यौवराज्यपदावर स्थापन केल्या-पासून सामान्यतः दोन मठ झाल्यासारखे होते. कारण आपल्या पीठाचे अधिकार आपल्या शिष्याकडे सोपविले गेल्यानंतर अच्युतप्रेक्ष बहुतेक बाहेर संचारार्थ जात नसत. धर्मकार्यार्थ बहुतेक मध्वाचार्यांनाच संचार करावा लागत असे त्यामुळें मध्वाचार्यांबरोबरहि कांहीं मंडळी असत व त्यांचे गुरुजवळहि असत. त्यामुळें आपोआपच दोन मठ होत गेले. आचार्यां-च्याकडे वादविवाद करण्याकरितां अनेक तऱ्हेचे विद्वान् येत. त्यांत नैयायिक, मीमांसक, अद्वैती, चार्वाक, बौद्ध, जैन असे असत.

एकदां मध्वाचार्य नेहमींप्रमाणें संचारांत असतां केवळ मध्वाचार्यां-बरोबर वादविवाद करण्याकरितां वादिसिंह व बुद्धिसागर असे दोन पंडित आचार्यांचा शोध करीत उडुपी येथें अच्युतप्रेक्षतीर्थांजवळ आले. त्यांनीं मध्वाचार्यांबरोबर वादविवाद करून अजिंक्यपद मिळविण्याची इच्छा प्रगट केली. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें अच्युतप्रेक्षतीर्थ बहुतेक उडुपी येथेंच राहत असत. हे उपरोक्त विद्वान् नेहमीं आपल्यापेक्षां वरचढ पंडित जगांत कोणी तरी आहेत असें मानीत नसत. आपल्यापेक्षां कोणी वरचढ पंडित आहे असें कळलें कीं लगेच त्याच्याबरोबर वादविवाद करून त्याला पराजित व अपमानित करीत. मध्वाचार्यांनीं अनेकांबरोबर वाद-विवाद केले, पण त्यांपैकीं एकजणहि यांना पराभूत करूं शकला नाहीं हें

वर्तमान ऐकून हे दोघे पंडित आनंदतीर्थांचा शोध करीत आले. अच्युत-प्रेक्षयतींनीं आपल्या मठांत त्यांना ठेवून घेऊन लगेच मध्वाचार्यांना निरोप पाठविला. आपल्या गुरूंचा निरोप येण्याबरोबर मध्वाचार्य तात्काल आपल्या परिवारासह उडुपी येथें आले. उभयतांचा होणारा वादविवाद ऐकण्याकरितां अनेक पंडित त्या ठिकाणीं आले होते. पुढें एके दिवशीं वादविवादास सुरुवात झाली. एका बाजूस अच्युतप्रेक्षयती व त्यांचेजवळ वादविवाद करणारे तरूण संन्यासी मध्वाचार्य, तर दुसऱ्या बाजूस प्रौढ, अनेक पंडितप्रकांडांना जिंकल्यामुळ मुखावर औद्धत्याची छटा असणारे हे दोघे पंडित होते.

कंसानें तयार केलेल्या आखाड्यांत चाणूरासमोर श्रीकृष्ण उभे असतांना प्रेक्षकांच्या मनाची जी स्थिति झाली होती तीच स्थिति त्या ठिकाणीं जमलेल्या श्रोत्यांच्या मनाची झाली होती. मध्वाचार्यांनीं आपल्या गुरूंना प्रणाम करून वादास सुरुवात करण्यास विनंति केली. त्याबरोबर त्या दोघांपैकीं बुद्धिसागर नावाच्या पंडितानें सर्व जमलेल्या पंडितावर औद्धत्य-पूर्ण दृष्टि टाकून वादास प्रारंभ केला. अशा तऱ्हेनें वादास सुरुवात झाल्यावर कांहीं तासांतच त्या बुद्धिसागराला आचार्यांनी निरुत्तर केलें. आपल्या अगाधतेमुळें उन्मत्त झालेल्या समुद्रास अगस्तिमुनींनीं जसें एका चुळींतच कोरडा केला तद्वत् या प्रकांडपंडित असणाऱ्या बुद्धि-सागरास पहिल्या तडाख्यांतच मध्वाचार्यांनीं पराभूत केलें. आपल्या प्रबल सहकाऱ्याचा पराभव होत आहे हें पाहून वादिसिंह पुढें सरसावला. या वादिसिंहानें स्वतःचें नांव वादिसिंह असें ठेवून घेतलें होतें अथवा लोकांनीं तसें नांव दिलें होतें. त्या नांवाप्रमाणें त्याची कृति होती. वादिसिंह हा वाद करण्यासाठीं पुढें सरसावला हें पाहून जमलेल्या श्रोत्यांनाहि मध्वाचार्यांचा पराभव होणार असें वाटू लागून त्यांच्या मनास हुरहुर लागली. वादिसिं-हाबरोबरहि मध्वाचार्य पूर्वीच्याच धीर गंभीर वाणीनें बोलत होते. आचा-र्यांनीं आपल्या भाषणावर घेतलेल्या आक्षेपांचें खंडन यथार्थरीत्या त्या वादिसिंहास करतां येईना.

प्रतिपक्षी आपणांस आवरत नाहीं,आपला पराजय होणार असें दिसतांच

पराजय मान्य करून आपल्या प्रतिपक्षाचा मोठेपणा मान्य करण्यास मनाचा मोठेपणा लागतो. तसा मोठेपणा वादिसिंहाचे ठिकाणीं नव्हता. त्यानें त्या दिवशीं उशीर झाल्याचें निमित्त सांगून त्या दिवशीं ऐन रंगांत आलेला वादविवाद थांबविला व पुन्हां उद्यां वादविवाद करूं असें सांगितलें. त्याप्रमाणें सर्व जनता आपल्या स्थानीं परतली. सर्वजण रात्रौ निद्राधीन झाल्यावर मध्वाचार्यांकडून आपला पराभव होऊन आपली कीर्ति धुळीस मिळणार ह्या जाणीवेमुळें पुढें होणारा काल्पनिक अपमान टाळण्याकरितां उभय पंडितांनीं रात्रौ पलायन केले. वादिसिंह व बुद्धिसागर यासारख्या जगद्विख्यात पंडितांना श्रीआनंदतीर्थांनीं सहज पराभूत केलेलें पाहून सर्व लोक अतिविस्मित झाले.*

आचार्यांनीं आपल्या संचारक्रमामध्यें प्रवचनद्वारा सर्वांना आपल्या द्वैततत्त्वज्ञानाचा उपदेश करण्यास प्रारंभ केला. तत्त्वज्ञानाची मांडणी करतांना नुसते आपले अपेक्षित मत सांगून भागत नाहीं,तर आपल्या अपेक्षितसिद्धांताच्या प्रचाराबरोबर विरुद्ध मतांचाहि साधकबाधक रीतीनें विचार करून प्रतिवादि मताचें खण्डन करावें लागतें. त्याप्रमाणें आचार्यांनीं स्वसिद्धांत सांगतांना ब्रह्मसूत्र, गीता,उपनिषदें,पुराण यांचा आधार द्यावा व त्याबरोबर जीवब्रह्मैक्य, जगन्मिथ्यात्त्व इत्यादिकांना उपरोक्त ग्रंथांचा मुळींच आधार नाहीं असें त्यांनीं सप्रमाण सिद्ध करून द्यावें. एकदां अशाच तऱ्हेनें ब्रह्मसूत्रावर शंकराचार्यांनीं लिहिलेल्या शारीरिकभाष्याचा विचार सुरू असतां,

*या कथेला अनुलक्षूनच असणारे कांहीं श्लोक आपल्यापेक्षां पूर्वी होऊन गेलेल्या चरित्रकारांनीं लिहिलेल्या मध्वचरित्रांतुन नारायणपंडिताचार्यांनीं आपल्या टीकेंत उद्धृत केले आहेत.

वैशेषिकविशेषज्ञो वादिसिंहाभिधो द्विजः।<br>
महीं विजित्य संप्राप्तो बौद्धाग्र्यो बुद्धिसागरः॥<br>
खंडितस्तेन पांडित्यात्तत्पक्षाक्षेपकोऽभवत्।<br>
तौ श्रुत्वा मध्ववैदग्ध्यीं प्राप्तौ तद्गुरुमूचतुः॥<br>
वादिनौ वादिकामौ द्वौ भगवंस्त्वामिता विति।<br>
बुध्यब्धिबुद्धिमाश्रित्य परो वादी कथां व्यधात्॥

मध्वाचार्यांनीं त्या शांकरभाष्यावर अनेक आक्षेप घेतले. इतकेंच नव्हे, तर बादरायणांनीं रचलेल्या सूत्रांचा व शंकराचार्यांनीं केलेल्या भाष्याचा कांहीं संबंधहि नाहीं हें त्यांनीं दाखविलें. स्वमताच्या पुष्ट्यर्थ शंकराचार्यांनीं सूत्रार्थाची कशी ओढाताण केली आहे हें दाखवून वेदव्यासांना जीव-ब्रह्मैक्य, जगन्मिथ्यात्व वगैरे सिद्धांत मुळींच अभिप्रेत नाहींत हें सप्रमाण दाखवून दिलें. या त्यांच्या प्रवचनाचा परिणाम लोकांच्या मनावर होत असे. कांहीं पंडित आचार्यांनीं दिलेल्या दूषणांचा परिहार करण्याचा निष्फळ प्रयत्न करीत पण त्यांना तें मुळींच साधत नसे. अशा वेळीं श्रोत्यांनीं विचारावें:—

" महाराज, शंकराचार्यांचें भाष्य जर ब्रह्मसूत्रांचा यथार्थ अर्थ प्रगट करणारें नव्हे असें म्हणतां तर वेदव्यासांना अभिप्रेत असणारा अर्थ तरी कोणता हे आपण आम्हांस समजावन सांगा."

मध्वाचार्यांनीं या भाषणाकडें किंचित् दुर्लक्ष केलें. एकदां अच्युतप्रेक्ष यती समोर बसले असतां मध्वाचार्यांनीं उपहासपूर्वक शांकरभाष्यावर दूषणें देण्यास प्रारंभ केला. शंकराचार्यांच्या भाष्यास, इतर ग्रंथांना दूषण देणें हें अच्युतप्रेक्षांना आवडत नसे. त्या दिवशीं मध्वाचार्यांनीं आपल्या प्रवचनांत शांकरभाष्यास अनेक दूषणें दिलीं तें कांहीं अच्युतप्रेक्षांना आवडलें नाहीं. पण मध्वाचार्यांनीं शांकरभाष्यावर घेतलेल्या आक्षेपांचें निरसनहि करतां येईना! म्हणून त्यांनीं त्या दिवशीं किंचित् रागांतच मध्वाचार्यांस म्हटलें.

" हे पहा, शंकराचार्यकृत भाष्य नुसतें वाईट आहे असें म्हणून भागत नाही. तसें कोणतेंहि दोष न येणारें असें भाष्य स्वतः रचून दाखवावें.'

या तऱ्हेनें अच्युप्रेक्षयतींनीं म्हटल्याबरोबर त्यांतील उपहासमिश्रित वाक्यांचा त्याग करून भाष्यांचीं रूपरेषा त्या ठिकाणीं त्यांनीं काढून दाखविली. पुढें तेंच प्रवचन विस्तृत भाष्यरूपानें प्रगट झालें.

# प्रकरण ७ वें

# दाक्षिणेंतील संचार



श्रीमन्मध्वाचार्यांनीं उडुपी व त्याच्या आजूबाजूस प्रवचनद्वारा जरी आपलें सन्मत स्थापित केलें होतें तरी त्यांना समाधान वाटेना. वेदव्यास-प्रणीत मतांचा प्रसार अखिल भरतखंडांत आसेतुहिमाचल होणें जरूर होतें व त्यासाठीं त्यांचा संचार होणेंहि जरूर होतें. हीच गोष्ट मनांत आणून आचार्यांनीं संन्यासग्रहणानंतर गंगास्नानाच्या निमित्तानें संचारार्थ जाण्याची अनुज्ञा आपल्या गुरुजवळ मागितली होती. पण त्यावेळेस त्यांनीं ती दिली नाहीं. आचार्यांनीं आपल्या गुरूची अनुज्ञा न उल्लंघितां तेथेंच वास्तव्य केलें व तेथें राहूनचं त्यांनीं अनेक वादिजनांचा पराभव करून मुमुक्षूंना तत्वोपदेश केला होता. पण असें किती दिवस चालणार? श्रीमध्वाचार्यांनीं आपल्या गुरुजवळ पुन्हां संचारार्थ जाण्याबद्दल गोष्ट काढली. यावेळेस मात्र अच्युतप्रेक्षतीर्थांनीं कोणत्याहि तऱ्हेची हरकत आणली नाही तर स्वतःहि त्यांचेबरोबर जाण्याचें ठरविलें.

सध्यांप्रमाणें त्यावेळेस प्रवासाचीं सुखसाधनें नव्हतीं. पूर्वी एखाद्या मठाधिपतीचा प्रवास म्हणजे बैलगाड्या, हत्ती, घोडे, मेणा, बरोबर लवा-जमा अशा थाटानें होत असे. कांहीं ठिकाणी हत्ती, घोड्याची जागा मोटारीनें घेतली आहे. बरोबर राजालाहि लाजविणारें ऐश्वर्य आहे. पण श्रीमदाचार्यांचे वेळीं यापैकीं कांहींच नव्हतें. त्यांच्या प्रवासास राजकीय परिस्थितीहि फारशी अनुकूल नव्हती. तेराव्या शतकांत त्यावेळीं हिंदु-स्थानांत लहान लहान राज्यें स्थापन झालेलीं होतीं. त्या राजे लोकांच्या स्पर्धेमुळें लढाया होत. त्यामुळें इकडून तिकडे प्रवास करणें धोक्याचें होतें. संन्यासी पाहिला कीं, कदाचित् न जाणों हा आपल्या शत्रुपक्षाचा हेरच, बिनधोक प्रवास करतां यावा म्हणून संन्यासी वेषांत, हिंडत नसेल ना? म्हणून ते आपल्या शत्रुपक्षाचे हेर असावेत अशा तऱ्हेची कल्पना करून

घेऊन संन्यासी वर्गांना छळण्याकडे या राजे लोकांची प्रवृत्ति होत असे. श्रीमन्मध्वाचार्यांवरहि अशा तऱ्हेचा प्रसंग आला होताच. पण आपल्या अलौकिकत्वामुळेंच या प्रसंगांतून आचार्य निभावून गेले. अशा परिस्थि-तींत आचार्य प्रवासास निघाले होते. अशी धकाधकीची स्थिति कशी मानवेल ? या चिंतेनेंच अच्युतप्रेक्षयती संचारास निघण्यास प्रतिकूल होते. पण या वेळेस आचार्यांच्या निश्चयापुढें त्यांचें कांहीं चालले नाहीं.

अच्युतप्रेक्षयतींसह श्रीमदाचार्य एका शुभ मुहूर्तावर उडुपीहून निघून मंगलोरच्या बाजूनें नेत्रावती नदी ओलांडून विष्णुमंगल नांवाच्या गांवीं आले. विष्णुमंगल हे गांव कासारगोडपासून तीन मैलांवर आहे. त्याठिकाणीं विष्णुचें एक उत्तम देवालय आहे. येथील लोकांना अच्युतप्रेक्षयतींची माहिती होतीच. शिवाय श्रीमदाचार्यांच्या विद्वत्तेची व ते प्रतिपादित असलेल्या विचारसरणीची माहिती येथील विद्वज्जनांना अगोदरच झाली असल्यामुळें त्यांचेबद्दल एक प्रकारचा आदर समाजाच्या मनांत निर्माण झाला होता. त्यामुळें येथें त्यांचा आदरसत्कार उत्तम तऱ्हेनें झाला. आचार्य या गांवीं जवळ जवळ एक महिनाभर होते. या ठिकाणीं असतांना त्यांनीं आपल्या संकल्पाप्रमाणें द्वैततत्त्वज्ञानाचा प्रसार केला. या गांवीं असतां अनेकांच्या घरीं ते *पुडीकरितां जात असत. एकदां अशा तऱ्हेनें एके ठिकाणीं गेले असतां, सर्वजण भोजनास बसले. गोविंदनाम घेत सर्वांचें भोजन आटोपत आले होते, इतक्यांत आचार्यांचे समोर एक उत्तम दोनशें पिकल्या केळांचा घड त्या यजमानानें भक्तिपूर्वक आणून ठेवून त्यांतील केळीं ग्रहण करण्याबद्दल प्रार्थना केली. आचार्यांनीं त्याची भक्ति अवलोकन करून तो सर्वच्या सर्व घड सहजगत्या खाऊन टाकला. हें त्यांचें अचाट सामर्थ्य पाहून सर्वांना अतिशय आश्चर्य वाटलें. अच्युतप्रेक्षयतींना तर आचार्यांविषयीं फारच काळजी वाटूं लागली. पण त्या केळीं खाण्याचा आचार्यांवर कांहींच दुष्परिणाम झाला नाहीं हें पाहून अच्युतप्रेक्षतीर्थांनीं विचारलें कीं, भोजन आटोपत आले असतां

*"पुडी" म्हणजे कोणाहि श्रेष्ठ संन्यासी आपल्या गांवीं आले असतां त्यांना सन्मानपूर्वक निमंत्रण देऊन भोजन देणें यांस "पुडी" असें नांव आहे.

तुम्हीं दोनशें केळीं खाल्लींत तर त्याचा दुष्परिणाम कसा घडला नाहीं ? याप्रमाणें विचारलें असतां अच्युतप्रेक्षयतींना मध्वाचार्य म्हणाले:—

"माझ्या उदरांत श्रीहरीच्या कृपेनें अंगुष्टमात्र अग्नि नेहमीं प्रज्वलित असतो. त्यामुळें सर्व कांहीं भस्मसात् होतें."

हें ऐकल्यानंतर अच्युतप्रेक्षयती स्तब्ध बसले. विष्णुमंगल गांवांत आचार्यांनीं कांहीं काल वास्तव्य करून आजूबाजूच्या अनेकांना तत्त्वोपदेश केल्यानंतर त्यांनीं आपला मुक्काम हलविला.

विष्णुमंगल नांवाच्या गांवाहून आचार्यांनीं प्रयाण केल्यानंतर अनेक ठिकाणीं संचार केला. या तऱ्हेनें संचार करीत असतांनाच सुजीवांना द्वैततत्वोपदेश करणें त्यांचें चालूच असे. आचार्य प्रवास करीत केरल देशांतील पयस्विनी नदीच्या तीरीं असणाऱ्या एका गांवीं आले. या पयस्विनी नदीच्या तीरावर आजला एक दुर्गादेवीचें स्थान आहे. ही पयस्विनी नदी केरल देशाला भूषणभूत अशी आहे. या ठिकाणीं आचार्यांनीं पुढें अवतार घेणाऱ्या दुर्गादेवीचें माहात्म्य सांगितलें. ही दुर्गादेवी ज्यावेळीं तुर्कांचा या प्रान्तावर हल्ला होईल त्यावेळीं त्या तुर्कांचा नाश करील असें त्यांनीं सांगितलें. दुर्गादेवींचें पूजन करून आचार्य पद्मनाभ देवाचें दर्शन घेण्याकरिता अनंतशयन येथें आले. अनंतशयन येथें आल्यानंतर श्रीपद्मनाभाचें दर्शनानें आचार्य अत्यंत आनंदित झाले.

## शंकराचार्यांबरोबर वादविवाद

आचार्य ज्यावेळीं अनंतशयन येथें आले त्याच वेळीं रामेश्वराच्या यात्रेच्या निमित्तानें संचार करीत असलेले शृंगेरी पीठावरचे विद्याशंकर यती याचा मुक्काम अनंतशयन येथें होता. श्रीमदाचार्य कोणत्याहि अद्वैती पंडिताबरोबर वादविवाद करून आपले द्वैततत्व पटवून देण्याची संधि दवडित नसत. आचार्यांनीं लगेच विद्याशंकरयतींना वादाकरितां पाचारण केलें.

हे विद्याशंकरयती म्हणजे दुसरे शंकराचार्य होत असें त्यांचे शिष्य मानतात. यांचे अनेक शिष्य होते. यांचेजवळ ऐश्वर्यहि भरपूर होतें. अनुयायी वर्ग भरपूर होता. आचार्यांची व यांची भेट प्रथमतः अनंतशयन

( त्रिवेंद्रम् ) येथें झाली. त्याठिकाणीं उभयतांचा वादविवाद झाला. त्या वादांत आचार्यांनीं शांकरभाष्यावर अनेक दूषणें दिलीं. आचार्यांनीं दिलेल्या दूषणांचा परिहार विद्याशंकरयतींना करतां आला नाहीं तेव्हां 'शेषं कोपेन पूरयेत्' या न्यायानें आचार्यांना त्यांनीं म्हटलें कीं, दुसऱ्याच्या भाष्याचें खंडन करण्यापेक्षां स्वतःच एखादें भाष्य कां रचीत नाहीं? ही विद्याशंकरयतींची उपहासोक्ति ऐकून आचार्यांनीं लगेच ब्रह्मसूत्रावर भाष्य रचण्याचा संकल्प जाहीर केला त्याबरोबर आचार्यपक्षीयांना तर आनंद झालाच. पण विद्याशंकरयतींच्या शिष्यानांहि अत्यानंद झाला. या उभयतांच्या वादविवादाच्या वेळीं असें ठरलें होतें कीं,

" विद्याशंकर जर या वादांत पराजित झाले तर त्यांनीं संन्यासाश्रमाचा त्याग करून आचार्यांचें शिष्यत्व पत्करावें. आचार्यांचा पराजय झाल्यास आचार्यांनीं त्यांचें शिष्यत्व पत्करावें."

पण विद्याशंकर पराजित झाल्यानंतर त्यांनीं संन्यासाश्रमाचा त्याग करून आचार्यांचें शिष्यत्व पत्करलें नाहीं. विद्याशंकर यतींना या तरुण संन्याशानें जिंकलें या गोष्टीचा परिणाम इतरांवर उत्तम तऱ्हेनें झाला. त्यामुळें आचार्यांचें माहात्म्य वाढूं लागलें.

अनंतशयनाहून पद्मनाभाचें दर्शन घेऊन आसपास असणाऱ्या अनेक तीर्थक्षेत्रांचें दर्शन घेऊन आचार्य कन्याकुमारी क्षेत्राकडे निघाले. या तीर्थांत स्नान करून आचार्य रामेश्वर येथें आले. श्रीक्षेत्र रामेश्वर येथें आल्यानंतर रुद्रांतर्गत श्रीरामचंद्राचें दर्शन घेतलें. या ठिकाणीं आचार्य चातुर्मास्याकरितां राहिले. एके दिवशीं आचार्य समुद्रस्नानास निघाले असतां वाटेंत त्यांची व विद्याशंकरयतींची भेट झाली. तेव्हां अनंतशयन येथें केलेल्या प्रतिज्ञेचें स्मरण आचार्यांनीं विद्याशंकरयतींना करून दिलें. तेव्हां आपल्या मठाचे महात्म्य राहण्याकरितां म्हणून नाइलाजानें ते आव्हान स्वीकारणें त्यांना भाग पडले. आचार्यांचा व विद्याशंकरतीर्थांचा वादविवाद पुन्हां सुरू झाला. पण त्याचाहि निकाल अनंतशयन येथें झाल्याप्रमाणें विद्याशंकरांच्या विरुद्धच झाला. त्यानंतर विद्याशंकरयतींनीं आपल्याजवळ असलेल्या व गांवांतील इतर पंडितांची मदत वादविवादांत आचार्यांचा पराभव करण्याकरतां मागितली. पण कोणांसहि आचार्यांचे समोर येऊन

वादविवाद करण्याचें धैर्य न झाल्यामुळें सर्वांनीं मदत करण्याचें नाकारलें. अशा तऱ्हेनें विद्याशंकरयती सर्वथैव पराजित झाले. या रीतीनें वादांत त्यांचा पराजय झाल्यामुळें त्यांचा सूड विद्याशंकरयती व त्यांचे अनुयायी यांनीं अन्य तऱ्हेनें त्रास देऊन घेण्यास प्रारंभ केला.

याबद्दल भावप्रकाशिकाकार नारायण पंडिताचार्य म्हणतात.

अप्रांश्वाद्याश्च तत्रोषुश्चातुर्मास्यं ततो विभोः ॥
दीक्षाविघ्नं चिकीर्षन्तस्ताडनं चाभवत् खलु ॥

परमठीयांनीं अशा रीतीनें जरी त्रास दिला, तरीहि आचार्य त्याच ठिकाणीं चातुर्मास्यव्रताकरितां राहिले आचार्यांची सहनशीलताहि आचार्यांचें माहात्म्य वाढविण्यास कारणीभूत झाली.

चातुर्मास्यव्रत आटोपल्यावर आचार्य पुन्हां पांड्य, चोल देशांतून परत निघाले. आचार्य रामेश्वराहून श्रीरंगक्षेत्राकडे आले. विद्याशंकर यतींना जिंकल्यापासून आचार्यांची कीर्ति सर्वत्र पसरली होती. त्यामुळें आचार्य आपल्या गांवीं येणार हें वर्तमान ऐकून तेथील यच्चावत् लोकांना अत्यानंद झाला. त्यामुळें श्रीरंगक्षेत्रांत आचार्यांचें मनःपूर्वक स्वागत झालें. दक्षिण हिंदुस्थानांत प्राचीन कालापासून श्रीरंगक्षेत्र हें वैष्णव क्षेत्र म्हणून प्रसिद्ध असून आजतागायत विद्वानांची परंपरा अखंडपणें चालू आहे. त्यानंतर आचार्य श्रीमुष्ण क्षेत्रांत आले. या ठिकाणीं भूवराहाचें स्थान आहे. सध्यां हें स्थान दक्षिण अर्काट जिल्ह्यांतील चिदंबर तालुक्यांत मोडतें. येथेंच आचार्यांनीं आपल्या पूर्वाश्रमीं गुरुच्या घरीं अध्ययनाकरितां असतांना शेतीच्या उपयोगाकरितां एक कुंड निर्माण केलें असें ऐतिहासिक पुराव्यावरून कळतें. आचार्य श्रीरंगक्षेत्राहून निघाल्यानंतर मार्गांत ठिकठिकाणीं अनेक विद्वज्जनांच्या सभा होत असत व त्या विद्वज्जन समूहापुढें आपल्या अमोघ वाणीनें आचार्य श्रुतिमान्य द्वैतसिद्धान्त मायावादखंडनपूर्वक मांडीत असत.

एकदां पयस्विनी नदीच्या तीरावर असणाऱ्या देवालयांत आचार्यांचा मुक्काम असतांना त्या गांवच्या लोकांनीं एक सभा भरविली. त्यांतील एका

पंडितानें ऐतरेय सूक्तांतील भाग काढून त्याचा अर्थ सांगण्याचा आग्रह केला. तेव्हां आचार्यांनीं गंभीर स्वरानें ती संहिता म्हणून त्याचा अर्थ सांगितला व म्हटलें कीं,

त्रयोर्थाः सर्ववेदेषु दशार्थाः सर्वभारते ।
विष्णोः सहस्रनामापि निरंतरशतार्थकम् ॥

( वेदाचे तीन अर्थ, भारताचे दहा अर्थ, विष्णुसहस्रनामाचे शंभर अर्थ आहेत. )

आचार्यांनीं याप्रमाणें म्हटल्याबरोबर, कांहीं जणांनीं भक्तीनें, कांहींनीं जिज्ञासेनें, कांहींनीं कपटानें विष्णुसहस्रनामांतील "विश्व" या शब्दाचे शंभर अर्थ सांगण्यास सांगितलें. त्याबरोबर आचार्यांनीं विश्व शब्दाचे शंभर अर्थ सांगितलें. तेव्हां आचार्यांच्या व्युत्पत्तिकौशल्याबद्दल सर्वांची खात्री पटली. पूर्वकालीं अनेक राजेलोक आपल्या राज्यांतील विद्वानांना एकत्र बोलावून त्यांचे करवीं विद्यार्थ्यांच्या परीक्षा घेत असत व प्रत्येकाच्या योग्यतेप्रमाणें त्यांची संभावनाहि केली जात असे. अशा रीतीनें तंजावरच्या प्रदेशांत सभा चालू असतां आचार्य त्या ठिकाणीं आले. ठरलेल्या पद्धतीनें वादविवादहि झाला. त्यांत एकानें "न वा उ देवा" या सूक्तांतील पृणीयात् या क्रियापदाचा अर्थ विचारला. तेव्हां आचार्यांनीं 'पृण् दाने' असा मूल धातु असून हें त्याचें रूप आहे असें सांगितलें. तोच खरा संदर्भयुक्त अर्थ होता. त्यामुळें सर्वांनाच तो अर्थ पटला. पण दुराग्रही पंडितांनीं मात्र आपला आग्रह सोडला नाहीं.

याच सभेंत "अपाला" शब्दाच्या अर्थाबद्दल वादविवाद सुरू झाला. आचार्य म्हणत "अपाला" म्हणजे "नवयौवना" व इतर पंडित म्हणत कीं, अपाला म्हणजे कुष्ठरोगी. यांत दोघांचा वाद कांहीं केल्या तुटेना. तेव्हां आचार्य तेथील पंडितांना म्हणाले कीं, "थोड्याच दिवसांत एक

पंडित तुमच्या गांवीं येईल त्यावेळीं त्याला तुम्ही 'अपाला' शब्दाचा अर्थ विचारा." याप्रमाणें सांगून आचार्य निघून गेले. पुढें आचार्यांनीं सांगितल्याप्रमाणें एक पंडित आल्यानंतर कांहीं तत्रस्थ पंडितांनीं 'अपाला' शब्दाचा अर्थ विचारला. तेव्हां त्यानें आचार्यांप्रमाणेंच अपाला शब्दाचा अर्थ सांगितला.त्याबरोबर त्यांची आचार्यांच्या त्रिकालज्ञानाविषयीं खात्री पटली.

याप्रमाणें आचार्यांनीं दक्षिण हिंदुस्तानांत प्रवास करून द्वैतध्वज फडफडत ठेवला. अनेक सुजीवांना उपदेश करून सन्मार्गास लावले. यानंतर परत उडुपीस येऊन बदरीयात्रा करण्याकरितां उडुपी येथें आपल्या गुरुसह विश्रांति घेतली.

# प्रकरण ८ वें

# बदरिकाश्रम यात्रा



श्रीमन्मध्वाचार्य आपला दक्षिण हिंदुस्थानांतील प्रवास आटो-पून परत उडुपीस आले. या प्रवासांत त्यांनीं अनेक मायावाद्यांबरो-बर वादविवाद करून द्वैतसिद्धान्त पटवून देण्याचा प्रयत्न केला. त्यांचे-बरोबर वादविवाद करण्यांत वासुदेव, वादसिंह, बुद्धिसागर इत्यादिक पंडित प्रमुख होते. विशेषतः प्रस्थापित शांकरपीठावर आरुढ झालेल्या शंकराचार्यासमान असणाऱ्या विद्याशंकर यतीबरोबर त्यांचा झालेला वादवि-वाद हा प्रमुख होय. अशा तऱ्हेनें दक्षिण देशाचा सचार आटोपून श्रीम-दाचार्य परत उडुपीस आले. या प्रवासांतील मुख्य कार्य म्हणजे आचा-र्यांनीं केलेली गीताभाष्याची रचना होय. आचार्यांच्या सदतीस ग्रंथरूपी रत्नापैकीं हें पहिलें रत्न होय. श्रीमद्भगवद्गीता हा अर्जुन श्रीकृष्णसंवादरूप ग्रंथ वेदव्यासविरचित महाभारतापैकीं थोडा भाग असून तो ग्रंथ भरत-खंडात अत्यंत लोकप्रिय असा आहे. ह्या ग्रंथाइतकी लोकप्रियता दुसऱ्या कोणत्या ग्रंथास लाभली असेल कीं नाहीं याविषयीं शंका आहे. या गीते-वर प्राचीनकालापासून अनेक टीका असल्या, तरी शंकराचार्य रामानुजाचार्य यांच्या टीका लोकप्रिय होत चालल्या होत्या. त्यामुळें गीतेचें खरें तत्त्व ज्ञान बाजूस राहिलें अन्यथा ज्ञानाचा प्रसार झालेला पाहून आचार्यांनीं अगदीं प्रथमतः गीतेवरच भाष्य करण्याचें ठरविलें असल्यास कांहींच नवल नाहीं. तें भाष्य पूर्ण झाल्यानंतर आचार्यांच्या मनांत बदरिकाश्रमीं जाऊन वेदव्यासांचे दर्शन घ्यावे असें वारंवार येऊं लागलें. आपल्या गुरूजवळ आज्ञा मागितल्यास ते कितपत परवानगी देतील याबद्दल त्यांना संशय होता. कारण एक तर बदरीयात्रेचा प्रवास म्हणजे अतिशय-कठिण होय. आजच्या सुधारलेल्या काळांतहि बदरीयात्रेंतील अडचणी कमी झाल्या नाहींत, तर त्यावेळीं किती अडचणी असतील याची कल्प-

नाच केलेली बरी. त्यांतून अच्युतप्रेक्षयतींची वृद्धावस्था इ. याशिवाय इतर कारणें असतील. पण श्रीमदाचार्यांची इच्छा वेदव्यासदर्शनाविषयीं बलवत्तर होऊं लागली कारण संन्यास घेतल्याबरोबरच त्यांनीं गंगायात्रेला जाण्याची इच्छा आपल्या गुरुजवळ प्रगट केलेली होती. पण त्यावेळीं आचार्यांना अच्युतप्रेक्षयतींनीं परवानगी दिली नव्हती. पण त्या वेळेपेक्षां आतांच्या वेळेंत फरक होता. अच्युतप्रेक्षयतींच्या दृष्टीनें आचार्य तेव्हांपेक्षां वयानें मोठे, ज्ञानी, जगाचा अनुभव घेतलेले असे झाले होते. त्यामुळें एका दृष्टीनें आपणांस सहजासहजी परवानगी मिळेल असा विचार करून त्यांनीं गंगास्नानास व तसेंच बदरीयात्रेस जाण्याची परवानगी मागितली अच्युतप्रेक्षयतींनीं आपल्या शिष्योत्तमाची योग्यता व अंतःकरणांतील. इच्छा जाणून परवानगी दिली. याचवेळीं आचार्यांनीं स्वरचित गीता भाष्याची प्रत आपल्या गुरूंस समर्पण केली.

आचार्यांना अच्युतप्रेक्षयतींनीं बदरीयात्रेला जाण्याची अनुज्ञा दिल्यानंतर आपल्या शिष्यपरिवारासह त्यांनीं लगेच प्रयाण केलें. या बदरिकाश्रमयात्रेचें विस्तृत वर्णन मध्वविजयांत तपशीलवार दिलेलं नाहीं. उडुपीहून निघून ते एकदम गंगानदीच्या तीरीं आले, एवढाच उल्लेख पंडिताचार्यांनीं केला आहे. त्यामुळें ते कोणत्या मार्गानें गेले, वाटेंत कोणाबरोबर वादविवाद झाला कीं नाहीं वगैरे गोष्टी अज्ञातच आहेत.

या प्रवासांत आचार्यांनीं कोणाबरोबर वादविवाद केला असो अगर नसो. पण त्यांनीं संशोधकाच्या दृष्टीनें अनेक ग्रंथांचें उपनिषदें भारत, भागवत, अठरा पुराणें, पंचरात्र या ग्रंथांचें शोधन केलें. कारण यांत अनेकांनीं आपल्या पांडित्याचा दुरुपयोग करून मूलग्रंथाला विरुद्ध असा पुष्कळ भाग घुसडविला होता, त्यामुळें ग्रंथाचें तात्पर्य समजणें सामान्य जिज्ञासूंस अशक्य झालें होतें आचार्यांनीं ही सर्व ग्रंथांची परिस्थिति जाणून आसेतुहिमाचल झालेल्या प्रवासांत ह्या ग्रंथाचें संशोधन केलें यांत शंका नाहीं. आणि या संशोधनाचें फळ म्हणजेच भारततात्पर्य, भागवततात्पर्य इत्यादि ग्रंथ होत. या भारतादि ग्रंथाबद्दल आचार्यांनीं स्पष्टपणें म्हटलें आहे,

क्वचित् ग्रंथान् प्रक्षिपंति क्वचिदंतरितानपि ।
कुर्युः क्वचिच्च व्यत्यासं प्रमादाद् क्वचिदन्यथा ॥
देशे देशे तथा ग्रंथान् दृष्ट्वा चैव पृथक्विधान् ।
यथा स भगवान् व्यासः..............

गंगानदी ओलांडून आचार्य बदरिकाश्रमीं आले. हिमाचलावर ज्या ठिकाणीं नरनारायणाचें देवालय आहे, तेथपर्यंत मनुष्यांना जाणें शक्य असतें. या देवालयाच्या पलीकडे मनुष्यांना अगम्य व अगोचर असा वेदव्यासांचा आश्रम आहे. त्या ठिकाणीं महान् ऋषीसह वर्तमान वेदव्यास-रूपानें श्रीहरी वास्तव्य करतात. त्याठिकाणीं प्रवेश कोणासहि करणें शक्य नाहीं. आचार्यांनीं बदरिकाश्रमीं आगमन केल्यानंतर आपल्या शिष्यगणांसह तेथें मुक्काम ठेविला. आचार्यांनीं ज्या ठिकाणीं आपला मुक्काम ठेविला होता त्यास आनंदमठ अथवा अनंतमठ अशी संज्ञा आहे. या ठिकाणीं मुक्काम ठेवून आचार्यांनीं प्रथमतः नारायणाचें दर्शन घेतलें. "रिक्तपाणिं न पश्येत राजानं देवतां गुरुं" या न्यायानें आचार्यांनीं श्रीनारायणापुढें आपली गीताभाष्याची प्रत ठेवून प्रणिपात केला. बदरिकाश्रमीं आल्या-नंतर आचार्यांचा कार्यक्रम ठरल्यासारखा झाला होता. अगदीं पहाटे उठून आचार्य गंगानदीच्या थंडगार प्रवाहांत स्नान करीत असत, स्नान झाल्यावर आपलें आन्हिक आटोपलें कीं श्रीनारायणाचें ध्यान करीत असत. आपल्या शिष्यगणांना दूर ठेवून आचार्य श्रीनारायणासमोर स्वकृत गीताभाष्य वाचून दाखवीत असत. श्रीनारायणांनीं त्या भाष्यांचा प्रसार करण्याची अनुज्ञा दिली. श्रीनारायणांनीं श्रीमदाचार्यांच्या मंगला-चरणाच्या श्लोकांमध्येंच फक्त एका शब्दाचा फरक केला.

देवं नारायणं नत्वा सर्वदोषविवर्जितं ।
परिपूर्णगुरुं श्रांगीतार्थं वक्ष्यामि शक्तितः ॥

असा आचार्यांचा मूळ श्लोक होता. श्रीमन्नारायणांनीं "शक्तितः" या पदांच्या ऐवजीं "लेशतः" असें पद घालण्याची आज्ञा दिली. पंडिताचार्य म्हणतात,

एतदर्थमपि सूक्ष्ममपि त्वं शक्त एव न यदात्थ समस्तं ॥
तेन लेशत इतीह पदं स्यादित्यगद्यत जगज्जनकेन ॥

(गीतार्थ सूक्ष्मरीत्या सांगण्यास तूं समर्थ असतांनाहि तो तूं सांगितला नाहींस म्हणून शक्तितः या पदाऐवजीं लेशतः असें पद असूं दे, असें श्रीनारायणानें सांगितलें.)

यानंतर आचार्यांनीं त्या ठिकाणीं वास्तव्य करून ४८ दिवसांचें व्रत केलें. कोणत्याहि तऱ्हेचा आहार न घेतां पूर्वोक्त क्रमानें स्नानादिक कृत्यें आटोपल्यावर त्या आनंद मठांतच आचार्यांनी तपश्चर्या केली. याप्रमाणें तपश्चर्या करीत असतां एकें दिवशीं श्रीमदाचार्यांना वरच्या बाजूस मनुष्य-दृष्टीला अगोचर असणाऱ्या आश्रमांत येण्याची अनुज्ञा झाली. त्याबरोबर अत्यंत प्रमुदितमनानें दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं आचार्यांनीं त्या आश्रमाकडे गमन केलें. मौनव्रत असल्यामुळें आचार्यांनीं एका ताडपत्रावर आपल्या शिष्यांना उद्देशून निरोप लिहून ठेवला. "या स्थलासारखें पवित्र स्थल नाहीं. श्रीविष्णुसारखे दैवत नाहीं. मी कथन केलेल्या द्वैततत्त्वासारखें तुमचे कल्याण करणारें दुसरें तत्त्व नाहीं. मी स्वतः वेदव्यासांच्या दर्शनाकरितां जातो आहे. मी परत येईन अगर न येईन. तुमचे कल्याण असो." अशा तऱ्हेनें मध्वाचार्यांनीं एका ताडपत्रावर लिहून वेदव्यासांच्या आश्रमाकडे गमन केलें. श्रीमन्मध्वाचार्यांच्या अनेक शिष्यांत सत्यतीर्थ नांवाचे एक संन्यासी होते. हे सत्यतीर्थ म्हणजे सध्या जे भीमनकट्टी व भंडारगिरी म्हणून दोन मठ आहेत त्यांचे संस्थापक होते. या सत्यतीर्थांनीं अच्युतप्रेक्षयतीकडूनच संन्यासाश्रम स्वीकारला होता. व ते अध्ययनार्थ श्रीमध्वाचार्यांजवळ राहिले होते. यांची आचार्यांवर अत्यंत भक्ति होती. यांना आचार्यांचा वियोग सहन न झाल्यामुळें ते आचार्यांच्या मागोमाग निघाले. आचार्यांच्या चालण्याच्या वेगापुढें सत्यतीर्थांचा निभाव लागेना. ते दमून गेले. सायंकालाचे सुमारास आचार्यांनीं मागें वळून पाहिलें तो आपल्या पाठोपाठ सत्यतीर्थ येत आहे हें जाणून त्यांनीं त्यांस आपल्या हातानें न येण्याबद्दल खुणावलें. यावेळेस आनंदमठापासून उभयतां पुष्कळच दूर आले होते. पण आचार्यांनीं केलेल्या हस्तक्षेपानें उत्पन्न झालेल्या वाऱ्यामुळें सत्यतीर्थ परत वेगानें

आनंदमठांत एका क्षणांत आले व त्यांनीं आचार्यांची सर्व हकीकत व अद्‌भुत शक्ति सर्वांना सांगितली.

बरोबर सत्यतीर्थ होते तोंपर्यंत आचार्य थोडेसे अडखळल्याप्रमाणें झाले होते. पण सत्यतीर्थ परत गेल्यावर श्रीमन्मध्वाचार्य अत्यंत वेगानें या कड्यावरून त्या कड्यावर उड्या मारीत वेदव्यासांच्या आश्रमांत आले. व्यासाश्रमांत आल्यावर आसमंतांत अनेक तपस्वी ऋषि बसले आहेत, व मध्यभागीं एका उच्चासनावर वेदव्यास बसले आहेत असें त्यांनीं पाहिलें. त्यांना पहाण्याबरोबर आचार्यांना अत्यंत आनंद झाला व त्यांनीं आनंदपूर्वक प्रणाम करून वेदव्यासांचे स्तवन करण्यास प्रारंभ केला. त्याच्या दर्शनानें त्यांचा कंठ दाटून आला. नेत्रांतून आनंदाश्रू वाहू लागले. आपल्या शिष्योत्तमाला आलेला पाहून वेदव्यासांनीं यथोचित्त सत्कार करून त्यांना आलिंगन दिलें. या तऱ्हेनें अनुगृहीत झाल्यावर वेदव्यासांच्या आज्ञेप्रमाणें त्याठिकाणीं त्यांनीं कांहीं काल वास्तव्य केलें. त्यांनीं त्या कालांत आचार्यांना तत्वोपदेश केला. याप्रमाणें कांहीं काल वास्तव्य केल्यानंतर व्यासांनीं, आचार्यांना ब्रम्हसूत्रावर भाष्य रचून स्वोपदिष्टमार्गाचा प्रसार करण्याची अनुज्ञा दिली. आचार्यांनीं ती आज्ञा शिरसावंद्य मानून ते परत त्यांच्या आज्ञेप्रमाणे आनंदमठास आले. आपले गुरु सुखरूपपणें परत आलेले पाहून सर्वांस अतिशय आनंद झाला. याप्रमाणें वेदव्यासांचें दर्शन झाल्यानंतर श्रीमदाचार्य परत आपल्या शिष्यगणासह उडुपीकडे येण्यास निघाले.

मानवानां अगोचर अशा वेदव्यासाश्रमांतून त्यांच्या आज्ञेनें श्रीमध्वाचार्य परत आनंदमठांत आले. त्या ठिकाणीं आचार्यांना परत आलेले पाहून शिष्यांना अत्यंत आनंद झाला. आचार्यांनीं त्या ठिकाणीं कांहीं काल वास्तव्य करून वेदव्यासांच्या आज्ञेप्रमाणें ब्रह्मसूत्रावर यथार्थप्रतिपादक भाष्य रचलें व लगेच त्याचा प्रसार करण्याकरितां त्वरेनें आपल्या शिष्यगणांसह उडुपीकडे येण्यास निघाले. आचार्य बदरीहून कोणत्या मार्गानें परत आले याबद्दल नारायणपंडितांनीं मुग्धताच स्वीकारली आहे. परत येत असतां वाटेंत एका गांवीं त्यांचा मुक्काम पडला. त्या गांवीं फारच थोडा वेळ ते रहाणार होते. त्यामुळें तेथील अग्निशर्मा वगैरे पांच ब्राह्मणांनीं आपल्या घरची भिक्षा स्वीकारावी अशी प्रार्थना केली. या

पांचहि जणांची आचार्यांवर अगदी एकनिष्ठ श्रद्धा! अशा स्थितींत कोणाचें निमंत्रण स्वीकारावें व कोणाचें स्वीकारूं नये? तेव्हां आचार्यांनीं पांचहि जणांचें निमंत्रण स्वीकारलें व एका वेळीं पांचजणांची भिक्षा स्वीकारून सर्वांना आनंदित केलें.

आचार्यांनीं प्रवासांत असतानांच वेदव्यासांच्या आज्ञेवरून रचलेल्या ब्रह्मसूत्रभाष्याचा प्रसारहि केला यांत शंका नाहीं. या भाष्यामुळें त्यांची कीर्ति सर्वत्र पसरली. हे ब्रह्मसूत्रभाष्य आचार्यांनीं सांगावें व त्याची प्रत सत्यतीर्थांनीं लिहावी. "सत्यतीर्थ इह भाष्यमालिखत्" अशी पांडितोक्ति आहे. भाष्य लिहिणाऱ्यांस प्रत्येक अक्षरागणिक गंगातीरीं देवालय स्थापण्याचें पुण्य आहे असें सत्यतीर्थांनीं म्हटलें आहे.

आचार्यांनीं भाष्य लिहिलें त्यांत नुसता स्वसिद्धांतच मांडला नाहीं तर आचार्यांच्या कालापर्यंत जे भाष्यकार होऊन गेले त्या सर्वांचा समाचार आपल्या या भाष्यांत घेतला आहे. ब्रह्मसूत्राची विद्वज्जनांमध्यें अतिशय लोकप्रियता होती. त्यामुळें ब्रह्मसूत्रावर भाष्य केल्यावांचून मोठेपणा प्राप्त नसे. प्रत्येकजण या ब्रह्मसूत्रावर भाष्य करीत असे. श्रीमन्मध्वाचार्यांचे अगोदर अशी एकवीस तरी भाष्यें झालीं असावींत असें नारायण पंडिताचार्यांच्या उल्लेखावरून वाटतें.

भारती विजयश्चैव सच्चिदानंद एव च ।
ब्रह्मघोषः शतानंद उद्वर्तः चैव पंचमः ॥
विजयो रुद्रभट्टश्च वामनाख्यस्तथाष्टमः ।
सयादवप्रकाशश्च नवमस्तत्र कीर्तितः ॥
रामानुजस्तथा भर्तृप्रपंचो द्रविडस्तथा ।
ब्रह्मदत्तो भास्करश्च पिशाचो वृत्तिकारकः ॥
तथा विजयभट्टश्च विष्णुक्रान्तस्तथैव च ।
वादीन्द्रश्च तथा पश्चात् ततो माधवदासकः ॥
ततश्च शंकरस्यादेकविंशतिवादिभिः ।
प्रणीतानि निराचक्रे कुभाष्याणि महामतिः ॥

या तऱ्हेनें आचार्यांनीं आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या सर्व उपलब्ध भाष्यांचें खंडन आपल्या ग्रंथांत केलेलें आहे. मार्गांत त्या त्या सांप्रदायिकांनीं आचार्यांबरोबर वादविवाद करावेत पण कोणासहि त्यांनीं प्रतिपादन केलेल्या विचारसरणीचें खंडन करतां आलें नाहीं. आचार्यानंतर इतका जोरदार व स्वतंत्र तत्वज्ञान प्रतिपादन करणारा कोणीहि होऊन गेला नाहीं. म्हणूनच वादिराजांनीं आपल्या युक्तिमल्लिका नांवाच्या ग्रंथांत "अन्ते सिद्धस्तु सिद्धान्तः" अशी कोटि केली आहे. कारण केव्हांहि प्रथमतः शंका समाधान, पूर्वपक्ष वगैरे मांडणें पूर्ण झाल्यावरच सिद्धान्त मांडावा लागतो व सिद्धान्त मांडल्यावर पुन्हां पूर्वपक्ष वगैरे कोणी करीत नाहीं. त्याप्रमाणें वेदव्यासप्रणीत ब्रह्मसूत्रावर आजपर्यंत अनेकांनीं पूर्वपक्ष, शंका वगैरे घेतल्या आणि त्या सर्वांचा विचार करून शंका, पूर्वपक्ष यांचें समाधान करून वेदव्यासांना अभिमत असणारा सिद्धान्त आचार्यांनीं मांडला. त्यानंतर ८०० वर्षांत द्वैतसिद्धान्तावर आक्षेपपूर्वक स्वतंत्र तत्वज्ञान प्रतिपादन करणारा कोणीहि निघाला नाहीं.

पंडिताचार्यांनीं जरी यांच्या संचारक्रमाचा तपशील दिला नसला, तरी सामान्यतः अन्य ग्रंथांत आलेल्या उल्लेखांवरून त्याचें अनुमान काढतां येतें.

याच संचार क्रमांत आचार्यांनीं बंगाल प्रांतांत संचार केला असावा. कारण पुढें श्रीकृष्ण चैतन्य म्हणून जे प्रसिद्ध महापुरुष होऊन गेले व ज्या श्रीकृष्ण चैतन्यांनीं स्थापन केलेल्या सांप्रदायास मध्वाचार्यांची शाखा म्हणतात, त्या सांप्रदायाची मुहूर्तमेढ याचवेळीं रोवली गेली असली पाहिजे. चैतन्य सांप्रदायावर श्रीमध्वाचार्यांच्या मताची छाप पडली आहे हें स्वामी विवेकानंदासारख्या जगद्विख्यात आधुनिक पंडितांनींहि मान्य केलें आहे. स्वामी विवेकानंद एके ठिकाणीं म्हणतातः—

There has been the great southern preacher **Madhwamuni** and following him our great **Chaitanya** of Bengal taking up, the philosophy of the Madhwas preaching it on Bengal.

म. ...४

आणखी एके ठिकाणीं स्वामी विवेकानंदांनीं असेंच म्हटलें आहे:—

The great **Madhwa** whose leadership was recognised even by the followers of the only northern prophet whose power has been felt over the length and breadth of India, Shri Krishna Chaitanya.

याशिवाय चैतन्य संप्रदायांची परंपरा सांगतांना सुरुवातीस श्रीमध्वाचार्यांचें नांव अगोदर येतें. हें सर्व सांगण्याचा उद्देश इतकाच कीं, आपण रचलेल्या भाष्यांचा उहापोह, प्रसार वगैरे करण्याकरितां आचार्य बदरिकाश्रमाहून परत येतांना बंगालमध्यें गेले असावेत. नवद्वीप (नडिया) हा प्रान्त विद्वानांचे आगर, नैयायिक पंडित एकापेक्षा एक मोठे होऊन गेलेले, त्यामुळें अशा पंडितांना वादांत आपलें म्हणणें मान्य करावयास लावण्याची आचार्यांची इच्छा असणें साहजिक आहे. म्हणूनच त्या बाजूस त्यांनीं प्रवास केला असावा. व त्यांच्या भाष्याची विद्वज्जनांवर छाप पडली असली पाहिजे यांत शंका नाहीं.

या संचारक्रमांत अनेक नैयायिक, बौद्ध, चार्वाक, मीमांसक इत्यादि पंडितांशीं वादविवाद करण्याचा प्रसंग आला. पण आचार्यांपुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. पंडिताचार्य म्हणतात कीं, बदरिकाश्रमाहून निघून आचार्य अनेक देश ओलांडून गोदावरी नदीच्या तीरीं आले. मार्गांत अनेक पंडितांबरोबर वादविवाद झाले व अनेकांचा वादांत पराभव झाला व दोघा पंडितांनीं त्यांचें शिष्यत्व पत्करलें. त्यांचीं नावें शोभनभट्ट व शामशास्त्री होत. आचार्यांची मनुष्य-पारख अत्यंत दिव्य अशी होती. त्यांनीं ज्यांना पुढें आणले ते पराकोटीतीलच होते. माणसें अचुक ओळखून त्यांचा उपयोग करून घेणें सर्व श्रेष्ठ पुरुषांचें लक्षण होय. यापैकीं शामशास्त्री हे पुढें नरहरीतीर्थ या नांवानें प्रसिद्ध झाले यांनीं जवळ जवळ पंधरा वर्षें स्वत: संन्यस्त असूनहि ओरिसा देशाचे रीजंटपद स्वीकारून राज्यकारभार पाहिला होता. शोभनभट्ट हे पुढें पद्मनाभतीर्थ नांवानें

प्रसिद्ध पावले. पद्मनाभतीर्थांच्या आचार्यांचे कांहीं ग्रंथावर उत्तम आणि सुलभ टीका आहेत. शोभनभट्ट हे गोदावरी नदीच्या तीरीं राहणारे होते. कित्येक यांना पुणतांबे येथील राहणारे असें म्हणतात. या संचारक्रमांत आचार्यांना या दोन रत्नांचा लाभ झाला. याप्रमाणें संचार करीत द्वैततत्वाचा उपदेश मुमुक्षुंना देत, परत आचार्य गुरुच्या दर्शनार्थ उडुपी येथें आले. श्रीमन्मध्वाचार्य हें सुखरुप परत आलेले पाहून अच्युतप्रेक्षयतींना अत्यानंद झाला. श्रीमध्वाचार्यांनीं त्यांना आपल्या ब्रह्मसूत्र-भाष्याची एक प्रत समर्पण केली. आचार्यांच्या सान्निध्यांत राहूनसुद्धां अच्युतप्रेक्षयतींचा मायावादावरील विश्वास कमी झाला नव्हता. मधून मधून त्यांनीं आचार्यांना प्रश्न विचारून आपल्या मनांतील संशय काढून टाकण्याचा प्रयत्न करावा. ज्यावेळीं आचार्यांनीं रचलेलें ब्रह्मसूत्र भाष्य त्यांनीं पाहिलें त्यावेळीं अच्युतप्रेक्षयतींना अत्यानंद होऊन त्यांच्या मनांतील सर्व संशयाचें निराकरण झालें. श्रीमदाचार्यांनीं ब्रह्मसूत्राला अभिमत असणारें आपलें द्वैततत्व अच्युतप्रेक्षयतींना स्वीकारावयास लावलें.

---

## प्रकरण ९ वें

# श्रीकृष्णाची प्राप्ती



उडुपीस परत आल्यानंतर आचार्यांचा नित्य कार्यक्रम ठराविक पद्धतीनें चालत असे. द्वैततत्वाचा उपदेश करीत असतां त्यांची गंगौघाप्रमाणें चालणारी वाक्सरिता, त्यांची भव्य शरीरयष्टि, विचारसरणींतील तर्कशुद्धता यामुळें श्रोत्यावर विलक्षण छाप पडत असे. विरोधी बुद्धीनें आलेले श्रोतेहि त्यांच्या उपदेशरूपी वाक्सरितेंत सांपडले कीं आपली विरोधी भावना टाकून त्यांच्या चरणीं लीन होत असत.

जीव व ब्रह्म यांचें ऐक्य होणें कसें शक्य आहे? अंधार व प्रकाश, सुख आणि दुःख, ज्ञान व अज्ञान, यांचें ऐक्य होणें कधीं तरी शक्य आहे काय? परमात्मा व जीव यांच्यामध्यें फारच मोठें अंतर आहे. हें अंतर तोडून जीव परब्रह्म होणें कधीं तरी शक्य आहे काय?

जगत् हे आपणांस दिसतें; सुख, दुःख वगैरे हरघडी आपण भोगतो; तर हें जगत् मिथ्या कसें?

अशा तऱ्हेचा प्रत्येकाच्या हृदयाला जाऊन भिडणारा उपदेश ते करीत असत. त्या प्रवचनाकरितां मानवसमाज तर येत असेच, पण गरुड, शेष, रुद्रादिकहि येत असत.

> **विचन्द्रायां प्रभायां तु चंद्रिकाश्रयिणो नराः ।**
> **शेषस्य तेजस्यथ तं यानं मध्वो त्यदर्शयत् ॥**

असें वर्णन पंडिताचार्यांनीं आपल्या ग्रंथांत केलें आहे. आचार्यांचा उपदेश ऐकत असतां सर्व जनतेस आपण एका फार मोठ्या दिव्य विभूतीच्या सहवासांत आहोंत असें वाटत असे. त्यांच्या सभोंवतीं नेहमीं श्रोत्यांचा घोळका असे. आचार्यांच्या मागें सर्व लोक त्यांच्याबद्दल फार मोठ्या भक्तीनें बोलत असत. ते कोठेंहि जावोत, त्यांच्याजवळून कांहीं तरी ज्ञान मिळवयाचेंच.

आचार्यांची बसण्याची व प्रवचनाची जागा अनंतेश्वराच्या देवालयांत होती. आचार्य प्रातःकाळीं आपलें सर्व आन्हिक आटोपून एकदां त्या जागेवर येऊन बसले कीं,एका क्षणांत सर्व लोकांचा मेळावा त्या ठिकाणीं जमत असे. विद्यार्थ्यांचे पाठ चालत. मधून मधून जिज्ञासूंच्या शंका ते निवारण करीत. कित्येक लोक तर पहाटपासून त्या देवालयांत येत असत. आचार्यांचा रोजचा समुद्रस्नानास जाण्याचा नियम असे. तेव्हां त्यांचे-बरोबर ते सर्व भक्तजन जात असत. आचार्यांचीं प्रातःकालीन कृत्यें आटोपलीं कीं पाठ प्रवचनास प्रारंभ होत असे.

आचार्यांची पाठ प्रवचनाची जागा पूर्वीप्रमाणेंच आहे तशी आहे. त्या ठिकाणीं त्यांचें स्मारक वगैरे कांहीं नाहीं. एकदां वादिराज स्वामीनीं त्या ठिकाणीं आचार्यांच्या मूर्तीची स्थापना करावी अशी योजना केली. पण आचार्यांनीं त्यांना स्वप्नांत येऊन अशा तऱ्हेचें स्मारक करण्याची मनाई केली. त्यामुळें तो बेत तसाच त्यांना सोडून द्यावा लागला. त्यानंतर पुन्हां कोणी तसा प्रयत्न केला नाहीं. आतां त्या ठिकाणीं फक्त त्या जागेचें पावित्र्य रक्षण व्हावें एवढ्यासाठीं त्या जागेसभोंवतीं कुंपण वगैरे घातलें आहे. व कोणी यात्रेकरूनें पृच्छा केल्यास त्याला ती जागा दाखविली जाते असें म्हणतात.

अशा तऱ्हेनें आचार्यांचा काल उडुपी येथें जात असतां एके दिवशीं त्यांना विलक्षण उत्साह वाटूं लागला. त्या दिवशीं आपल्या येथें द्वारकाधीश श्रीकृष्ण येणार असें त्यांना कळलें. त्याशिवाय अनेक शुभशकुन होऊं लागले. त्यामुळें आनंदानें पुलकित होऊन व अगदीं पहाटेस उठून तोंडानें मंत्र पाठ करीत समुद्रस्नानास ते निघाले. उडुपीपासून समुद्र सामान्यतः तीन चार मैल लांब आहे. वाटेंत जात असतां रोजच्याप्रमाणें आपल्या शिष्यगणाशीं भाषण वगैरे न करतां एकांतिक चित्तानें श्रीकृष्णाचें ध्यान करीत ते चालले. ते जात असतां त्यावेळीं त्यांच्या मुखांतून सहजस्फूर्त असें स्तोत्र निघूं लागलें. जणूकांहीं पूर्वी पाठ करून ठेवल्याप्रमाणें ते स्तोत्र अस्खलितपणें म्हणूं लागले. ते स्तोत्र द्वादशस्तोत्र या नांवानें प्रसिद्ध आहे.

आचार्यांच्याबरोबर असणाऱ्या शिष्यांना त्यावेळीं आचार्यांशीं बोलण्याचें धैर्य होईना. ते सर्वजण मुकाट्यानें आचार्यांचे मागोमाग येऊं लागले. आचार्य समुद्रावर येईपर्यंत त्या स्तोत्राचे पांच अध्याय पूर्ण झाले. आचार्यांनीं समुद्रावर आल्यानंतर नित्याप्रमाणें स्नान केले. आपले नित्यक्रम आटोपून वाळवंटांतच ते ध्यानस्थ बसले. आनंदोद्रेकानें पुलकित होऊन लावलेल्या ध्यानांत श्रीकृष्णाशिवाय कोण येणार ? बराच वेळ ते ध्यानस्थ होते. प्रातःकाल संपून माध्यान्हास सुरुवात होण्याचे वेळीं त्यांनीं आपले ध्यान संपवून डोळे उघडले. त्यांचे नेत्रांत त्यावेळीं एक प्रकारची दिव्य चमक दिसत होती. त्याच वेळीं त्यांची दृष्टि समुद्र प्रवाहाकडे गेली. तो त्या ठिकाणीं द्वारकेहून माल भरून आलेली नांव वाळूत रुतून बसलेली त्यांनीं पाहिली. त्याबरोबर त्यांनीं आपली शाटी हवेंत फडकाविण्यास प्रारंभ केला. अनेक प्रयत्न करूनहि वाळवंटांत रुतून बसलेली नांव त्या मालकास बाहेर काढतां आली नाहीं. पण आचार्यांनीं ती शाटी फडकविण्यास प्रारंभ करण्याबरोबर त्या फडकविण्यामुळ निघालेल्या वाऱ्याच्या झोतानें ती नांव आपोआप किनाऱ्यास लागली. आंतील सर्व लोक व ती नांव तीरास आणण्याचा प्रयत्न करणारे ते नावाडी सर्वजण आश्चर्यचकित झाले. व आचार्यांनीं आपली शाटी फडकविण्यास प्रारंभ करण्याबरोबर ही नांव तीरावर आली तेव्हां हे कोणीतरी देवतांश असावेत या भावनेनें तो व्यापारी मोठ्या नम्रपणें आचार्यांजवळ आला. व मोठ्या भक्तियुक्त प्रमुदित मनानें प्रणाम करून प्रार्थना केली कीं,

"महाराज, आज आपल्या कृपेनेंच आम्ही या महत्तम संकटांतून वांचलों आहोंत. आपले आमच्यांवर अत्यंत उपकार आहेत. कांहीं केले तरी हे उपकार फिटणें शक्य नाहीं. म्हणून ही नांव आंतील सर्व द्रव्यासह आपणांस समर्पण करीत आहे. तिचा आपण स्वीकार करावा !"

आचार्यांना त्या नावेंतील द्रव्याशीं काय कर्तव्य होते ! त्यांनीं तें द्रव्य घेण्याचें नाकारले. तेव्हां त्या व्यापाऱ्यानें फारच आग्रह केल्यानंतर त्या नावेंतील कांहीं गोपीचंदनाचे खडे आचार्यांनीं निवडून घेतले. ते खडे काढून घेतल्यानंतर त्या व्यापाऱ्यांस व आचार्यांना अत्यंत आनंद झाला. ते खडे आपल्या मठाकडे नेण्यास आपल्या शिष्यांना आचार्यांनीं सांगितले. पण

त्यापैकीं एक गोपीचंदनाचा खडा कांहीं केल्या त्या शिष्यांना उचलेना ! अनेकांनीं प्रयत्न केले, जास्त माणसें आणविलीं. तरीहि पण तो गोपीचंदनाचा मोठा खडा उचलेनासा झाला. तेव्हां आचार्यांनीं स्वतः तो खडा उचलून आपल्या खांद्यावर घेतला व उडुपीकडे प्रयाण केले. तो गोपीचंदनाचा खडा घेऊन जात असतांना आचार्यांना अत्यानंद झाला व आचार्यांनीं पुन्हां मुखानें श्रीहरीचें स्तवन करण्यास प्रारंभ केला. सहाव्या अध्यायास प्रारंभ होऊन बारा अध्यायाचें तें स्तोत्र सहजस्फूर्त होऊन रचलें गेलें. पुढें पुढें आचार्य आनंदोद्रेकानें श्रीकृष्णप्रतिमा आपल्या खांद्यावर घेऊन नर्तन करीत उडुपी क्षेत्राकडे आले.

त्या तीन खड्यांपैकीं एक खडा वाटेंत फुटला. त्यांत बलरामाची मूर्ति निघाली. ज्या ठिकाणीं बलराम प्रतिमेची स्थापना केली तें स्थान आज " वडभंडेश्वर " या नांवानें प्रसिद्ध आहे.

दुसऱ्या गोपीचंदनाच्या खड्यामध्यें सुदर्शन चक्र, शिलेची रवी व दोरी निघाली. तिसऱ्या गोपीचंदनाच्या खडयामध्यें बाल श्रीकृष्णाची प्रतिमा निघाली. ती प्रतिमा पाहून आचार्यांना अत्यंत आनंद झाला त्यांनीं ती प्रतिमा मध्वसरोवरांत आणून स्वच्छ केली व पुढें त्या प्रतिमेची स्थापना केली.

श्रीमदाचार्यांनीं दक्षिण हिंदुस्तानांतल्या पद्धतीप्रमाणें श्रीकृष्णाचें भव्य देवालय बांधलें नाहीं. दक्षिण हिंदुस्तानांत देवालये एकापेक्षा एक भव्य आहेत. पण आचार्यांनीं श्रीकृष्णाचें देवालय अगदी साधें बांधलें. भव्य देवालय बांधणें त्यांना अशक्य होतें अशांतला भाग नाहीं. त्यांच्या एका शब्दानिशीं द्रव्याच्या राशीच्या राशी त्यांचेसमोर येऊन पडल्या असत्या. त्यांनीं देवालयाच्या भव्यतेकडे लक्ष न देतां त्यांनीं देवालयाचा साधेपणा ठेवला. त्यांनीं श्रीकृष्णाच्या पूजेची अत्युत्कृष्ट व्यवस्था ठेवली. उडुपी येथें असतांना आचार्य स्वतः पूजा करीत. पण त्यांचे गैरहजेरींत पूजा करण्याकरितां आपल्या शिष्यांची नानाविध रीतीनें पारख करून त्यांतून आठ जणांची निवड केली. व प्रत्येक शिष्यानें दोन महिने पूजा करावी अशी अनुज्ञा केली. ( पुढें कालांतरानें वादिराजतीर्थांनीं कांहीं अडचणीमुळें ही दोन महिन्यांची पद्धत बंद करून दोन वर्षांची पद्धत

सुरूं केली असें म्हणतात.) या तऱ्हेनें आचार्यांनीं श्रीकृष्णप्रतिमेच्या पूजनाची उत्तम व्यवस्था लावून दिली. याच सुमारास आचार्यांना पुन्हां एकदां बदरिकाश्रमीं वेदव्यासाचे दर्शन घ्यावें अशी इच्छा झाल्यामुळें त्यांनीं तिकडे जाण्याचें ठरविलें.

आचार्य बदरिकाश्रमाहून परत आल्यावर कांहीं काल त्यांनीं उडुपी येथें वास्तव्य केलें. याच अवधींत श्रीकृष्णप्रतिमेचा लाभ होऊन श्रीकृष्णाची उडुपीमध्यें स्थापनाहि त्यांनीं केली. कांहीं कालापर्यंत त्या ठिकाणीं वास्तव्य करून गीताभाष्य, ब्रह्मसूत्रभाष्य, उपनिषद्भाष्यें यांचे पाठ आपल्या शिष्यांना त्यांनीं सांगितलें. आचार्यांनीं ब्रह्मसूत्रावर एकूण तीन ग्रंथ रचले आहेत. ग्रंथास आचार्यांनीं नांवेसुद्धां सार्थ दिलीं आहेत. भाष्यामागून केलेलें व्याख्यान ते अनु व्याख्यान होय. यांत आचार्यांनीं सर्व प्रतिवाद्यांचा यथास्थित समाचार घेतला आहे. तिसरा ग्रंथ न्यायविवरण. यांत आपल्या ग्रंथांत दिलेल्या न्यायतत्त्वाचा उहापोह केला आहे म्हणून यास न्यायविवरण असें नांव त्यांनीं दिलें आहे. उडुपी येथें आल्यावर आचार्यांनीं आपल्या उपरोक्त तीन ग्रंथाचा पाठ आपल्या शिष्यांना सांगण्यास प्रारंभ केला. हा पाठ श्रवण करण्यास अनेक यति त्यांचे शिष्यत्व पत्करून उडुपी येथें येऊन राहिले होते. याच वेळीं त्यांचे गुरु अच्युतप्रेक्षतीर्थ वृंदावनस्थ झाले. अच्युतप्रेक्षतीर्थांनीं विनंति केल्यावरून त्या मठाची परंपरा स्वतंत्र चालावी एवढ्याकरितां त्यांचे पीठावर सत्यतीर्थाची योजना केली. हा मठ सध्यां "**भीमनकट्टी**" या नांवानें प्रसिद्ध आहे.

उडुपी येथें वास्तव्य करीत असतानांच आचार्य ज्या पूगवन वंशांतील आचार्यांजवळ अध्ययनार्थ होते त्यांचे चिरंजीवांनीं यज्ञास प्रारंभ केला. तेव्हां गांवांतील दैत्यस्वभावी लोकांनीं त्यांत विघ्नें आणण्याचा सपाटा चालविला. गरीब बिचारा ब्राह्मण! या दुष्ट लोकांच्या त्रासामुळें त्याचा यज्ञ समाप्त होईना. ब्राह्मण चिंताग्रस्त झाला. इतक्यांत ही हकीकत आचार्यांचे कानावर गेली. आचार्य लगेच त्या ठिकाणीं आले. आचार्य आल्यावर त्यांनीं आपल्या तपःसामर्थ्यानें त्या सर्वांना निष्प्रभ करून आपल्या उपाध्यायपुत्राचा यज्ञ निर्विघ्नपणें समाप्त करविला.

## प्रकरण १० वें

# दुसरी बदरी यात्रा

याप्रमाणें काल जात असतां आचार्यांना पुन्हां बदरिकाश्रमीं वेद-व्यासांच्या दर्शनास जावें अशी इच्छा झाली.नारायण पंडितांनीं यापुढील चरित्र मोठ्या खुबीनें सांगितलें आहे :—

" आचार्य बदरिकाश्रमीं आपल्या शिष्यांसह जाऊन वेदव्यासांच्या दर्शनानें अत्यानंदित होऊन परत उडुपी येथें आले. आचार्य उडुपी येथें दुसऱ्यांदा बदरिकाश्राची यात्रा संपवून परत आलेले पाहून तत्रस्थांना अत्यानंद झाला. मार्गांत घडलेल्या अनेकविध आश्चर्यकारक गोष्टींचें संकलन करून आचार्यांच्या शिष्यांपैकीं एकानें वाटेंतच त्यांचें सुंदर प्रवासवर्णनपर चरित्र लिहिलें होतें. तें चरित्र ऐकण्याची इतरांना फार इच्छा झाली; त्यामुळें सर्वांनीं आचार्यांचें तें चरित्र ऐकविण्याची प्रार्थना केली असतां त्या शिष्यानें या बदरिकाश्रमाच्या दुसऱ्या यात्रेचे वेळीं घडलेल्या गोष्टी त्यांना सांगितल्या. " असें म्हणून नारायण पंडिताचार्यांनीं आचार्यांचें चरित्र सांगण्यास प्रारंभ केला आहे.

आचार्यांचे वेळीं छोटी छोटी अनेक राज्यें त्यावेळीं पसरलेलीं होतीं. महाराष्ट्रांत देवगिरीच्या यादव घराण्याचें राज्य चालू होतें. आचार्यांचे वेळीं देवगिरी या राज्यावर महादेववर्मा नांवाचा राजा राज्य करीत होता. हा राजा सामान्यतः इ. स. १२६० पासून तो १२७१ पर्यंत गादीवर होता. (शालीवाहन शक ११८२ ते ११९३) हा राजा धार्मिक प्रवृत्तीचा व लोकोपकार करण्यांत दक्ष असे. येणाऱ्या जाणाऱ्या लोकांना पाणी पिण्यास मुबलक असावें या सदिच्छेनें तेथून जवळच त्यानें एक तलाव खोदण्यास प्रारंभ केला होता, पण हा तलाव खोदण्याची पद्धत मात्र विचित्र होती. आपल्या गांवांतील लोकांना तर तो वेठीस धरत असेच. पण जाणाऱ्या येणाऱ्या पांथस्थांनाहि वेठीस धरून त्यांचेकडून थोडा तरी तो तलाव खोदून

घेतल्याशिवाय सोडत नसे. आचार्य व त्यांची शिष्यमंडळी मोठ्या जमावानें जात असतां राजाची नजर त्यांचेकडे गेली. त्याबरोबर त्यानें सर्वांना वेठीस धरून सांगितलें कीं, "तुम्ही सर्वांनी मिळून थोडा तरी हा तलाव खोदला पाहिजे." त्याचें हें भाषण ऐकून आचार्यांनीं त्याला नाना तऱ्हेचा उपदेश केला. पण त्या उपदेशाचा परिणाम कांहींहि झाला नाहीं. त्या राजाचें आपलें एकच म्हणणें कीं, "तुम्ही पुष्कळ लोक आहांत व हेंहि लोकोपयोगी कृत्य आहे. तेव्हां तुम्ही सर्वांनीं थोडा तरी तलाव खोदलाच पाहिजे. त्याशिवाय सुटका होणार नाहीं." तेव्हां आचार्यांनीं सांगितलें कीं, हे राजा, आम्हीं संन्यासी! आम्हांस खोदण्याचें काम कसें करावें याची बिलकुल माहिती नाहीं; करितां कसें खोदावें हें आम्हांस दाखव.

आचार्यांचें हें भाषण ऐकतांच त्या राजास मोह होऊन त्यानें खोदण्यास प्रारंभ केला. खोदतां खोदतां त्याचे त्यालाच स्वतःचे इतकें विस्मरण पडलें कीं, आपण राजा आहोंत या गोष्टीचा विसर पडून एखाद्या सामान्य मजूराप्रमाणें तो खोदूं लागला. आचार्यांनीं हें अवलोकन केल्यानंतर त्या ठिकाणाहून त्यांनीं आपल्या शिष्यांसह पुढें प्रयाण केलें.

देवगिरीहून आचार्य शिष्यगणांसह प्रवास करीत गंगातीरावर आले. या ठिकाणीं गंगेच्या पैलतीरावर तुर्कांचें राज्य होतें. अलीकडे हिंदुचें राज्य होतें. आपल्या राज्यांत हिंदूकडून कोणीहि हेर येऊं नये एवढ्यासाठीं त्यानें कडेकोट बंदोबस्त ठेवला होता. परका मनुष्य जर कोणी येथें आला तर त्यांस देहांत शासन द्यावें अशी त्या तुर्क सेनापतीची आपल्या सैनिकांस आज्ञा होती. त्यामुळें गंगानदींतील वहातुक अजिबात थांबली होती. अशा परिस्थितींत आचार्य गंगानदीच्या तीरावर आले. सर्वजण पहातात तों नदी पार होण्याचें एकहि साधन त्या ठिकाणीं नव्हतें. आचार्यांशिवाय सर्व शिष्य अगदीं चिंताक्रान्त झाले. तेव्हां आचार्यांनीं सर्वांस धीर देऊन सांगितलें कीं, मी प्रथमतः गंगानदीच्या पात्रांत उतरतों नंतर एक जणांनीं माझा हात धरावा, त्याचा हात दुसऱ्यांनीं धरावा, अशा तऱ्हेनें साखळी केलीत म्हणजे तुम्ही सर्वजण डोळे झांका मग मी तुम्हांस पैलतीरास घेऊन जाईन. याप्रमाणें सांगितल्यानतर सर्वांनीं त्याप्रमाणें केलें. त्याबरोबर आचार्यांनीं सर्वांस आपल्या अद्भुत सामर्थ्यानें पैल-

तीरास आणले. पैलतीरास आल्यावर हर्षानें सर्वजण कांहीं मार्ग चालून जातात तों त्यांच्या संरक्षणाखालीं आपल्या सरहद्दीचें रक्षण करण्यासाठीं ठेवलेल्या सैनिकांचा गराडा पडला. त्याबरोबर आपल्या शिष्यांना धीर देऊन त्या सैनिकांच्या मुख्यास तुर्क भाषेंत आचार्य म्हणाले कीं, बाबारे, तूं आम्हांस तुझ्या राजाकडे घेऊन चल.

यावेळीं आचार्यांच्या व्यक्तिमत्वाचा परिणाम त्या मुख्याच्या व सैनिकांच्या मनावर होऊन त्यानें मुकाट्यानें आचार्यांना त्यांच्या शिष्यगणांसह आपल्या राजापुढें नेऊन उभे केले. त्या राजाच्या मनावरहि आचार्यांच्या व्यक्तिमत्वाचा परिणाम झाला. जो परक्याशीं निष्ठुरतेनें वागण्यातच स्वतःला धन्य मानीत असे त्यानें आचार्यांपुढें अगदीं नम्रपणें भाषण करावें हा कशाचा परिणाम? त्या राजानें विचारलेः--

" महाराज नदी उतरण्यास कोणतेंहि साधन नसतां आपण ही नदी कशी ओलांडलीत? यमदूतासमान माझे सैनिक हिंडत असतां त्यांच्या तडाख्यांतून तुम्ही कसे वाचलांत?

याप्रमाणें त्याचें भाषण ऐकल्यानंतर आचार्यांनीं त्याला त्याच्याच तुर्क भाषेंत उत्तर दिलें.

" राजा, अरे जो श्रीहरी सर्वांचा नियामक आहे त्याच्याच प्रेरणेनें व शक्तीनें सर्व अडचणींतून पार पडून मी येथें आलों आहे. आम्ही संन्यासी बदरिकाश्रमीं चाललों आहोंत.

आचार्यांचे धीर गंभीर, मधुर व निर्भय असें भाषण ऐकून तो राजा चकित झाला. त्यानें तात्काळ आचार्यांना साष्टांग नमन करून सांगितलें, ' महाराज, आपण वाटेल तेथें जाण्यास समर्थ आहांत. आपणांस अडविण्यास कोण समर्थ आहेत.? "

असें म्हणून त्यांचा आदरसत्कार केला. आपलें अर्धें राज्य देण्यास तयार झाला. पण आचार्यांनीं त्याचा स्वीकार न करतां बदरिकाश्रमीं प्रयाण केले. त्यावेळीं सर्वत्र अराजकता उत्पन्न झालेली होती. त्यामुळें चोर दरोडेखोर, परकीय सैन्य यांचा सर्वत्र सुळसुळाट झाला होता. आचार्य म्हणूनच या सर्व तऱ्हेच्या संकटांतून पार पडले. या तुर्क राजाचा निरोप घेऊन आचार्य पुढें निघाले असतां आचार्यांच्या त्या शिष्यांवर चोरांनीं

हल्ला केला. तेव्हां आचार्यांनीं त्या चोरासमोर आपल्या शाटीचें गांठोडें टाकलें. त्याबरोबर त्या चोरांना हें द्रव्याचेंच गांठोडें असावें असें वाटून त्यांनीं लोभानें परस्परांत मारामारी करून स्वतःचा नाश करून घेतला.

पुढें एकदां आणखी कांहीं चोरांनीं त्यांचेवर हल्ला केला असतां उपेन्द्र-तीर्थ नांवाच्या शिष्यानें चोराचीच तलवार हिसकून त्याचा नाश केला. वास्तविक, उपेन्द्रतीर्थांना तलवार कशी धरावी हेंहि पण माहीत नव्हतें मग ती वापरण्याची गोष्ट तर दूरच. पण विचित्र शक्तीची प्रेरणा त्यांचे ठिकाणीं आचार्यांनीं करविल्यामुळें एखाद्या कसलेल्या योद्ध्याप्रमाणें उपेन्द्रतीर्थांनीं त्या चोरांवर प्रहार करून त्यांची दाणादाण करून टाकली.

दस्यूनवाप्तानवलोक्य सोऽब्रवीत् को मेऽस्ति शिष्यो विभयो ब्रवीत्यलं
अभ्यासवान् तूर्णमुपेन्द्रतीर्थस्तत्तेजसा क्रूरचमूं प्रभोऽभ्ययात् ॥

(भावप्रकाशिकाटीकोदाहृत)

आचार्य प्रवास करीत असतांना त्यांचे सत्यतीर्थ नांवाचे शिष्य, आपल्या खांद्यावर पूजासंभार व देवाची पेटी घेऊन जात असत. हिमालयाचे पाय-थ्याशीं त्यांचा मुक्काम असतांना श्रीमदाचार्यांचा नाश करणें आपल्या शक्तीबाहेरचें आहे असें जाणून एका व्याघ्ररूपी राक्षसानें सत्यतीर्थांवर हल्ला केला असतां आचार्यांनीं नुसत्या करस्पर्शानें त्याला यमसदनास पाठविलें.

मध्वं दुर्विषहं मत्वा देवं संगृह्य चाग्रतः ।
आयान्तं सत्यतीर्थार्यं जिघांसुर्व्याघ्र आपतत् ॥

आणखी एकदां आचार्यांवर असाच प्रसंग आला होता. एकदां कांहीं चोरांनीं त्यांचेवर हल्ला केला असतां आचार्यांनीं आपल्या अद्भुत सामर्थ्यानें आपली सर्व मंडळी पाषाणवत् करून टाकली. त्या चोरांना या दगडाच्या राशी आहेत असें वाटूं लागलें. पण थोड्या वेळानें ते चालूं लागले असतां, त्या चोरांना अतिशय आश्चर्य वाटून त्यांनीं आचार्यांची क्षमा मागितली व आल्या वाटेनें ते निघून गेले.

याप्रमाणें नानाविध संकटांतून पार पडून आचार्य आपल्या शिष्यग-णांसह बदरिकाश्रमीं आले. या संकटांतून आचार्य पार पडले म्हणजे

आचार्यांच्या दृष्टीनें तें कांहीं लोकविलक्षण कृत्य नव्हे. पण या कृत्यामुळें सामान्य लोकांतहि त्यांच्या महानुभावत्वाविषयीं श्रद्धा उत्पन्न होऊं लागली.

नारायणाश्रमांत आल्यानंतर भक्तिपुरस्सर श्री वेदव्यासांचें दर्शन त्यांनीं घेतलें. या वेळेस श्री वेदव्यासांनीं त्यांच्या भक्तीनें व केलेल्या कार्यामुळें संतुष्ट होऊन त्यांना विशेष अनुग्रह म्हणून अष्ट शालिग्रामशिला दिल्या. याबद्दल वायुपुराणांतील मध्वमाहात्म्यांत पुढीलप्रमाणें माहिती दिली आहे.

> दिष्ट्या व्यासाश्रमं गच्छन् मुख्यप्रेष्यो यतो मरुत् ॥
> प्रणिपत्य महान् मध्वो व्यासं निजगुरुं परं ।
> विज्ञापयामास भूमौ स्वख्यापूर्तिसुदुष्करम् ॥
> निशम्य तस्य वाक्यानि व्यासः सर्वांतरात्मकः ।
> स्वाधिष्ठानान् पंच वाष्टौ ग्रावाणः कृपया ददौ ॥

नित्य संनिधान असलेल्या या प्रासादिक शिला मिळाल्यामुळें आचार्यांना अत्यानंद झाला असल्यास नवल नाहीं. त्यानंतर वेदव्यासांनीं ब्रह्मसूत्रांप्रमाणें महाभारताचें तात्पर्य काय आहे हें मुमुक्षूंना सांगण्याची आज्ञा केली. ती आज्ञा मान्य करून आचार्यांनीं "महाभारत तात्पर्य-निर्णय" नांवाचा ग्रंथ तयार केला.

वेदव्यासांची अनुज्ञा घेऊन आचार्य बदरिकाश्रमाहून परत निघाले. त्यांचा शिष्यगण अगोदरच पुढें आला होता. सर्व शिष्य गंगानदी-पर्यंत सुखरूपपणें आले. पण पूर्वीप्रमाणेंच गंगानदी पार होण्यास कांहीं साधन नाहीं हें पाहून ते सर्व अगदीं चिंताग्रस्त होऊन बसले होते. इतक्यांत आचार्य आले. त्यावेळीं आचार्यांना गंगानदी ओलांडण्यास कोणतेंहि साधन नसल्याचें त्यांनीं सांगितलें तेव्हां आचार्यांनीं लगेच अदृश्य होऊन जलस्तंभन विद्येनें ते पैलतीरास गेले. पैलतीरावर असलेल्या जनतेनें आचार्यांचें हें अद्भुत कृत्य अवलोकन करून हे कोणीतरी महानुभाव असावेत अशा विचारानें मोठ्या आदरानें त्यांची यथोचित पूजा केली; व लगेच गांवच्या राजास हें वर्तमान लोकांनीं कळविलें. तें वर्तमान ऐकतांच राजा

त्या ठिकाणीं आला. राजानेंहि त्यांचा आदर सत्कार केला. आदर-सत्कार झाल्यानंतर आपली शिष्यमंडळी पैलतीरावर आहेत तरी त्यांना इकडे आणविण्याची व्यवस्था करण्यास सुचविलें. त्याबरोबर त्या राजानें नावा नदींत घालून सर्व शिष्यांना या तीरावर आणले आचार्यांच्या या महात्म्यामुळें गांवांतील लोकांनीं व राजानें त्यांना कित्येक दिवस ठेवून घेऊन त्यांचा सत्कार केला.

यावेळीं चातुर्मास्य जवळ आल्यामुळें आचार्यांनीं हस्तिनापुर क्षेत्रांत चातुर्मास्यार्थ वास्तव्य केलें. चातुर्मास्य आटोपल्यानंतर आचार्य काशी येथें आले. काशी येथें आल्यानंतर गंगा देवीनें आपणावर अनुग्रह करण्याची प्रार्थना केली. काशी येथें त्यावेळीं मोठमोठे पंडित होते. प्राचीन कालापासून काशी हें विद्वानाबद्दल प्रसिद्धच आहे. म्हणून काशी येथील पंडितांना आपलें तत्व मान्य करावयास लावणें जरुरीचें होतें. नाहींतर तेवढाच अविश्वास लोकांच्या मनांत उत्पन्न झाला असतां. म्हणून आचार्य काशी येथें आले. काशी येथें त्यावेळीं इंद्रपुरी या नांवाचा मोठा पंडित होता. त्याचा शिष्यपरिवारहि मोठा असून त्याला कोणीहि जिंकलें नव्हतें. त्यामुळें विद्वत्तेचा उन्मत्तपणाहि त्याचे ठिकाणीं भरपूर होता. त्यानें आचार्यांबरोबर मोक्षसाधनांत ज्ञान व कर्म हीं श्रेष्ठ आहेत याबद्दल वादविवाद करण्यास प्रारंभ केला. पण सुरवातीसच त्याला आचार्यांनीं निरुत्तर केलें.

"ज्ञान मिथ्या, ज्ञानी मिथ्या, सत्कर्मानुष्ठान मिथ्या, सत्कर्मानुष्ठाताहि मिथ्याच आहे तर मिथ्या साधनानें प्राप्त होणारा मोक्ष तरी सत्य आहे काय?" असा प्रश्न त्यांनीं विचारला. मायावादादि मतांत सेव्यसेवकभाव परमात्मा व जीव यांत नसल्यामुळें ज्ञान, सत्कर्मानुष्ठान वगैरे जुळतच नाहीं. या तऱ्हेनें समर्पक उत्तर सुरवातीसच देऊन त्याला निरुत्तर केलें. पंडितांचे माहेरघर म्हणून समजल्या जाणाऱ्या या काशींत इंद्रपुरीसारख्या पंडिताचा ज्ञानमार्ग, कर्ममार्ग याविषयीं वादविवाद करून पराभव केला या गोष्टीचा तेथील विद्वानांवर व सामान्य जनतेवर चांगलाच परिणाम झाला.

आचार्य काशीस असतांना त्यांच्या शिष्यवर्गात आपल्या सामर्थ्याविषयीं नसता गर्व उत्पन्न झाला होता व त्याचा परिणाम म्हणजे आपआपसांत तंटे वगैरे ते शिष्य करूं लागले होते, तेव्हां त्या शिष्यांचा गर्वहरण

करण्याकरितां एके दिवशीं शिष्यांना त्यांनीं सांगितलें कीं, "तुम्हांस जो तुमच्या सामर्थ्याचा गर्व झाला आहे तो अगदीं वृथा आहे. तुम्ही माझ्या-बरोबर बाहुयुद्ध करण्याकरितां एकटे अगर सर्वजण मिळून या."

याप्रमाणें सांगितल्यानंतर त्या शिष्यांचा आचार्यांनीं गर्वपरिहार केला.

आचार्य देशसंचार करीत असतां त्यांनीं अनेक पंडितांना वादांत जिंकले. त्याप्रमाणें सामान्य जनतेला नानाविध आश्चर्यकर्मे करून आपल्या भजनीं लावलें. त्यांचेबद्दल त्यांचे भक्तजन प्रेम बाळगीत असत, यांत संशयचनाहीं. पण कित्येक ठिकाणीं शैवलोकहि त्यांना अत्यादरानें बोलवीतअसत.

हृषिकेश क्षेत्रीं आचार्यांचा मुक्काम असतां साक्षात् रुद्रदेवांनीं ब्राह्मण-द्वारा भिक्षेकरितां निमंत्रण दिले. हृषीकेश क्षेत्रापासून जवळच एका गांवीं एक शिवालय होतें. त्याचा पुजारी म्हणजे एक महाकट्टर अद्वैतवादी होता. नेहमीं वैष्णवांचा द्वेष करावयाचा. आचार्यांचा मुक्काम त्या गांवीं असतां साक्षात् रुद्रदेवांनीं त्याला अरुणोदयीं स्वप्नांत येऊन सांगितले कीं, "अरे उठ. प्रत्यक्ष माझे गुरु आले असतां त्यांचा तूं आदरसत्कार करीत नाहींस ? माझी तूं भक्ति करतोस म्हणून मी मुद्दाम तुला सूचना देत आहे. माझी भक्ति करून माझ्या गुरुचा द्वेष तूं करशील तर माझ्या पूजनाचा उपगोग होणार नाहीं." याप्रमाणें स्वप्न पडल्याबरोबर तो ब्राह्मण खडबडून जागा झाला.प्रातरान्हिक सर्व आटोपून त्यानें मोठ्या भक्तिभावानें आचार्यां-कडे येऊन त्यांना वंदन केलें व प्रार्थना केली कीं, "महाराज आपण आमच्या येथें भिक्षा स्वीकरण्यास यावे." ही त्यांची प्रार्थना ऐकून या ब्राह्मणाला कोण प्रेरक आहे हे त्रिकालदर्शी आचार्यांनीं जाणले. व त्याच्या आमंत्रणाचा स्वीकार केला. आचार्यांनीं आमंत्रणाचा स्वीकार केल्यामुळें त्या ब्राह्मणास अत्यानंद झाला. प्रमुदित मनानें त्यानें घरीं येऊन आचार्यांच्या स्वागताची तयारी करून दुसरें दिवशींच त्यांना आपल्या घरीं संभ्रमानें आणून त्यांना भिक्षा समर्पण केली. त्यानंतर तो स्वतःला अगदीं धन्य मानूं लागला. तेव्हांपासून त्या कट्टर शैवानें वैष्णवद्वेष सोडून दिला.

आचार्यांनीं द्वैततत्वोपदेश करण्याकरितां म्हणून सर्व भरतखंडांत तीन वेळां संचार केला. भरतखडांतील एकहि प्रान्त नव्हता कीं, ज्या ठिकाणीं

आचार्यांनीं संचार केला नाहीं? या तऱ्हेनें आचार्य गोवा प्रान्तीं आले. गोवा प्रान्त हा आजला जरी राजकीय शासकांच्या भिन्नपणानुळें निराळा वाटत असला तरी तो पूर्वींपासून भरतखंडांतच अंतर्भूत होतो. उडुपी येथें जाण्यास जसा भूमार्ग आहे तसाच या बाजूनें समुद्र मार्गानेंहि मंगळूरास जातां येतें. मंगळूरहून पन्नास मैलांवर हें उडुपी क्षेत्र आहे. समुद्र किनाऱ्यानें भूमार्गहि आहे. त्यामुळें आचार्यांना तो प्रांत अगदीं जवळचा होय. आचार्यांनीं त्या ठिकाणीं संचार करून आपली शिष्य-शाखा निर्माण केली आणि द्वैततत्वाचा प्रसार केला. ( सध्यां त्या ठिकाणीं गोकर्ण मठ म्हणून आहे. त्या मठाचे अधिपति श्री १०८ द्वारकानाथतीर्थ सध्यां आहेत. मठाकडून अहर्निश पाठप्रवचन, ग्रंथप्रकाशन चालू असते. त्या मठाधिपतींचा मुक्काम पर्तगाळी येथें असतो.

आचार्यांचा नानाविध तऱ्हेचा महिमा त्या देशाच्या राजाच्या कानावर गेला. त्या राजानेंहि नाना तऱ्हेनें त्यांची सेवा केली. आचार्यांवर त्याची श्रद्धा बसली. गोवाप्रान्तांत आचार्यांचा नेहमीं संचार होत असेच पण या राजाला अशी लहर आली, लहर म्हणण्यापेक्षां त्याच्या राजेपणाचा तमोगुण जागृत झाला असें म्हटल्यास जास्त सयुक्तिक होईल, व राजानें आचार्यांची प्रार्थना केली कीं "महाराज, आपण याच ठिकाणीं वास्तव्य करावें. आपला सर्व खर्च करण्याची मला ऐपत आहे हें आपण जाणताच."

आचार्यांनीं त्याचें भाषण ऐकून उपरोधिक हास्य केलें. त्याच्या भाषणाला दुरभिमानतेचा उग्र दर्प येत होता. अशा स्थितींत आचार्य त्या ठिकाणीं राहातील कसे? आणि आचार्यांचा अवतार एके ठिकाणीं राहून राजोपचार भोगण्याकरितां थोडाच होता! त्यांचेपुढें कितीतरी महत्कार्य होतें. पण त्या महत्कार्याची कल्पना त्या राजास काय असणार? योग्य समयीं आपलें या ठिकाणचें कार्य तूर्तातूर्त संपलें असें वाटल्यानंतर आचार्य दुसरीकडे निघाले. तेव्हां आपण एवढें राजाधिराज व आपली विनंति न ऐकतां हे आचार्य परत निघाले हें पाहून त्या राजाला संताप आला व त्यानें त्या प्रान्ताच्या सरहद्दीवर लगोलग सैनिकांच्या चौक्या बसवून त्या चौकीवाल्यास आचार्य आले कीं, त्यांना बाहेर सोडू नका

अशी सक्त ताकीद दिली. पण आचार्यांना कोण अडवूं शकेल? आचार्य तशा स्थितींतहि निघून गेले. तेव्हां त्या राजाला अतिशय वाईट वाटलें. आचार्यांचा असा छळ केल्याबद्दल प्रान्तांतील सज्जनांनीं राजाची कडक रीतीनें निर्भत्सना केली. तेव्हां राजास फार पश्चाताप झाला. राजतेज ब्राह्मतेजापुढें फिके पडले. भगवंताचा नियम आहे कीं, राजतेज ब्राह्मतेजापुढें पराभूत व्हावयाचेच. त्याचप्रमाणें या ठिकाणीं स्थिति झाली. राजाला आपल्या कृत्याबद्दल अतिशय पश्चाताप झालेला पाहून पुन्हां कांहीं दिवस गोवा प्रान्तांत आचार्य येऊन राहिले होते.

गोवा प्रान्तांत असतां एकदां संगीतश्रवणोत्सव झाला. त्या वेळीं आचार्यांनीं जमलेल्या सर्व लोकांना गायनाचें महत्व सांगितलें. या गायनाच्या योगानें गाणारा जो राग गात असेल तद्वत् परिस्थिति निर्माण होते असें त्यांनीं सांगितलें. जमलेल्या सर्व लोकांना तें कांहीं खरें वाटेना. श्रोतृगणांनीं याबद्दल सप्रयोग खात्री करून देण्याबद्दल विनंति केली असतां ती विनंति आनंदानें मान्य करून निर्जीव झालेल्या वनस्पती आचार्य गाऊं लागल्यानंतर प्रफुल्लित झाल्या हें पाहून सर्व लोकांना अत्यंत आश्चर्य वाटलें.

हनुमंताचें गायनहि अत्यंत दिव्य असे. ते गायन करूं लागले म्हणजे पाषाण देखील विरघळत असत. हा त्यांचा गानलौकिक ऐकून नारद, तुंबरु हे उभयतां त्यांची परीक्षा पाहण्याकरितां आले. व त्यांनीं गायन ऐकविण्याची विनंति केली. त्यांच्या विनंतीप्रमाणें हनुमंतांनीं गायनास प्रारंभ केला. समोरच्या शिलेवर आपआपल्या वीणा ठेवून ते हनुमंतांचें गायन ऐकूं लागले. तेव्हां थोड्या वेळानें हनुमंतांचें गायन रंगांत आल्यावर ज्या शिलेवर नारद, तुंबरु बसले होते त्या शिला विरघळूं लागल्या. इतक्यांत हनुमंताचें गायनहि थांबलें. त्याबरोबर पाषाणहि पूर्ववत् घट्ट झाले. पण त्या पाषाणाच्या रसांत त्या वीणा अडकून बसल्या. तेव्हां नारद तुंबरुचा गर्व परिहार होऊन आपल्या वीणा परत देण्याबद्दल त्यांनीं प्रार्थना केली. त्यांच्यावर अनुग्रह करून हनुमंतांनीं त्या वीणा त्या

पाषाणांतून काढून दिल्या. या तऱ्हेनें हनुमंताचें गानमहात्म्य होतें. त्याचेंच अवतार म्हणजे श्रीमन्मध्वाचार्य होत.

हस्तिनावती, कुरुक्षेत्र इत्यादि ठिकाणीं संचार करीत असतां ती स्थळें पाहून आचार्यांना भीमावतारीं केलेल्या कृत्याचें स्मरण होऊन या ठिकाणीं अमकें कृत्य झालें असें नेमकें ते सांगत असत. कुरुक्षेत्रांत असतांना भीमानें ज्या गदेनें दुर्योधनाशीं युद्ध केलें ती गदा दाखविली. कुतूहलानें १०।५ शिष्यांनीं ती गदा उचलण्याचा प्रयत्न केला. पण कोणासहि गदा उचलली नाहीं. पण आचार्यांनीं ती गदा उचलली व त्याचे हातहि करून दाखविले. जाठर प्रभाव आचार्यांनीं अनेक वेळां दाखविला. एकदां तर तीस घागरी दूध व एक हजार केळीं आचार्यांनीं भक्षण केलीं असें त्यांचे चरित्रकार सांगतात.



## प्रकरण ११ वें

# जयसिंह राजाची भेट

या तऱ्हेनें बदरिकाश्रमाहून परत येतांना नानाविध चमत्कार करून, अनेक पंडितांना वादांत जिंकून त्यांनीं सर्वत्र स्वमतस्थापना केली मुमुक्षूंना तत्वोपदेश करीत आचार्य परत गोवा प्रान्ताच्या मार्गें उडुपी येथें आले. या वेळेपर्यंत आपल्या सिद्धान्तप्रतिपादनासाठीं त्यांनीं अनेक ग्रंथ रचले होते. मार्गांत, मुक्कामीं असतांना आचार्यांचें अध्यापनकार्य अखंडपणें चालत असें. आचार्यांचे जवळ अनेक विद्वान् मंडळी द्वैतसिद्धान्ताच्या अध्ययनार्थ येऊन राहिली होती. त्यांत विशेषतः पद्मनाभतीर्थ, नरहरीतीर्थ, माधवतीर्थ, अक्षोभ्यतीर्थ, त्रिविक्रमपंडिताचार्य, सत्यतीर्थ वगैरे संन्यासी प्रमुख होते. आचार्यांचे नंतर व ते या भूतलावर असतांना वरील मंडळीनीं द्वैतसिद्धान्ताच्या प्रसाराचें कार्य यथाशक्ति केलें.

श्रीमदानंदतीर्थ श्रीपादांनीं अनेक तऱ्हेनें आपल्या द्वैतसिद्धान्ताचा प्रसार करण्याचा तडाखा चालविला होता. त्यांच्या प्रवचनास भूलोकावरील जनतेनें यावें यांत आश्चर्य कांहींच नाहीं. पण वेदव्यासप्रणीत ब्रह्मसूत्रावरील भाष्य ऐकण्याकरितां अनेक देव येत असत. एकदां उडुपी येथें श्रीकृष्णदेवालयांतील पटांगणांत अनेक विद्वज्जन त्यांचें प्रवचन ऐकण्याकरितां जमले होते. एका बाजूस आचार्यांचे सत्यतीर्थादि परमशिष्यगण बसले होते. तर दुसऱ्या बाजूस अनेक विद्वज्जन बसले होते. वद्यपक्षांतील दिवस! प्रवचन करतांना आचार्यांची वाक्गंगा अस्खलितपणें वाहात होती. सर्व जनताहि तन्मयतेनें त्यांचें प्रवचन ऐकत होती. अंधार पडत असल्याचें कोणाच्याहि लक्षांत आलें नाहीं. वद्यपक्षांतील अखेरचे दिवस असूनहि पौर्णिमेप्रमाणें चंद्राचा प्रकाश त्या ठिकाणीं पडल्याचा भास होत होता. अशा स्थितींतच आचार्यांनीं आपलें प्रवचन संपविलें. जवळच सत्यतीर्थादि संन्यासी होते. त्यांनीं आचार्यांस म्हटले, " महाराज, वद्यपक्षांतील शेवटचे दिवस असूनहि शुभ्र चांदणें कसें पडलें आहे ?"

. हें आपल्या शिष्याचें भाषण ऐकून आचार्य म्हणाले:--हा चंद्राचा प्रकाश नसून भाष्यप्रवचन ऐकण्याकरितां म्हणून शेष हे सनकादिक ऋषींसह येत असतात. हा जो पांढरा स्वच्छ प्रकाश दिसतो तो चंद्राचा नसून तो शेषाच्या शरीराचा प्रकाश आहे. असें म्हणून आकाशांतून जाणाऱ्या शेषादिक सर्वांना त्यांनीं दाखविलें.

विचंद्रायां क्षपायां तु चंद्रिकाभ्रमिणो जनाः ।
शेषस्य तेजस्य तं यान्तं मध्वो व्यदर्शयत् ॥

खालचे लोक आपणांस पाहत आहेत हे शेष देवांच्या लक्षांत येण्याबरोबर ते आपल्याबरोबरच्या ऋषिगणांसह अदृश्य झाले. त्या लोकांना समक्ष कित्येकांनीं पाहिल्यामुळें लोकांच्या मनांत मध्वाचार्यांच्या महानुभावत्वाविषयीं विश्वास दृढतम होत चालला.

सामान्यत: जगाचा नियम आहे कीं, एखाद्याचा उत्कर्ष होऊं लागला म्हणजे दुर्जनांचा तिळपापड होऊन जातो. असे दुर्जन सज्जनांच्या होणाऱ्या उत्कर्षाला प्रतिबंधहि करू शकत नसल्यामुळें तर ते जास्त पिसाळल्यासारखे होतात. मध्वाचार्यांचा उत्कर्ष सर्वत्र होऊं लागला आहे. सर्वजण अद्वैतमताचा त्याग करून श्रीमध्वाचार्यांकडे वळत आहेत हें पाहून कित्येक अद्वैत्यांच्या अंगाचा भडका उडून गेला. त्यांच्यापैकीं एकासहि आचार्यांसमोर येऊन अद्वैतमताची स्थापना करतां येणें शक्य नव्हतें. अशा स्थितींत काय करावें हें त्या पंडितांना सुचेना ? चोर चोरी करतांना पराभूत झाले तर शास्त्यांना शरण जाऊन आपलें रक्षण करून घेण्याऐवजीं आपल्या नायकांनाच शरण जातात. त्याप्रमाणें अद्वैतमताचा सर्वत्र अपकर्ष होत असलेला पाहून तदभिमान्यांनीं आपले सांप्रदायिक गुरु शंकराचार्य यांचेकडे शरण जाण्याचें ठरविलें. त्यावेळीं शंकराचार्यांनीं स्थापन केलेल्या श्रृंगेरी पीठावर पद्मतीर्थ नांवाचे यती होते. हे पद्मतीर्थ श्रीमन्मध्वाचार्यांशीं अनंतशयन, इत्यादि ठिकाणीं वादविवाद करून पराभूत झालेल्या विद्याशंकरतीर्थांचे शिष्य होत. श्रीमध्वाचार्यांबरोबर वादविवाद करतांना विद्याशंकरतीर्थांसारख्या पंडिताची काय स्थिति झाली हें पद्मतीर्थांस

माहीत असल्यामुळें विद्याशंकरतीर्थ समाधिस्थ झाल्यानंतर ते आपल्या गांवीं स्वस्थचित्त होते.त्यांची खात्री होती कीं,जें कार्य आपल्या गुरुच्या हातून झालें नाहीं तें कार्य आपल्या हातून होणें सुतरां संभवनीय नाहीं. म्हणून ते स्वस्थ बसले होते. ते जरी निराश झाले होते तरी त्यांचे कट्टर अनुयायी निराश झाले नव्हते. त्यांनीं पुंडरीकपुरी नांवाच्या एका संन्याश्यास पुढें करून पद्मतीर्थांचे मन वळविण्याचा प्रयत्न सुरू केला. हा पुंडरीकपुरी नांवाचा संन्यासी जसा वेदांतशास्त्रांत निपुण होता तसाच तो जारण–मारण विद्येंतहि अत्यंत निष्णात होता. याचें वर्णन पुढीलप्रमाणें चरित्रकारांनीं दिलें आहे.

> यो गुप्तपटलोक्तायां भैरवी चक्रसंगतौ ।
> सांकर्यां परविद्यायां महावाग्म्यसतां गुरुः ॥
>
> –भावप्रकाशिका टीका.

या तऱ्हेनें ही गोष्ट साध्या मार्गानें सिद्ध न झाल्यास, वाममार्गानें मध्वाचार्यांचा पाडाव करूं, असा त्या पुंडरीकपुरीचा विश्वास होता. पद्मतीर्थांकडे जाऊन सर्वांनीं मध्वाचार्यांचेबद्दल गाऱ्हाणें सांगितलें.

" पहा, या मध्वाचार्यानें अद्वैत मताचा उच्छाद मांडला आहे. तो तुम्हांस कसा सहन करवतो ? तुम्ही खुद्द शंकराचार्यांचे पीठावर आरूढ झाला आहांत. त्यामुळें अद्वैत मताचा होत असलेला अपकर्ष सहन कसा करतां ? "

हें त्यांचें भाषण ऐकून पद्मतीर्थांना विचार पडला. कारण ज्याच्यापुढें आपल्या गुरूचा प्रभाव पडला नाहीं त्यांचेपुढें आपला निभाव कसा लागेल या विचारानें ते स्तब्ध बसले. त्या स्तब्धतेचा अर्थ त्यांच्या अनुयायांनीं जाणला. व पद्मतीर्थांना त्वेष आणण्यासाठीं म्हणून त्या मत्सरग्रस्त लोकांनीं पद्मतीर्थांना लागेल असें भाषण करण्यास सुरवात केली.

" तुम्हांस विद्या नाहीं, तुमचेजवळ पुरेसें धन नाहीं, ऐश्वर्य नाहीं, व्यक्तित्व नाहीं. तुमच्या हातून त्यांचा पाडाव होणें शक्य नाहीं. अग्नीचा स्पर्श झाला असतां तूप विरघळतें. पण नुसतें अग्नीचें नांव घेतल्यावर तूप विरघळत नाहीं. पण तुम्ही मात्र मध्वाचार्यांचें नांव ऐकतांच भयभीत

होतां. तुम्ही भीरु असल्यामुळें तुमच्या हातून त्यांचा पाडाव होणें शक्य नाहीं. तुम्हांस द्वैतमताचा उत्कर्ष हा परमप्रिय दिसतो."

या प्रमाणें आपल्या अनुयायांचे भाषण ऐकून पद्मतीर्थानाहि " आपण मध्वाचार्यांच्या या उत्कर्षास पायबंद घालावा" असें वाटूं लागलें. शिवाय त्यांच्या अनुयायांनीं पद्मतीर्थाच्या मनांत भरवून दिलें कीं," साध्या मार्गानें ही गोष्ट सिद्ध न झाली तर जारण–मारण विद्येच्या योगानें आपण मध्वाचार्यांचा नाश करूं. द्वैततत्व नवीन आहे, कल्पित आहे, श्रुतिस्मृतीचा तर त्यांस मुळींच आधार नाहीं."

तेव्हां पुंडरीकपुरीच्या आधारें आपण हें कार्य करावेंच अशा विचारांनीं या अहंमन्य पंडित यतीला पुढें करून ते सर्व टोळकेंच्या टोळके आचार्यांबरोबर वादविवाद करून पराभव करण्याकरितां उडुपी येथें आले.

आचार्यांनीं भाट्ट, प्रभाकार, बौद्धादि मतांचें निराकरण केलें होतें. त्यांच्या पुढें कोणीहि पंडित वादासाठीं येत नसत. अशा वेळेस पुंडरीकपुरीसह पद्मतीर्थ त्या ठिकाणीं आले. वेदार्थाबद्दल चर्चा सुरू झाली. नुसत्या श्रीमन्मध्वाचार्यांच्या वेदोच्चारणानेंच सर्व जनता मुग्ध होऊन गेली. लोकांना असें वाटूं लागलें कीं, हे वेदव्यास आहेत कीं, साक्षात् मूर्तिमंत वेदच मध्वाचार्यांचे रूपानें अवतीर्ण झाले आहेत. वेदोच्चारण कसें असावें याबद्दल एका कवीनें म्हटलें आहे कीं,

यथा व्याघ्री हरेत्पोतं दंष्ट्राभ्याम् न तु पीडयेत्।
भीता पतनभेदाभ्याम् तद्वद्वर्णान् प्रयोजयेत् ॥

सारांश आचार्यांचें सुस्पष्ट, मधुर व ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत यांनीं युक्त वेदोच्चारण ऐकून सर्व जनता मुग्ध होऊन गेली. त्यांतून अर्थाची भर पडली. सर्वांना तें वेदप्रवचन ऐकून कृतकृत्य झाल्यासारखें वाटलें; पुंडरीकपुरी व पद्मतीर्थ हे दोघेहि त्यांचेसमोर मूक बनले. त्यांच्या अंगास दरदरून घाम सुटून त्यांना ग्लानि आली. वाद चालू असतां आचार्यांचे समोर त्या पुंडरीकपुरीला "अग्निना रयिं" यासारख्या साध्या वाक्याचा पदच्छेदहि करतां येईना ! त्यामुळें सर्व मायावादी निराश होऊन पराजित झाले.

**आनंदतीर्थपार्थस्य भयादास्ते स पृष्ठतः ।**
**पुरतः स्थापयित्वान्यान पद्मतीर्थजयद्रथः ॥**

याप्रमाणें पराजय झाल्यानंतर पद्मतीर्थादिक आपल्या शिष्यांचा त्याग करून निघून गेले.

पण जातां जातां आपला दुष्ट स्वभाव त्यांनीं प्रगट केलाच. आपला उद्देश सरळ मार्गानें सिद्धीस जात नाहीं असें पाहून आचार्यांचा अमोलिक ग्रंथसंग्रह चोरून तो नष्ट करण्याचें त्यांनीं ठरविलें. आचार्यांचा हा अपूर्व ग्रंथसंग्रह एका लिकुच वंशीय शंकरभट्ट नामक ब्राह्मणाचे घरीं असे. तो ग्रंथसंग्रह पद्मतीर्थादिकांनीं पळविला. तेव्हां त्या ब्राह्मणानें सर्व हकीकत आचार्यांना कळविली. आचार्य ताबडतोब त्यांचे पाठोपाठ आपल्या शिष्यागणांसह गेले. आचार्य आल्याची वार्ता कळली कीं, पुढें पद्मतीर्थांनीं पळून जावें. पद्मतीर्थांची अशी अवस्था करून टाकली, हें पाहून उरलेले अद्वैती लोक अतिशय भिऊन गेले.

त्यांच्या चरित्रकारांनीं या अनुयायांच्या स्थितीबद्दल मोठें बहारीचें वर्णन केलें आहे.

आनंदतीर्थपुंसिंहो मायावादिदितेः सुतान् ।
विदार्य युक्तिनखैरप्रतीपोभिभासते ॥
नृहरिःसकलज्ञनामकःसनुपैति हि मायिदानवान् ।
प्रपलायनमत्र तत्क्षमं त्वरयावो वसतिर्गुहासु च ॥
द्रवत द्रवताशु मायिनः प्रविशध्वमतंद्रिता गुहाः ।
कमलारमणाम्बराश्रयः समुदेत्यखिलज्ञभास्करः ॥

यावेळेसच चातुर्मास्यास सुरुवात झाल्यामुळें आचार्यांनीं “ प्रागवाट” नांवाच्या गांवीं ( कोटिपाडि ) चातुर्मास्यार्थ वास्तव्य केलें. पद्मतीर्थ वगैरे “ कावु ” नांवाच्या गांवीं आपल्या मठांत वास्तव्यार्थ राहिले.

श्रीमदाचार्यांनीं पुंडरीकपुरी व पद्मतीर्थ वगैरेंचा वादांत पराभव केल्यानंतर ते पळून गेले. व जातांना श्रीमध्वाचार्यांचा ग्रंथसंग्रह एका

ब्राह्मणाच्या घरीं होता तो त्यांनीं पळविला. तेव्हां श्रीमध्वाचार्य त्या पद्मतीर्थांच्या पाठोपाठ निघाले.

याप्रमाणें पद्मतीर्थाजवळून आपला ग्रंथसंग्रह घ्यावा म्हणून आचार्य त्याच्या पाठोपाठ हिंडत असतां चातुर्मास्यास सुरुवात झाल्यामुळें आचार्यांनीं एके ठिकाणीं वास्तव्य केले व पद्मतीर्थादिकहि आपल्या 'कावु' नामक मठांत राहिले.

या वेळेस आचार्यांचा महिमा कुंबलग्रामाधिपती राजा जयसिंह याच्या कानीं गेला. हा जयसिंह राजा विद्वान् चिकित्सक असा असून त्यानें आपल्या पदरीं पुष्कळ पंडित ठेविले होते. आचार्यांचें अश्रुतपूर्व असें तत्वज्ञान, तसेंच त्यांचें अलौकिकत्व ऐकून त्याचें मन साहजिकच आचार्यांकडे ओढ घेऊं लागलें. व त्यानें लगेच आपला दिवाण आचार्यांना आपल्या गांवीं आणण्याकरितां पाठविला. ही हकीकत पद्मतीर्थांनीं ऐकल्यावर आतां हें ग्रंथचौर्याचें प्रकरण या जयसिंह राजापर्यंत गेल्यास आपणास हितकारक होणार नाहीं असें वाटून त्यांनीं सर्व ग्रंथसंग्रह आचार्यांकडे एका मध्यस्थातर्फे आणून पोहोंचता केला. पण आचार्यांनीं अशा तऱ्हेनें तो ग्रंथसंग्रह घेण्याचें नाकारलें. "जयसिंह राजापुढें याचा न्यायनिवाडा झाल्यावर मग घेऊं" असें त्यांनीं त्या मध्यस्थास सांगितलें.

यावेळीं आचार्यहि या जयसिंह राजाकडे जाण्याचे उद्देशानें निघाले होते. आचार्यांचा मुक्काम यावेळीं तेथेंच आसपासच्या गांवीं होता. या जयसिंहराजाची आचार्यांवर अतिशय भक्ति होती. या जयसिंह राजाबद्दल भावप्रकाशिकाकारांनीं खालीलप्रमाणें आशीर्वादात्मक श्लोक दिला आहे.

**स्वस्सुंदरीभुजलतापरिरम्भणीधूः**
**पौरंदरी भवति यं भजतां भुजिष्या ॥**
**आनंदतीर्थ भगवत्पदपद्मरेणुः**
**स्वानंददो भवतु ते जयसिंह भूपे ॥**

जयसिंहराजाच्या दिवाणानें नम्रपणें येऊन आचार्यांना वंदन केलें व जयसिंह राजाची प्रार्थना त्यांना सांगितली. त्यावेळीं आचार्यांनीं त्याला राजाकडे येण्याचें अभिवचन देऊन लगेच तिकडे जाण्याचें ठरविलें.

इकडे जयसिंह राजाच्या योगानें आपली मानखंडना होण्याचा प्रसंग आला आहे हें पाहून पद्मतीर्थ व त्यांचे अनुयायी यांचे मनांत द्वेषबुद्धि फारच प्रज्वलित झाली. त्यांनीं आचार्यांना मारण्याचें ठरविलें. जवळच एका शूद्र गृहस्थाची जहागीर होती. त्या जहागीरदाराकडे जाऊन पद्मतीर्थांनीं आपलें गाऱ्हाणें सांगितलें. तो राजा पद्मतीर्थांचा नामधारी शिष्य होता. त्यानें तें गाऱ्हाणें ऐकून पद्मतीर्थांच्या म्हणण्याप्रमाणें श्रीमन्मध्वाचार्यांना मारण्याचें ठरविलें. जयसिंह राजाकडे आचार्य येत असतां दुर्दैवानें वाटेंत त्याच जहागीरदाराच्या गांवीं त्यांचा मुक्काम पडला. गांवाबाहेरील देवालयांत रात्रीचे वेळीं आचार्य शांतपणें ध्यानस्थ बसले होते. सर्व शिष्यगणहि शांत चित्तानें झोंपला होता. अशा वेळीं तो जहागीरदार त्या ठिकाणीं आपल्या हातांत शस्त्र धारण करून देवालयाजवळ आला. त्यावेळीं आचार्यांनीं देवालयाचा दरवाजा बंद केलेला होता. तो त्यानें खडखडविण्यास प्रारंभ केला. आचार्यांनीं दरवाजा उघडला. त्याबरोबर शस्त्रधारी त्या जहागीरदाराला पाहून आचार्यांनीं त्याच्या मुद्रेवरून त्याचा उद्देश ओळखून त्यांस सांगितलें कीं, " तूं जर एक पाऊल पुढें टाकशील तर तुला मृत्यु येईल. "

त्यावेळीं आचार्यांचें रौद्ररूप त्या राजानें पाहिलें. तें रौद्ररूप अत्यंत भयंकर असें पाहून तो राजा अत्यंत गर्भगळित झाला. हातांतून शस्त्र गळून पडलें. त्याला आचार्यांचे समोर जाण्याचें धैर्य होईना. तेव्हां तो धांवतच आपल्या पुरोहिताकडे आला. पुरोहितासह आचार्यांकडे येऊन पुरोहिताच्या द्वारें आचार्यांची प्रार्थना करूं लागला. त्या पुरोहिताची प्रार्थना ऐकून आचार्यांनीं त्या पुरोहितास सांगितलें कीं, " केवळ तुझ्याकरितां म्हणून मी याला सहा महिन्यांचें आयुष्य देतों. "

याप्रमाणें सांगून आचार्यांनीं लगोलग आपल्या शिष्यगणांसह तेथून प्रयाण केलें. पुढें तो शूद्र जहागिरदार सहा महिन्यांतच नष्ट पावला. याबद्दल भावप्रकाशिकाकारांनीं खालीलप्रमाणें श्लोक दिले आहेत.

**देवैः समं रहसि देवगृहे प्रवृत्तो**
**राज्ञा कवाटविवृतो प्रसभोदितोसौ ॥**

ऊचेऽधुना व्रजसि चेदिह नश्यसीति
राजाथ विस्मितमना व्यवृणोत्कवाटम् ॥
रक्तेक्षणं पुरुषसिंहमवेक्षमाणः ।
सद्यो भयान्निजपुरोहितमाह्वयत् सः ॥
क्षंतव्यमित्यसकृदानमति द्विजोऽसौ ।
षण्मासमायुरददान्नृपतेर्दयालुः ॥
राज्ञाऽर्थितोऽत्र वसतावखिलांश्च शिष्यान् ।
प्रस्थाप्य वायुवदभूरखिलरदृश्यः ।
षष्टेऽथ मासि परचक्रपराक्रमेण ।
राजा सराज्यनगरो विवशो ननाश ॥

याप्रमाणें त्या शूद्रवृत्तीच्या जहागिरदाराला आपल्या तेजानें निस्तेज करून आचार्य जयसिंह राजाकडे निघाले वाटेंत त्यांनीं मदनाधिप देवालयांत वास्तव्य केलें. हें देवालय जयसिंह राजाच्या ताब्यांत होतें. कबेनाड नांवाच्या खेड्यांत हें देवालय आहे. हें खेडें मदुरेपासून ५ मैलांवर आहे. या खेड्यांहून पुढें विष्णुमंगल गांवाकडे जाण्याचा रस्ता आहे.

आचार्यांच्या स्वागतार्थ या ठिकाणीं हजारो लोक आले होते. जवळ जवळ या ठिकाणाहून एक मोठी मिरवणूकच निघाली होती असें म्हणावयास हरकत नाहीं. सुरुवातीस सर्वांनीं देवालयांत जाऊन श्रीहरीचें दर्शन घेतल्यानंतर आचार्य तेथून निघाले. त्याबरोबर आचार्य निघाले हें सर्वांना कळावें एवढ्यासाठीं त्या देवालयांतील प्रचंड घंटानिनाद होऊं लागला. आचार्यांचे समवेत एका बाजूला देवाच्या पेट्या खांद्यावर घेतलेले संन्यासी चालत होते तर दुसऱ्या बाजूनें आचार्यांचा ग्रंथसंभार घेऊन कांहीं संन्यासी चालत होते. मुखानें गोविंदनामसंकीर्तन चाललें होतें.

आचार्य हे अत्यंत गौरवर्णाचे असून डोळे मोठे व तेजःपुंज असे होते. प्रत्येक अवयव भरीव असा होता. कंठांत तुळसी माला धारण केलेली असून कानांत तुलसी दलें होतीं. एक कौशेय वस्त्र कौपीन म्हणून धारण

केलें होतें. आचार्यांच्या गौरवर्णाला तें वस्त्रहि शोभून दिसत होतें., त्याचें मुख निष्कलंक चंद्राप्रमाणें भासत होतें. महापुरुषाचीं जीं बत्तीस लक्षणें, त्या सर्व लक्षणांनीं युक्त अशी आचार्यांची देहयष्टि होती. त्यांची नजर भेदक पण वात्सल्ययुक्त अशी होती. त्या हजारों लोकांच्या मध्यभागीं आचार्य होते तरी तात्काल हे महापुरुष असावेत असें कोणासहि सहज समजून आलें असतें. श्रीहरीच्या नामसंकीर्तनानें व जयजयकारानें सर्व आकाश भरून गेलें होतें. प्रत्येकाच्या तोंडावर हास्य विलसत होतें जणू जिकडे तिकडे आनंदाचें साम्राज्य पसरल्यासारखें वाटत होतें. ठिकठिकाणीं सुवासिनी स्त्रिया आपल्या मधुर ध्वनीनें आचार्यांचे गुणगान करीत मंगल आरत्या करीत होत्या.

आचार्य यावयाचे अगोदरच जयसिंह राजा आपल्या वाहनांतून उतरून आचार्यांचे स्वागतार्थ, आपले मंत्री व आपल्या पदरीं असलेल्या विद्वानांसह, गांवच्या सीमेवर उभा होता.

आचार्य येत असल्याची वर्दी अगोदर, आचार्यांसमवेत असलेल्या जनसंमर्दाकडून चाललेल्या श्रीहरिनामसंकीर्तनानें व जयघोषानें दिली. त्यानंतर जयसिंह राजाच्या दूतानें आचार्य समीप आल्याची वर्दी दिली. आचार्य व त्यांचा परिवार थोड्याच कालावधींत जयसिंह राजाच्या राजधानीच्या सीमेवर येऊन पोहोंचला. त्याठिकाणीं एक मोठा मंडप उभा केला होता. त्याठिकाणीं आचार्यांना बसवून त्यांची पाद्यपूजा करावी एवढ्यासाठीं उच्च व्यासपीठ तयार करविलें होतें. श्रीमदाचार्य त्याठिकाणीं येण्याबरोबर जयसिंह राजानें व त्याच्या परिवारांतील इतरांनीं त्यांना साष्टांग प्रणाम केला. व नंतर त्या खास उभा केलेल्या मंडपांतील व्यासपीठावर आणून बसविले.

त्या ठिकाणीं आचार्य आसनस्थ झाल्यावर त्यांच्या परिवारांतील कांहीं संन्यासी आचार्यांकरितां तयार ठेवलेल्या निवासस्थानीं निघून गेले.

कांहीं कालानंतर जयसिंह राजा सपत्नीक सहपरिवार त्या ठिकाणीं आला. व त्यानें यथाविधी आचार्यांची पाद्यपूजा केली. व ह्या राजानें आपले सर्वस्व श्रीमदाचार्यचरणीं समर्पण केलें. पण आचार्यांना त्या

राज्याचा अगर राजवैभवाचा काय उपयोग होता ? आपला प्रसाद म्हणून ते सर्व राजवैभव त्यांनीं जयसिंह राजास परत दिलें. पाद्यपूजा समाप्त झाली; नंतर आचार्य राजासह आपल्या निवासस्थानीं येण्यास निघाले. यावेळीं सकल वाद्यें, सर्व राजवैभव या मिरवणुकींत होतें. ठिकठिकाणीं आचार्याचे दर्शनार्थ गर्दी होत असे. अशा तऱ्हेनें सर्वांना दर्शन देत आचार्यांची स्वारी मुक्कामास येऊन पोहोंचली.

यावेळीं जयसिंह राजाची ती राजधानी गजबजून गेली होती. आजू-बाजूच्या पंचवीस गांवची मंडळी तरी आली असावीत असें त्यांचे चरित्र-कार म्हणतात. तसेंच अनेक पंडितहि त्यावेळीं आले होतें. आचार्य आल्या दिवसापासून रोजच्या रोज द्वैततत्त्वावर प्रवचन चालत असे. त्या प्रवच-नास नेहमींप्रमाणेंच जनसंमर्द लोटत असे. त्या वेळेसच त्रिविक्रम पंडित नांवाचे एक पंडित आचार्यांबरोबर वादविवाद करण्यास आले.



## प्रकरण १२ वें

# त्रिविक्रमपंडिताचार्य व इतर शिष्य

श्रीमदाचार्यांच्या अनेक शिष्याप्रमाणें त्रिविक्रमपंडितहि अत्यंत विद्वान् होते. हे त्रिविक्रम पंडित "कावुमठ" येथील रहाणारे होत. यांचा जन्म केव्हां झाला वगैरेबद्दल कांहीं माहिती नाहीं.

यांच्या वडिलांचे नांव सुब्रह्मण्यभट्ट असें होतें. [ ' सुब्रह्मण्याख्य सूरेः सुत ' इति वायुस्तुती] हे सुब्रह्मण्यपंडित मोठे विद्वान् व यांची परंपराहि मोठी होती. यांच्या वंशापैकीं एकजण शंकराचार्यांच्या पीठावर आरूढ झाले होते. सुब्रह्मण्यपंडित हे सदाचार संपन्न होते. त्यांचीं पहिलीं मुलें अकालीं मृत झाल्यानें त्यांना एक प्रकारची विरक्तता संसारांत आली होती. उभयतां पतिपत्नींनीं एकनिष्ठपणें श्रीहरीची उपासना केलेली असल्यामुळें त्या उपासनेचें फळ म्हणा, त्यानां एक पुत्र कांहीं कालानंतर उतारवयांत झाला, तोच हा त्रिविक्रमपंडित होय. या मुलानें पुढें आपलें नांव अन्वर्थक केलें. कारण यांच्या चिरंजीवांनीं म्हणजे नारायणपंडितांनीं आपल्या भावप्रकाशिका टीकेंत " वेदे, कवितायां, वेदान्ते इति त्रिषु विक्रमः अस्य इति" अशी टीका त्रिविक्रम शब्दाबद्दल केली आहे. यांचे नंतर सुब्रह्मण्यभट्टास दोन मुलें झालीं.

त्रिविक्रमभट्टाचें सर्व अध्ययन आपल्या पित्याजवळ झालें. काव्यालंकार शास्त्राचें अध्ययन पूर्ण झाल्यानंतर अद्वैतवेदान्तपठणास प्रारंभ केला. याच वेळेस उषाहरण नांवाचें काव्य लिहिलें. सदर काव्याची लोकप्रियता कालिदासाच्या शाकुंतलासारखी आहे असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. अद्वैतवेदान्ताचें अध्ययन सुरू झाल्यानंतर त्यांतील तत्वें त्यांच्या विचक्षण बुद्धीला पटेनात. पण मनुष्याची कितीहि प्रखर बुद्धि असली तरी एकदम पूर्वपरंपरा मोडवत नाहीं. त्याप्रमाणें प्राक्कालीन संस्कारामुळें त्यांनीं त्याचें अध्ययन चालू ठेवलें. ते पुढें अतिशय प्रवीण

झाले. त्यांच्यापुढें वादविवाद् करावयास कोणी टिकत नसत. पण त्यांच्या या विद्वत्तेनें त्यांचें अंतःकरणास समाधान प्राप्त होईना. आपल्यांत कांहीं-तरी न्यून आहे या भावनेनें ते त्रस्त होत असत. एकदां त्यांनीं आपल्या वडिलांनाच मोठ्या नम्रपणानें विचारलें,

" तात, आपणांजवळ अध्ययन केलेल्या अद्वैत वेदांतांतील प्रमेयानें माझ्या मनाचें समाधान होत नाहीं. तरी मी काय करूं " त्रिविक्रम पंडिताचें भाषण ऐकून त्यावेळीं सुब्रह्मण्य पंडितांनीं दीर्घकाल विचार करून एकान्तात सांगितलें कीं,

" **स्मर देवं सुत वासुदेवमेव** " श्रीवसुदेवपुत्र श्रीकृष्ण याचीच उपासना कर असें सांगितलें. तरीहि या त्यांच्या कळकळीच्या सांगण्याचा परिणाम कांहीं झाला नाहीं. आजूबाजूचा सर्व परिवार, त्यांचे गुरु, त्यांची मित्रमंडळी, अनेक पंडित सतत मायावादच खरा आहे असें सांगत असतां एकट्या वडिलांचें म्हणणें कसें पटावें ? अशा स्थितींत मध्वाचार्यांची कीर्ति त्यांचे कानावर गेली. त्यांच्या मित्रमंडळींनीं मध्वा-चार्यांबरोबर वादविवाद करण्यास उत्तेजित केले. तेव्हां त्रिविक्रम पंडिता-चार्यांनीं आचार्यांचे बरोबर वादविवाद करण्याचें ठरविलें व त्याप्र-माणें जयसिंह राजाच्या राजधानींत श्रीमदाचार्य येणार आहेत हें जाणून आपल्या मित्रमंडळीसह जयसिंह राजाच्या राजधानीकडे ते येण्यास निघाले. वाटेंत यांच्यापैकींच एका आप्ताच्या घरीं यांचा मुक्काम पडला. हा आप्तहि लिकुच घराण्यापैकीं होता. श्रीमदाचार्यांचेवर हा अद्वैती असूनहि याची फार भक्ति होती. याचें नांव शंकरभट्ट असें होतें. पद्मतीर्थांनीं यांच्यांच घरीं मध्वाचार्यांचा चोरून नेलेला ग्रंथसंग्रह आचार्यांना परत देण्या-करितां आणून ठेवला होता. त्या रात्रीं त्रिविक्रमाचार्यांचा मुक्काम यांचे घरीं असतांना रात्रौ एकान्तांत बसून त्रिविक्रम पंडितांनीं त्यांतील खास आचार्यांचे ग्रंथ वाचले. त्याबरोबर त्यांतील तर्कशुद्ध विचारसरणीमुळें त्यांच्या बुद्धीला गदागदा हालविल्यासारखे झाले. असें अलौकिक तत्त्व-ज्ञान जगापुढें ठेवणारा महापुरुष असला पाहिजे या विचारानें त्रिविक्रम पंडितांनीं शक्य तितक्या लौकर त्यांची भेट घेण्याचें ठरविलें. पुढें ठर-ल्याप्रमाणें त्रिविक्रम पंडित आपल्या पंडित मित्रांसह जयसिंह राजाच्या

नगरीकडे आले व योग्य कालीं त्यांचा मध्वाचार्यांबरोबर वादविवाद सुरू झाला

तदा त्रिविक्रमाचार्यः सर्वदर्शनपारगः ।
दैवतांशोपि तन्मायाव्यामोहितमना मनाक् ॥ ६ ॥
शंकरादेव दुःशास्त्रेष्यद्वैते धीमतां गतः ।
संदिहानोपि मनसा स्वप्रौढ्या सर्ववादिनः ॥ ७ ॥
विजिग्ये भूमिवलये समर्थ्याद्वैतदर्शनं ।
तस्मिन्नवसरे साक्षात् मुख्यप्राणो भुवस्तले ॥ ८ ॥
अवतीर्याज्ञया विष्णोश्चक्रे तन्मतखण्डनं ।
तदैवाद्वैतिनः सर्वे शंकराद्याः अमुं प्रति ॥ ९ ॥
त्रिविक्रमथप्राज्ञं विवादाय पुरो दधुः ।
परपक्षरथारुढं खरतर्कमहायुधं ॥ १० ॥
मध्वस्त्रिविक्रमाचार्यं प्रतिवीरमवैक्षत ।
तदा प्रसंगः सुमहान् आसीन्माध्वत्रिविक्रमः ॥ ११ ॥
सर्वाश्चर्यकरं पूर्णं रामरावणयोरिव ।
एवमष्टादशदिनं सत्रिविक्रमसूरिणा ॥ १२ ॥
कृत्वा महाकथां मध्वस्तान्निजग्राह पूर्णधीः ।
मध्वेन निगृहीतःस सम्यक् विज्ञाय तन्मतं ॥ १३ ॥
अद्वैतिनां मतं सर्वमप्रमाणममन्यत ।
ततः संपूर्णबोधस्य शिष्यतां प्राप्य तत्कृते ॥ १४ ॥
श्रीमद्भाष्ये विवरणं तत्वदीपमचीक्लृपत् ।
अद्वैतादीनि सर्वाणि दुर्मतानि निरस्यत ॥ १५ ॥

( वरील श्लोक नरसिंहस्तुतिवरील टीकाकारांनीं तदुक्तं म्हणून उद्धृत केले आहेत. सदर टीकेचें हस्तलिखित आमचेजवळ आहे. ही टीका अद्यापपर्यंत छापलेली नाहीं. )

त्याप्रमाणें मध्वाचार्यांशीं त्रिविक्रम पंडिताचा अठरा दिवस वादविवाद झाला असें उपरोक्त उल्लेखावरून वाटतें. पण मध्वविजयकारांनीं त्रिविक्रम पंडिताचार्यांचा मध्वाचार्यांबरोबर पंधरा दिवस वादविवाद झाला असें म्हटलें आहे.

सप्ताष्टानि दिनान्येवं वादं कृत्वा सहामुना
निरुत्तरं तं निश्चोद्यं चक्रे चक्रायुधप्रियः ॥

श्लोक ६९ सर्ग १५ मध्वविजय.

याच वेळीं पद्मतीर्थांच्या सांगण्यावरून जयसिंह राजानें मध्वाचार्यांचा ग्रंथसमूह श्रीमन्मध्वाचार्यांस परत समर्पण केला. त्या सभेमध्यें आलेल्या सर्व पंडितांचाहि जयसिंह राजानें मोठा सन्मान केला. त्रिविक्रम पंडिताचा वादांत पराजय झाल्यावर त्यांनीं आचार्यांचें शिष्यत्व पत्करलें. त्यांनीं आचार्यांचे जवळच वास्तव्य करून व त्यांचे ग्रंथ त्यांचे मुखांतून श्रवण करून यथार्थ ज्ञान मिळविलें. व आचार्यांचे आज्ञेवरून 'तत्व प्रदीप' नांवाचा श्रीमदाचार्यांचें भाष्यावर एक टीका ग्रंथ रचला. तो ग्रंथ पाहून आचार्यांना संतोष झाला. अशा रीतीनें आचार्यांनीं आपला अवतार घेऊन द्वैतसिद्धान्ताचा प्रसार केला. त्यांनीं एकूण सदतीस ग्रंथ केले आहेत.

१ गीताभाष्य, २ गीतातात्पर्य, ३ सूत्रभाष्य, ४ अणुभाष्य, ५ महाभारत तात्पर्य निर्णय, ६ भागवत तात्पर्य, ७ नखस्तुति, ८ यमकभारत, ९ द्वादशस्तोत्र, १० तंत्रसार, ११ सदाचारस्मृति, १२ यतिप्रणवकल्प, १३ जयंतीनिर्णय, १४ ऋग्भाष्य, १५ प्रमाणलक्षण, १६ कथालक्षण, १७ तत्वसंख्यान, १८ तत्वविवेक, १९ मायावादखंडन, २० उपाधिखंडन, २१प्रपंचमिथ्यात्वानुमानखंडन, २२ तत्वोद्योत, २३ विष्णुतत्वनिर्णय, २४–३३ [१०] उपनिषद्भाष्यें, ३४ अनुव्याख्यान, ३५ संन्यायविवरण, ३६ कृष्णामृतमहार्णव, ३७ कर्मनिर्णय.

श्रीमदाचार्यांनीं आपल्या द्वैतसिद्धान्ताच्या प्रचारार्थ अनेक व्यक्ती तयार केल्या होत्या. सर्वसंग परित्याग करून संन्यास ग्रहण करावा व आचार्यांच्या आज्ञेप्रमाणें कार्य करीत रहावे. आचार्यांचे महत्व ओळखून

आचार्यांचे बंधूनाहि असें वाटूं लागलें कीं, आचार्यांचे जवळून आपणहि संन्यास घ्यावा. अशी त्यांना उत्कट इच्छा झाली तेव्हां त्यांनीं आपणांस संन्यास द्यावा अशी विनंति केली. त्यावेळीं आचार्यांनीं त्याची परीक्षा पहावी म्हणून "आतां चातुर्मास आहे तरी चातुर्मास संपला कीं, तुला संन्यास देईन" असें सांगितल्यावर त्यांचे बंधु परत आपल्या गांवीं आले.

आचार्य चातुर्मास्य आटोपल्यावर उडुपी येथें जाण्याकरितां जयसिंह राजाचा निरोप घेऊन निघाले. आचार्यांचा वियोग होणार म्हणून जयसिंह राजाला अतिशय वाईट वाटलें. त्याचें समाधान करून वर्णाश्रमविहित गोब्राह्मणप्रतिपालन करण्याची अनुज्ञा दिली. आचार्य उडुपी येथें आल्याचें समजल्याबरोबर आचार्यांचे बंधु धांवतच उडुपी येथें आले व त्यांच्या वचनाचें स्मरण दिले. तेव्हां हा खरोखरीच वैराग्यसंपन्न झाला आहे हें जाणून त्याला त्यांनीं संन्यास दिला व त्याचें नांव विष्णुतीर्थ असें ठेवलें. हे विष्णुतीर्थ मोठे विरक्त संन्यासी होते. त्यांनीं अगम्य अशा गिरिदऱ्यांत राहून तपश्चर्या केली. यावेळीं यांचेजवळ अनेक संन्यासी होते.

| | | |
|---|---|---|
| १ | विष्णुतीर्थ | स्वादि मठ |
| २ | जनार्दनतीर्थ | कृष्णापुर मठ |
| ३ | वामनतीर्थ | काणूर मठ |
| ४ | नरसिंहतीर्थ | अधमारु मठ |
| ५ | उपेन्द्रतीर्थ | पुत्तिगे मठ |
| ६ | रामतीर्थ | शिरुर मठ |
| ७ | हृषिकेशतीर्थ | पालमारु मठ |
| ८ | अक्षोभ्यतीर्थ | पेजावर मठ |

हीं मठाचीं नांवें पुढें आलीं असावींत. आचार्यांनीं या आठ जणांना उडुपी येथील श्रीकृष्णपूजेसाठीं नियुक्त केले. प्रत्येकांनीं दोन महिने पूजा करावी व पुन्हां आपली पाळी येईपर्यंत देशसंचार करून द्वैतसिद्धान्त-प्रचार करावा ही व्यवस्था जवळ जवळ वादिराजस्वामीपर्यंत चालू होती. पुढें मग वादिराजतीर्थांनीं हा दोन महिन्याचा अवधि काढून टाकून प्रत्येक मठानें दोन वर्षें पूजा करावी अशी योजना सर्वानुमतें केली.

नरहरीतीर्थांनीं ओरिसा प्रान्ताच्या राजधानीमध्यें जाऊन १५ वर्षें रीजंटपद स्वीकारले होते. नरहरीतीर्थ हे मूळचे ओरिसा प्रान्तांतील रहिवासी असावेत.

ओरिसा प्रान्तावर राज्य करणाऱ्या गंग घराण्यांतील गजपति भानुदेव इ. स. १२७९ मध्यें वारला. त्यावेळीं त्याचा मुलगा नरसिंह ( दुसरा ) हा गादीवर बसला. हा अल्पवयी असल्यामुळें सर्वांच्या संमतीनें व श्रीमदाचार्यांच्या अनुज्ञेवरून नरहरीतीर्थांनीं राज्यकारभाराची धुरा स्वीकारली. त्यांनीं राज्यकारभार उत्तम रीतीनें चालविल्याचे दाखले अनेक रीतीनें आज ओरिसा प्रान्ताच्या इतिहासांत सांपडतात. राजकीय बाबतींत संन्याशांनीं प्रवेश करून वळण लावल्याचें हें पहिलेंच उदाहरण आहे. यानंतर संन्याशांनीं राजकारणांत प्रवेश केल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. नरहरीतीर्थांच्या स्तोत्रांत त्यांनीं बारा वर्षें राज्यकारभार केला असें म्हटलें आहे. पण वस्तुस्थितीवरून त्यांनीं पंधरा वर्षें राज्यकारभार केला असें दिसतें.

गंग घराण्यांतील गजपति भानुदेव हा १२७९ मध्यें वारला. नरहरीतीर्थांचा पहिला शिलालेख २१ मार्च १२८१ चा आहे ( पहा एपिग्राफिका इंडिका भाग ६, पृ. २६६–६८ ) यावरून नरहरीतीर्थांनीं इ. स. १२८० मध्यें रीजंटपद स्वीकारलें असें अनुमान निघतें. नरहरीतीर्थांचा शेवटचा शिलालेख इ. स. १२९४ चा आहे. या सर्वांवरून ओरिसा प्रान्तांतील रीजंटपद नरहरीतीर्थांनी पंधरा वर्षें स्वीकारलें होतें असें अनुमान इतिहासकारांनीं काढलें आहे.(पहाः–हिस्टरी ऑफ दि ओरिसा, पृष्ठ २७० ) याप्रमाणें १५ वर्षें राज्यकारभार केल्यानंतर तो राजा वयांत आला. त्यानें राज्यकारभाराची धुरा स्वीकारली. आपल्या अज्ञानावस्थेंत राज्यकारभार उत्तम रीतीनें चालविला हें पाहून त्या राजानें नरहरीतीर्थांची प्रार्थना केली कीं;

" महाराज हें सर्व राज्य आपलें आहे. यांतील ज्या वस्तू आपणांस पाहिजे असतील त्या घ्याव्यात "

**यदा राजपुत्रो युवाभूत्तदानीं तदीयं समस्तं समर्प्यास्य कोशम् ।**
**स्थितं रामदेवं ससीतं ममेह प्रदेहीति चोक्त्वा गृहीत्वाऽगमद्राक् ॥**

( नरहरीयति स्तोत्र )

याप्रमाणें राजाची विनंति ऐकून नरहरीतीर्थांनीं श्रीमूलराम सीतादेवीच्या प्रतिमा ज्या कोशगारांत होत्या त्या घेऊन श्रीमध्वाचार्यास त्यांनीं आणून दिल्या. श्रीमध्वाचार्य त्या प्रतिमांची वाटच पहात होते. ( या सर्व हकीकती वासिष्ठ रामायणांतहि दिल्या आहेत. ) त्या प्रतिमा आणून दिल्यावर आचार्यांना अत्यंत आनंद झाला. त्यांनीं त्या प्रतिमांचें पूजन ८० दिवस केलें.

याशिवाय श्रीमध्वाचार्यांच्या शिष्यपरिवारांत त्रिविक्रम पंडितासारखे गृहस्थाश्रमी शिष्य होते तसेंच अनेक संन्यासी शिष्यहि होते. त्यापैकीं आठ संन्याशांची योजना त्यांनीं श्रीकृष्णपूजनाकरितां केली. हे सर्व ब्रह्मचारी होते. म्हणजे ब्रह्मचर्याश्रम संपल्याबरोबर तात्काल संन्यासाश्रम स्वीकारला होता. आचार्यांनीं या संन्याशांची नाना तऱ्हेनें परीक्षा घेऊन नंतरच त्यांना संन्यास दिला होता. आजच्या परिस्थितींतहि उडुपी येथील अष्टमठांचे स्वामींना उपनयन झाल्याबरोबर लगेच संन्यास दिला जातो. आचार्यांच्या संन्यस्त शिष्यपरिवारांत गृहस्थाश्रमानंतर संन्यासाश्रम स्वीकारलेले कांहीं संन्यासी होते. त्यांत "पद्मनाभतीर्थ, नरहरीतीर्थ, माधवतीर्थ, अक्षोभ्यतीर्थ" असे चार प्रमुख शिष्य होते. यांपैकीं पद्मनाभतीर्थ श्रीपादांचें नांव 'आनंदभट्ट' असें असून ते गोदावरीतीराचे रहाणारे होत. यांना कित्येकजण "पुणतांबे" येथील राहणारे असें म्हणतात. आचार्यांच्या सर्व ग्रंथावर यांच्या टिप्पणी आहेत. पद्मनाभतीर्थांनीं एक मठ स्थापिला असून त्या मठास सध्यां "श्रीपादरायमठ" असें म्हणतात. श्रीमध्वाचार्यांनींच यांना आपल्या नंतरचें पीठाधिपत्य दिलें होतें. हे श्रीमदाचार्यांनंतर अजमासें सात वर्षे पीठावर होते. यांनीं वृन्दावनस्थ होतांना श्रीमदाचार्यांच्या आज्ञेप्रमाणें नरहरीतीर्थांच्या स्वाधीन पीठ केलें.

नरहरीतीर्थांनीं भाष्यावर व प्रकरण ग्रंथावर टीका लिहिल्या असून त्यांपैकीं कांहीं उपलब्ध आहेत. श्रीमदाचार्यांनंतर सात वर्षांनीं हे पीठावर आले. हे नऊ वर्षे पीठावर होते. यांचेनंतर माधवतीर्थ हे पीठावर आले. माधवतीर्थांचें नांव "गोविंदशास्त्री" असें होतें. हे कोठले राहणारे वगैरे संबधीं कांहीं माहिती मिळत नाहीं. यांनीं एक स्वतंत्र मठ स्थापिला असून

त्या मठाचें नांव "मजगीहळ्ळि" असें आहे. हे एकूण सोळा वर्षे पीठावर होते. यांचेनंतर अक्षोभ्यतीर्थ श्रीपाद पीठावर आले. यांच्या टीका, टिप्पणी कांहीं दिसत नाहींत. यांचा व विद्यारण्यस्वामींचा वाद-विवाद झाल्याची हकीकत 'वेदांतदेशिकवैभव' या ग्रंथांत आली आहे. सदर वादाचे वेळीं वेदांतदेशिकाचार्य हे मध्यस्थ होते. त्या वादांत विद्यारण्यांचा पराभव झाला असें त्यांत म्हटलें आहे.

असिना तत्वमसिना परजीवप्रभेदिना ।
विद्यारण्यं महारण्यमक्षोभ्यमुनिरच्छिनत् ॥

असा श्लोक आहे. यांनीं एक मठ स्थापला असून त्याचें नांव "कुडलगी" असें आहे. हे एकूण पंधरा वर्षे पीठावर होते. यांचेनंतर आचार्यांच्या ग्रंथावर टीका टिप्पणी लिहिणारे जयतीर्थ उर्फ टीकाचार्य हे पीठावर आले.

याप्रमाणें आचार्यांचा शिष्यपरिवार मोठा होता. आचार्यांच्या कसोटीस उतरल्यावांचून त्याच्या समवेत कोणासहि राहण्यास मिळत नसे.

आतांपर्यंत आचार्यांचें कार्य बहुतेक पूर्ण होत आलें होतें. द्वैतसिद्धान्ताचा प्रसार पूर्णपणें झाला होता. आतां आपण इहलोकांतील कार्य संपवून वेद-व्यासांच्या संनिध जाऊन राहावें असा विचार करून बदरिकाश्रमाच्या तिसऱ्या यात्रेस जाण्याचा विचार त्यांनीं ठरविला. व मागची सर्व निरवानिरव केली, आपण या भूतलाचा त्याग केल्यानंतर आपल्यामागून कोणी पीठावर यावें याचाहि तपशील आपल्या शिष्यांना सांगून ठेवला. त्यांनीं स्वतः पद्मनाभतीर्थांना पीठाधिपत्य दिलें व त्यांच्या अनुज्ञेत सर्वांनीं राहावे असें सांगितलें, श्रीकृष्णपूजनाची व्यवस्था केली. त्यानंतर आचार्यांनीं या वेळेस अगदीं मोजका परिवार आपल्याबरोबर घेतला. त्रिविक्रम पंडितांनीं बरोबर चलण्याचा फारच हट्ट धरल्यामुळें त्यांनाहि बरोबर घेतलें व सर्वांचा निरोप घेऊन आचार्य बदरिकाश्रमीं येण्यास निघाले.



# प्रकरण १३ व

# आचार्यांचीं कांहीं अद्भुत कृत्यें

आचार्यांचा चरित्रभाग बहुतेक संपत आला आहे. आतां फक्त त्यांनीं कांहीं अद्भुत कृत्यें केलीं त्याचें वर्णन देऊन आचार्यांच्या चरित्राचा भाग पुरा करणार आहे.

आचार्यांनीं आपल्या आयुष्यांत अखिल हिंदुस्थानांत दोनदां संचार केला व दोनदां बदरिकाश्रमाची यात्राहि पण केली. याशिवाय त्यांचा संचार नेहमीं सध्यांच्या कॅनरा जिल्हा व म्हैसूर प्रान्त यामध्यें होत असे. या प्रांतांतील लोकांना आचार्यांचें नांव अतिपरिचित झालें होतें त्यामुळें श्रीमध्वाचार्यांना या भागाची सूक्ष्म माहिती असल्यास नवल नाहीं. बदरिकाश्रमाच्या तिसऱ्या यात्रेस निघावयाचे अगोदर म्हैसूर, नेरेंकी, ब्याडिनाथ, वज्र, खडताल ते कण्व इत्यादि स्थानांवरून त्यांनीं प्रवास केला होता व प्रत्येक महत्वाच्या ठिकाणीं आपला मुक्काम ठेवला होता.

एकदां गोमती नदीच्या तीरावर आचार्य आले असतां एक शूद्र राजा श्रीमध्वाचार्य यांचेकडे येऊन वेदनिंदा करूं लागला. वेदांत जे कांहीं सांगितलें आहे त्यांत कांहींच तथ्य नसतें, असें म्हणूं लागला.

उदाहरण म्हणून त्यानें सांगितलें कीं, 'या औषधीः इत्यादि मंत्र म्हटले असतां हातांतल्या वनस्पतीस पुष्प, अंकुर येत नाहींत. असा अनुभव असल्यामुळें त्या वेदवाक्यांस कांहींच महत्व नाहीं. वेदांविषयीं सर्वत्र अशीच परिस्थिति आहे. म्हणून वेदांवर कां विश्वास ठेवावा?"

अशा तऱ्हेनें आचार्यांसमोर येऊन अधिक्षेपपूर्वक उन्मत्तपणानें तो भाषण करूं लागला. त्या वेळीं आचार्यांनीं शांतपणें त्यांस उत्तर दिलें कीं,—

"राजन्, वेदांतील सूक्ताप्रमाणें सर्व गोष्टी म्हणण्यास वेद म्हणणाऱ्याचा अधिकार लागतो. बिनअधिकारी लोकांनीं म्हटल्यास त्याचें फल त्यांस

मिळणार नाहीं. हा दोष त्या वेदांचा नव्हे. विशुद्ध बीजापासून सत्कुलांत त्याची प्रसूति पाहिजे. ज्ञान, वैराग्य, सदाचार यानें तो अधिकार प्राप्त करून घेतला पाहिजे. म्हणजे वेदांत सांगितलेल्या गोष्टी खऱ्या होतात."

त्यावर तो राजा म्हणाला,—

"स्वामी महाराज, मग असा अधिकारी सांपडणें शक्य नाहीं. खरविषाण ( गाढवाचें शिंग ) जसें कधींहि नसतें, तसा आपण म्हणतां त्याप्रमाणें अधिकारीहि पण सांपडणें शक्य नाहीं. इतकेंच नव्हे तर अशा तऱ्हेचा अधिकार तुमचा तरी आहे काय?"

असें म्हटल्याबरोबर आचार्यांस त्या राजानें केलेली वेदनिंदा सहन झाली नाहीं. त्यांनीं लगेच राजाकडून कांहीं बीज आणविलें. त्यांनीं तें बीज आपल्या हातांत ठेवून "या औषधी," या सूक्ताचा जप करण्यास प्रारंभ केला. त्याबरोबर काय चमत्कार! आचार्य जसजसें त्या सूक्ताचा जप करूं लागले तसतसें त्या बीजाला अंकुर फुटून त्याला पानें, फुलें, फळें आलीं. त्याबरोबर सर्वांना अत्यंत आश्चर्य वाटलें. तो राजा अतिशय खजील झाला.

## आचार्यांचें योगसामर्थ्य

याच बाजूस आचार्य संचारांत असतांना कोडंजाडी नांवाच्या एका शक्तिशाली माणसानें व त्याच्या भावानें आचार्यांच्या शक्तीची परीक्षा पाहाण्याचें ठरविलें. यांची शक्ती इतकी प्रचंड होती कीं, श्रीकांत देवालयाचा ३० माणसांना उचलतां न येणारा ध्वज हे एकटे उचलून हिंडत असत. पण त्यांना आचार्यांचा नुसता अंगठाहि हलवितां आला नाहीं.

असें शक्तिसंपन्न आचार्य एका बालब्रह्मचाऱ्याच्या खांद्यावर बसून श्रीनृसिंहाची प्रदक्षिणा करून आले.

दुसऱ्या एका प्रसंगीं पूर्ववाट नांवाच्या एका बलाढ्य मनुष्यास आपला गळा दाबण्यास आचार्यांनीं सांगितलें. त्याप्रमाणें त्या मनुष्यानें आचार्यांचा गळा दाबला असतां तशा स्थितींत सुस्वर कंठानें आचार्यांनीं गायन केलें.

एकदां श्रीमध्वाचार्य त्रिवेन्द्रम्‌कडे जात असतां वाटेंत भद्रा नदी लागली. त्या ठिकाणीं नदीच्या मध्यभागीं एक भली मोठी शिला पूर्वी हजारों माणसांनीं मिळून आणून ठेवली होती. तिचा उपयोग सर्व जनता ती नदी ओलांडण्याकरितां पुलासारखा करीत असे. त्या ठिकाणीं नदीचें पाणी फार खोल होतें व तो प्रचंड दगड फार धोक्याचा झाला होता. त्यामुळें तो दगड व्यवस्थितपणें ठेवणें जरूर होतें. पण ती गोष्ट कोणासहि शक्य नव्हती. आचार्यांना या शिलेसंबंधीं सर्व हकीकत कळतांच तात्काल ती शिला आचार्यांनीं सहज एका हातानें व्यवस्थितपणें ठेवली. ती शिला त्या ठिकाणीं "मध्वरायन् पारि" या नांवानें ओळखली जाते व त्यावर "श्रीमदाचार्यैरेकहस्तेनानीय स्थापिता शिला" असें शब्द त्यावेळीं कोरलेले आहेत. जिज्ञासूंनीं काडूर डिस्ट्रिक्ट मॅन्युअल नं. ८९ मुदगेरी पाहावें. हें स्थान म्हैसूरापासून बेळेहोन्नूर तालुक्यांत कलश नांवाच्या खेडेगांवाजवळ आहे व या स्थानास अंबुतीर्थ असें नांव आहे.

एकदां आचार्य संचारांत असतांना पारंतीश्वराचे देवालयाजवळ मुक्काम पडला. तेव्हां त्या देवालयांत पूजाअर्चा, नैवेद्य वगैरे कांहींहि होत नाहीं हें पाहून आचार्यांनीं त्या प्रान्ताधिपतीच्या मनांत प्रेरणा करून त्या ठिकाणची पूजाअर्चा चालू केली.

एकदां कांहीं स्वयंपंडितमन्य शिष्यांना आचार्य पाठ सांगत असतां आचार्यांच्या ग्रंथाविषयीं चर्चा सुरू झाली. त्यावेळीं ते शिष्य म्हणाले:—

"महाराज, आपले हे ग्रंथ इतके अवघड आहेत कीं, त्यावर सुलभ अशी टीका असल्यावांचून हे ग्रंथ पुढें लोकानां समजणार नाहींत. म्हणून याच्यावर टीका पाहिजे."

वास्तविक त्यावेळीं पद्मनाभतीर्थांची सत्तर्करत्नावलि, त्रिविक्रमपंडिताचा तत्वप्रदीप, नरहरीतीर्थांची टीका या प्रचलित होत्या. पण त्यांचा मोठेपणा मान्य करण्याची या शिष्यांची तयारी नव्हती; त्यांना असें वाटत होतें कीं, आचार्यांनीं लगेच उत्तर द्यावें कीं, "माझे ग्रंथ समजण्याकरितां तुम्ही सुलभ अशी टीका करा" असें आचार्यांनीं म्हणावें. पण आचार्यांनीं त्यांचा गर्व परिहार करण्याचा विचार करून सांगितलें कीं,

" तुम्ही त्याची काळजी करूं नका. कारण आपल्या पोथ्या वाहणारा जो बैल आहे, तो बैल माझ्या ग्रंथावर टीका करील."

आचार्यांचें हें भाषण ऐकून त्या शिष्यांना क्रोध येऊन त्यांनीं त्या बैलास "सर्पदंशानें मृत्यु पावशील" असा शाप दिला. (पहा:—जयतीर्थ-विजय) आचार्यांना अंतर्ज्ञानानें या सर्व गोष्टी कळल्या. पण ते स्तब्ध बसले. पद्मनाभतीर्थादिकांनीं या गोष्टीचा शिष्यांचा निषेध केला. तेव्हां त्या शिष्यांनाहि अतिशय पश्चात्ताप झाला. पुढें कांहीं कालानें तो बैल सर्पदंश होऊन मरण पावला. त्यावेळीं श्रीमध्वाचार्यांनीं द्वादशस्तोत्राचें पारायण करून त्या बैलास झालेला सर्पदंश उतरविला. पुढें हा बैलच मध्वाचार्यानंतर पन्नास वर्षांनीं अवतीर्ण झाला. त्यांचें नांव " जयतीर्थस्वामी उर्फ टीकाचार्य " असे आहे. श्रीमध्वाचार्यांचे ग्रंथावर त्यांचे अगोदर व नंतरहि टीका झाल्या आहेत. पण वैष्णव पंडितांत जयतीर्थ स्वामींनीं रचलेल्या टीकांना जितकी लोकप्रियता लाभली तितकी अन्य टीकाकारांस लाभली नाहीं. म्हणूनच त्यांचें नांव "टीकाचार्य" असें पडलें आहे. भक्तजन मूळनावापेक्षां या नांवानेंच जास्त ओळखतात. यांना शेषांश असें समजतात.

आचार्यांचें चरित्र यथार्थपणें वर्णन करणें हे देवादिकांनाहि शक्य नाहीं. आतांपर्यंत सांगितलेलें चरित्र हें अंशात्मकसुद्धां नाहीं. आचार्यांनीं अदृश्य होण्याचे अगोदर कांहीं दिवस कण्वतीर्थासंन्निध वास्तव्य केलें होतें. सूर्यग्रहणाचे वेळीं एकदां समुद्रतीरीं ऐतरेयोपनिषदाचें प्रवचन त्यांनीं केलें व अशा तऱ्हेनें आपलें सर्व आयुष्य द्वैतसिद्धान्त प्रस्थापित करण्यांत घालविलें. एकूण या भूतलावर ते ९५ वर्षें होते व सतत ८० वर्षें संन्यस्त स्थितींत राहून तत्वोपदेश केला; विष्णु सर्वोत्तमादि वेदव्यासाभिमत तत्वांचा प्रचार केला. ते वायुदेवाचे अवतार होते, ही गोष्ट तत्कालीन जनतेला पटलेली होती. त्यांच्या समकालीन असणाऱ्या त्रिविक्रमपंडितांनीं प्रत्यक्ष त्यांना हनुमान् स्वरूपांत अवलोकन केल्यानंतरच त्यांनीं वायुस्तुति रचली. त्यांनीं जें कार्य केलें त्यावरून पाहतां ते अवतारी होते हें अगदीं कट्टर नास्तिकांसहि नाकबूल करतां येणार नाहीं. आचार्यांना नरहरीतीर्थाकडून श्रीमूलरामसीतादेवीच्या प्रतिमा मिळाल्यानंतर त्यांचें त्यांनीं पूजन ८०

दिवस केलें व नंतर त्या प्रतिमा सांप्रदायाचे उत्तराधिकारी म्हणून पद्मनाभतीर्थांच्या स्वाधीन केल्या. आणि बरोबर माघ शुद्ध नवमी रोजीं अदृश्य होऊन बदरिकाश्रमीं वेदव्यासांच्या संनिध वास्तव्य केलें व अद्यापपर्यंत ते तेथेंच आहेत. या तऱ्हेनें आचार्यांचें चरित्र यथामति वाचकांस सादर केलें आहे. आचार्यांच्या चरित्राचीं साधनें फारच अल्प आहेत.

प्रपन्नतापप्रशमैकहेतुं
दुर्वादिवादिन्धनधूमकेतुं ॥
निरंतरं निर्जितमीनकेतुं
नमाम्यहं मध्वमुनिप्रकाण्डं ॥ १ ॥
श्रीमन्मारुतमाचार्यमायिमर्दनतत्परं ।
मुनीन्द्रोपास्यपादाब्जं ज्ञानसिंधुं नमाम्यहं ॥ २ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



# प्रकरण १४ वें

# माध्व मठ



श्रीमध्वाचार्यांनीं द्वैतसिद्धान्ताचा प्रसार करतांना अनेकांस त्यांची योग्यता पाहून संन्यासाश्रम स्वीकारावयास लावला होता. त्यांपैकीं ब्रम्ह-चर्याश्रमानंतर लगेच संन्यासाश्रम घेतलेले असे कांहीं संन्यासी होते. त्यांना श्रीकृष्ण पूजनासाठीं नियुक्त केले होते. याची माहिती मागें दिली आहे. श्रीकृष्ण पूजनाची व्यवस्था झाल्यावर द्वैतसिद्धान्तप्रसाराची योजना करणें जरूर होतें, त्याप्रमाणें श्रीमदाचार्यांनीं या भूतलावर असतानांच त्यासाठीं एका मठाची स्थापना करून त्या मठाचें आधिपत्य श्रीपद्मनाभ तीर्थांकडे दिलें. व श्रीपद्मनाभतीर्थांनीं वृन्दावनस्थ होतांना नरहरीतीर्थांस, श्रीनरहरी-तीर्थांनीं माधवतीर्थांस, माधवतीर्थांनीं अक्षोभ्यतीर्थांस पीठाधिपत्य द्यावें अशी योजना केली होती. त्या श्रीमदाचार्यांच्या योजनेप्रमाणें सर्व झालें. या पद्मनाभतीर्थांच्या मठांस 'उत्तरादिमठ' असें नांव आहे. या मठानें एकत्र कोठेंहि रहावयाचें नाहीं असा अलिखित नियम आहे. पुढें कालां-तरानें या मठांत राजेंद्रमठ व विबुधेन्द्रमठ असे निराळे विभाग झाले. आचार्यांच्या प्रमुख चार शिष्यांपैकीं फक्त नरहरितीर्थांनींच आपला स्वतंत्र मठ स्थापला नाहीं. बाकीच्या पद्मनाभतीर्थ, माधवतीर्थ, अक्षोभ्यतीर्थ या तिघांनीं स्वतंत्र मठ स्थापन केले याची माहिती दिलेली आहे.

याशिवाय श्रीमध्वाचार्यांच्या बंधूनीं संन्यासोत्तर विष्णुतीर्थ नांव ग्रहण केलें. यांच्यापासून स्वादिमठ व सुब्रम्हण्यमठ अशा दोन परंपरा निर्माण झाल्या आहेत. एकूण सध्यां अठरा मठ आहेत.

१ उत्तरादि, २ व्यासराय ३ कुंदापुर ४ राघवेंद्रमठ ५–१२ उडुपीमठ (८ एकूण) १३ सुब्रह्मण्य १४ भंडारगिरी १५ भीमनकट्टी १६ मजगी हळ्ळी १७ श्रीपादरायमठ, १८ कुडलगी असे अठरा मठ असून वैष्णव गौडसारस्वतांचे दोन मठ आहेत. पैकीं एक गोकर्णमठ व दुसरा काशी-

मठ होय. गोकर्णमठाचें सध्यांचें मुख्य स्थान गोव्यांत **पर्तगाळी** हें असून दुसऱ्या मठाचें स्थान मंगलोर जिल्ह्यांत '**मुलकी**' हें होय. सध्यां त्यांचा मुक्काम बहुतेक **मुंबई** येथें मलबारहिलवर बाणगंगेजवळ असतो. तेथें समुद्र किनाऱ्यालाच यांच्या मठाची सुंदर इमारत आहे. या मठाच्या पूर्वाधिपतीनीं उडुपी अष्टमठांपैकीं 'अधमार' मठाकडून संन्यास घेतला आहे असा इतिहासाचा दाखला आहे.

गोकर्ण मठाचा इतिहास स्वतंत्रतया दिला आहे.

या सर्व मठावर अनेक अपरोक्षज्ञानी महानुभाव होऊन गेले असून त्यांनीं द्वैतवेदांत ग्रंथसंपत्तिमध्यें अमोलिक भर घातली आहे. बंगाल-मधील चैतन्यांनीं श्रीमाध्वपीठाधिपतीकडून आश्रम घेतला होता. वल्लभ-संप्रदायावरहि माध्वमताची पुष्कळ छाप पडलेली आहे.

## गोकर्णमठ

श्रीमध्वाचार्यांनीं भरतखंडांत अनेक वेळां प्रवास केला होता. तेव्हां ते गोव्यांतहि आले होते, ही हकीकत चरित्रांत येऊन गेलेली आहेच. गोवा प्रान्तांतील लोकांना त्यांचेविषयीं अतिशय पूज्यभावना होती. त्या लोकांच्या आग्रहावरून आपल्या एका शिष्यांपैकीं हृषीकेशतीर्थ नामक यतीस तेथें ठेवलें. हे यती सध्यां 'पलमार' नांवाचा उडुपी येथें जो मठ आहे त्या मठाचे अधिपति होत. आचार्यांचे आज्ञेप्रमाणें हृषीकेशतीर्थांनीं गोव्यांत कांहीं दिवस वास्तव्य करून परत उडुपी येथें आगमन केलें. जातांना एका विद्वान् ब्राह्मणास आश्रम देऊन त्याचें नांव "समात्मेश्वरतीर्थ" असें ठेवलें. यांचेपासून अशी परंपरा पुढें चालू असतां समात्मेश्वरतीर्थांपासून नववें रामचंद्रतीर्थ नांवाचे यति तीर्थयात्रा करीत बदरिकाश्रमीं आले. यांनीं बदरिकाश्रमांत पुष्कळ दिवस वास्तव्य केलें होतें. त्यावेळीं तेथील हवेमुळें त्रासून बहुतेक मठस्थांनीं आपल्या गुरुंचा त्याग करून आपआपल्या गांवीं प्रयाण केलें. श्रीपादांचे वर आत्यंतिक निष्ठा असणारे शिष्यच त्यांच्या समवेत राहिले. पुढें रामचंद्रतीर्थांचा वृंदावनप्रवेशकाल जवळ आला असतां आपल्या मठाच्या प्रतिमा कोणाजवळ द्याव्यांत याविषयीं त्यांना चिंता उत्पन्न झाली. त्यावेळीं त्यांना रात्रौ दृष्टांत झाला. तो असाः

स्वप्ने तदा श्रीहरिणा प्रचोदितः
सारस्वताचार्यकुलोद्भवं बटुम् ॥
कृत्वा सशिष्यं विधिना सदंडं !
सपादुकं तत्वमुपादिशच्च ॥ २७॥

श्रीराघवं वीरमुपास्यदैवतं दत्वा तदानीं समयं निरीक्ष्य।
नारायणेत्याह्वयदेनमाह गच्छ स्वकीयं पुरमित्युदारः ॥ २८॥
नारायणस्तीर्थपदो महात्मा श्रीरामचंद्रार्चनतत्परोऽभूत् ।
गुरोरनुज्ञां परिगृह्य गौडसारस्वताचार्यगुरुः प्रतीतः ॥ २९॥

या उल्लेखावरून एका सारस्वत बटूस संन्यासदीक्षा दिली. या बटुचें नांव माधवभट्ट असें होतें. यांचें नांव नारायणतीर्थ असें ठेवून त्यांचें स्वाधीन मठांतील प्रतिमा व इतर सर्व वस्तू केल्या. नंतर हे नारायणतीर्थ गुर्वाज्ञेप्रमाणें परत आपल्या प्रान्तांत आले तेव्हापासून गौड सारस्वतांचे गुरु म्हणून प्रसिद्धीस आले. ही घटना शालिवाहन शक १३९८ चैत्र शु. तृतीया रोजीं घडली असें मठांतील कागदपत्रांवरून कळतें. तेव्हांपासून हा मठ गौडसारस्वतांचा मट म्हणून प्रसिद्ध आहे.

## बंगालमधील वैष्णव

बंगालमधील वैष्णव-सांप्रदायावर श्रीमध्वाचार्यांच्या तत्वज्ञानाची छाप पडली आहे. चैतन्य सांप्रदाय हा माध्वसांप्रदायच होय. देशकालभेदामुळें जरी आचारविचार यामध्यें पुष्कळसा फरक पडत असला तरी तो सांप्रदाय माध्वापैकींच होय. याविषयीं स्वामी विवेकानंदांचें मत विचारणीय आहे. (पृष्ठ४९-५० पहा) चैतन्यमठाचे मूळ प्रवर्तक यांना मध्वाचार्यांनीं साक्षात् आश्रम दिला नसला तरी तेव्हांपासून बंगालमध्यें श्रीमध्वाचार्यांचे तत्वज्ञानाचा तेथील लोकांनीं स्वीकार केला होता. पुढें मध्वाचार्यांनंतर राजेंद्रतीर्थ हे बंगालमध्यें गेले होते. राजेंद्रतीर्थ हे मध्वाचार्यांनंतरचे आठवे स्वामी होत. हे अजमासें आचार्यानंतर एकशें साठ वर्षांनीं पीठावर आले. हे अत्यंत विद्वान्, त्यागी होते. यांचेनंतर पांचवे स्वामी श्री व्यासतीर्थ हे बंगालमध्यें गेले होते. यांचेपासूनच चैतन्य सांप्रदायाच्या

मूळ स्वामींनीं संन्यास घेतला होता. यांचें नांव " लक्ष्मीकांत तीर्थ " असें होतें. श्रीलक्ष्मीकांततीर्थांनीं " माधवेंद्रपुरी " यांना संन्यास दिला. यांचेनंतर " नित्यानंदतीर्थ ". व यांचे शिष्य " अद्वैतानंद " होत. यांचेनंतर "ईश्वरपुरी" हे पीठावर आले. व याचे पासूनच महाप्रभु "श्रीकृष्णचैतन्य" यांनीं दीक्षा घेतली. (पहाः—"चैतन्य ॲन्ड हिज् लाईफ बाय दिनेशचंद्र सेन) अलिकडे कित्येक लोक चैतन्य सांप्रदाय हा मध्वाचार्य यांचेपासून निघाला आहे ही गोष्ट मानीत नाहींत. पण तें दुराग्रहमूलक आहे. सांप्रत हिंदी व मराठी या भाषांतून श्रीचैतन्य महाप्रभूंचीं चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांतूनहि चैतन्य सांप्रदायाची परंपरा देण्याची टाळण्यांत आली आहे. चैतन्य-सांप्रदायांतील अनेक पंडितांनीं "चैतन्य सांप्रदाय हा मध्वसांप्रदायाचा एक भाग होय" असें स्पष्टपणें म्हटलें आहे.

प्राचीन ग्रंथ आजला अनेक प्रसिद्ध आहेत. उद्धवदासाची उपासनापद्धति, गौरांगनिदेशदीपिका, बलदेवविद्याभूषणाची प्रमेयरत्नावलि, गोविंदभाष्य इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. या सर्वांनीं श्रीमध्वाचार्यांची परंपरा मान्य केली आहे. उपासनापद्धतीकार आपल्या गुरुपरंपरेविषयीं प्रथमतः लिहितातः—

श्रीमान्नारायणो ब्रह्मा नारदो व्यास एव च ।
श्रीलमध्वः पद्मनाभो नृहरिर्माधवस्तथा ॥
अक्षोभ्यो जयतीर्थश्च ज्ञानसिंधुर्महानिधिः ।
विद्यानिधिश्च राजेन्द्रो जयधर्ममुनिस्तथा ॥
पुरुषोत्तमश्च ब्रह्मण्यो व्यासतीर्थमुनिस्तथा ।
श्रीमान् लक्ष्मीपतिः श्रीमान् माधवेन्द्रपुरीश्वरः ॥
ततः श्रीकृष्णचैतन्यः प्रेमकल्पद्रुमो भुवि ॥

उपासनापद्धतिकारांनीं दिलेल्या गुरुपरंपरेशिवाय बलदेव विद्याभूषणांनें आपल्या गोविंदभाष्याच्या प्रारंभी दिलेल्या गुरुपरंपरेंत कांहीं नांवें जास्त आहेत.

श्रीकृष्णब्रह्मदेवर्षिबादरायणसंज्ञकान् ।
श्रीमध्व–श्रीपद्मनाभ–श्रीमन्नृहरिमाधवान् ॥
अक्षोभ्यजयतीर्थश्रीज्ञानसिंधु दयानिधीन ।
श्रीविद्यानिधिराजेन्द्रजयधर्मान् क्रमाद्वयम ॥
पुरुषोत्तमब्रह्मण्यव्यासतीर्थांश्च संस्तुम :
ततो लक्ष्मीपतिश्रीमन्माधवेंद्रश्च भक्तित : ॥
तच्छिष्यान् श्रीश्वराद्वैतनित्यानंदान् जगद्गुरून् ।
देवमीश्वरशिष्यं श्रीचैतन्यं च भजामहे ।
श्रीकृष्णप्रेमदानेन येन निस्तारितं जगत् ॥

या परंपरेप्रमाणें पाहातां श्रीलक्ष्मीपति स्वामीनंतर माधवेंद्रपुरी, नित्यानंदतीर्थ, अद्वैतानंद, ईश्वरपुरी, श्रीकृष्णचैतन्य असा क्रम लागतो. यांत नित्यानंदतीर्थ व अद्वैतानंद हीं दोन नांवें जास्त दिसतात.

गोविंदभाष्यकर्त्या बलदेव विद्याभूषणाचाच " प्रमेयरत्नावलि " या नांवाचा एक ग्रंथ आहे. त्या ग्रंथांत सुरवातीसच श्रीमध्वमते हरिः परतरो " या श्लोकाच्या धर्तीवर एक श्लोक रचला आहे. तो श्लोक असाः——

श्रीमध्वः प्राह विष्णुं परतममखिलाम्नायवेद्यंच विष्णु
सत्यं भेदं च जीवान हरिचरणजुषस्तारतम्यं च तेषां ।
मोक्षं विष्ण्वंघ्रिलाभं तदमलभजनं तस्य हेतुं प्रमाणं
प्रत्यक्षादित्रयं चेत्युपदिशति हरिः कृष्णचैतन्यचंद्रः ॥

या प्रमेयरत्नावलि ग्रंथावर श्रीकृष्णदेव यांची " कांतिमाला " नांवाची टीका आहे. बलदेव विद्याभूषण व श्रीकृष्णदेव हे दोघेहि विश्वनाथ चक्रवर्तीचे शिष्य होत. श्रीकृष्णदेव प्रमेयरत्नावलि टीकेंत म्हणतातः——

" इत्येतान्येव मध्वमुनिस्वीकृतानि नवप्रमेयाणि श्रीकृष्ण चैतन्यहरिस्तदन्वयगृहीतदीक्षः स्वशिष्यानुपदिशति। " जगत्प्राणो वायुदेवो विष्णोरेकान्तीति " केनोपनिषदि प्रसिद्धम । यो हनुमान्

**सन् श्रीराघवेन्द्रं, मीमः सन श्रीयादवेन्द्रं, मध्वःसन पाराशर्य श्रीमुनीन्द्रंच तत्तन्मतप्रतीपान् खंडयन् प्रतोषयामास। यद्यपि श्रीकृष्णचैतन्य ईश्वरः तथापि तन्मतं सर्वोत्तमं वीक्ष्य तदन्वये दीक्षां स्वीचकार लोकसंग्रहेच्छुः। यत्र विशुद्धं द्वैतं हरेरात्ममूर्तित्वा दिति च वर्ण्यते ॥** ( प्रमेय रत्नावलि टीका )

या सर्वांवरून अलीकडील कांहीं लोकांचें मत कसेंहि असलें तरी प्राचीन पंडित व अर्वाचीन पंडित चैतन्य सांप्रदायाची गुरुपरंपरा श्रीमध्वाचार्यापर्यंत नेतात हें स्पष्टपणें दिसून येतें. आजलाहि चैतन्यमठास " श्रीमाध्व गौडेश्वर वैष्णवमठ " असेंच म्हणतात.

याप्रमाणें आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून श्रीकृष्ण चैतन्य सांप्रदाय हा मध्वाचार्यांच्या सांप्रदायाहून भिन्न नाहीं हें स्पष्ट होतें. सामान्यतः श्री चैतन्य प्रभूच्या वेळेपासून थोडा थोडा फरक माध्वसांप्रदायाशीं पडूं लागला. बलदेवविद्याभूषण व त्याचें समकालीन जीवगोस्वामी या उभयतांचा तत्वज्ञानाविषयीं सूक्ष्म मतभेद होता. तो सर्व सूक्ष्म मतभेद "श्रीमध्वाचार्य व चैतन्यप्रभु " या सदराखालीं आलेला तत्वज्ञानविषयक मजकूर पहावा म्हणजे त्यांतील सूक्ष्म फरक कळेल.



## प्रकरण १५ वें

# माध्ववैष्णवावरील कांहीं आक्षेप

माध्ववैष्णवांवर महाराष्ट्रांत पुष्कळसे आक्षेप घेतले जातात. त्यापैकीं पुष्कळसे आक्षेप अज्ञानमूलक आहेत. सर्वांत मोठा आक्षेप "माध्व-वैष्णव महाशिवरात्रीचा उपवास अजिबात न करतां त्यादिवशीं पुरणपोळी करून घरांत जेवतात. त्यामुळें ते शिवद्वेष्टे आहेत" हा आहे.

माध्ववैष्णव शिवरात्रीचें दिवशीं उपोषण न करतां त्या दिवशीं पुरण-पोळी करून जेवतात हें अगदीं सत्य आहे. पण ते शिवद्वेष्टे आहेत हें मात्र अगदीं असत्य आहे. यांत वैष्णवांच्या दृष्टीनें व शास्त्रीयरीत्या कांहीं निषिद्ध नाहीं. व त्यांत महादेवांचा द्वेषहि नाहीं. वैष्णवांनीं महाशिवरात्री-चेंच काय? पण विष्णुव्रतावांचून इतर कोणत्याहि व्रताचें उपोषण करतां कामा नये. म्हणूनच शिवरात्रीबरोबर हरतालिका, संकष्टचतुर्थी इत्यादि व्रतनिमित्तक उपोषण करण्याची माध्ववैष्णवांत पद्धत नाहीं.

कोणत्याहि देवतांची उपासना करावयाची असेल तर ती एकनिष्ठेनेंच केली पाहिजे. भगवद्गीतेंत म्हटलें आहे "जे माझे एकनिष्ठ भक्त आहेत त्यांनाच मी पावतों." या दृष्टीनें पाहतां कांहीं नैमित्तिक कारणानें एकाद्या देवतेची उपासना करणें व निराळें उपास्य दैवत सर्वोत्तम म्हणून पूजा करणें निराळें आहे. आपल्या उपास्य देवतेची सर्वोत्तमत्व बुद्धया एकनिष्ठ-पणेंच उपासकानें उपासना केली पाहिजे. नाहींतर ती उपासना अव्यभि-चारी होणार नाहीं. वैष्णव हें विष्णूचें एकनिष्ठ उपासक असल्यामुळें इतर देवतांची उपासना करणें हें शास्त्राच्या दृष्टीनें गैर होय. म्हणून शास्त्रकारांनींहि वैष्णवांच्या शिवरात्रीच्या उपवासाविषयीं निषेधच केला आहे.

या भरतखंडांत गाणपत, शाक्त, शैव, वैष्णव असे अनेक उपासनेचे प्रकार प्रचलित आहेत. त्यांत गाणपताना चतुर्थी, शैवांना प्रदोष, व शिवरात्र

वैष्णवांना एकादशी, शाक्तांना अष्टमी वगैरे उपोषणें सांगितलीं आहेत. त्याप्रमाणें शैवानांच शिवरात्रीचें उपोषण मुख्यतया सांगितलें आहे.

शिवभक्तैश्चतुर्दश्यां कर्तव्यं समुपोषणम्
कुर्याच्चेद्विष्णुभक्तस्तु विष्णुद्रोही भवेत्धि सः ॥
विष्णुव्रताभिमानाद्वा श्रवणस्याभिमानतः ।
उदासीनेन वा राजन् संगदोषेण वा पुनः ॥
द्रव्यलाभोदयाद्वापि यदि कुर्यादुपोषणम् ॥
स तत्फलं शिवे दत्वा याति घोरं महातमः ।

भविष्योत्तर पुराण अ. ९६

याशिवाय गरुडपुराण, ब्रह्मकांड, अध्याय १७ यांत पुढील वचन आहे.

प्रमादाच्छिवरात्रिं तु ये कुर्वंति नराधमाः ।
नरके पच्यमानास्ते यावच्चंद्रदिवाकरौ ॥

वैष्णवांनीं शिवरात्रीचें दिवशीं काय करावें याविषयीं स्पष्ट वचनें धर्मशास्त्रांत दिलीं आहेत.

" **वैष्णवैस्तु तद्दिने पुराणप्रसिद्धशिवप्रतिमायां तदभावे वा शिवान्तर्गतमुख्यप्राणान्तर्गतसंकर्षणपूजा कार्या । ब्राह्मणभोजनाद्युत्सवः कार्यः ।** [ स्मृत्यर्थ० ]

गाणपताशिवाय बहुतेक जनता गणेशचतुर्थीच्या दिवशीं गणपतीची स्थापना करून त्यादिवशीं गणपतीला प्रिय असणाऱ्या मोदकांचा नैवेद्य दाखविते. गाणपत मात्र या दिवशीं उपोषण करून रात्रौ महाभिषेक करतात व मोदकांचा नैवेद्य समर्पण झाल्यानंतर भोजन करतात. गाणपताशिवाय सर्व जनता चतुर्थीस उपोषण करीत नाहींत म्हणून ते काय गणपतिद्वेष्टे झाले ? तसेंच एकादशी उपोषण गाणपत करीत नाहींत म्हणून त्यानां विष्णुद्वेष्टे जर कोणी म्हणत नाहींत तर शिवरात्रीचा उपवास वैष्णव करीत नाहींत म्हणून त्यानां शिवद्वेष्टे असें कां म्हणावें ? माध्वसांप्रदायांत

महादेवानां महत्वाचें स्थान आहे. "वैष्णवानां यथा शंभुः" हें वाक्य तर सुप्रसिद्ध आहे.

श्रीमध्वाचार्यांचे सुप्रसिद्ध शिष्य त्रिविक्रम पंडित हे मध्वाचार्यांचे शिष्य झाल्यावर त्यांचे घरीं वैष्णवसांप्रदाय सुरुं झाला. एकदां त्यांचे चिरंजीव रामेश्वरयात्रेस गेले असतां तेथील पुजाऱ्यांनीं रामेश्वराच्या देवळाचे दरवाजे बंद केले. तेव्हां पंडितांनीं तेथेंच दरवाजांत बसून महादेवाची स्तुति करण्यास प्रारंभ केला. त्या स्तुतीचा प्रारंभ "स्फुटंस्फटिकसप्रभं स्फुटित हाटक श्रीजटं" असा असून शेवट खालींलप्रमाणें आहे.

नमः शिव शिवा शिवा शिव शिवार्ध कृन्ता शिवं
नमो हर हरा हरा हर हरांतरीं मे हशम् ।
नमो भव भवा भव प्रभव भूतये मे भव
नमो मृड नमो नमो नम उमेश तुभ्यं नमः ॥

या प्रमाणें त्यांनीं स्तोत्र केल्याबरोबर देवळाचे दरवाजे आपोआप उघडले. तेव्हां त्या पूजाऱ्यांना अतिशय पश्चात्ताप झाला व त्यांनीं नारायणपंडिताचार्यांची क्षमा मागून त्यानां सन्मानपूर्वक देवालयांत नेले अशी ऐतिहासिक कथा आहे. ही महादेवाची स्तुति "शिवस्तुति" म्हणून प्रसिद्ध असून प्रत्येक वैष्णवानें भोजनाचे अगोदर म्हटली पाहिजे असा दंडक आहे. विष्णुभक्तांना तारक मंत्रोपदेश करणारे महादेव होत. यावरून वैष्णव हे शिवद्वेष्टे नसून शिवाला उपास्य दैवत मानून त्याचा तीर्थप्रसादहि त्याज्य ठरविणारेच शिवद्वेष्टे होत. याविषयीं विजयविठ्ठल नावांच्या एका महानुभावांनीं एक सुंदर पद कानडींत रचलें आहे. त्यावरून वैष्णवांची महादेवविषयक भावना काय आहे हें स्पष्टतया प्रतीत होतें.

कैलासवास गौरीश ईश ।
तैलधारियंते मनस कोडु हरियल्लि ॥
अहोरात्रियली नानु अनुचराग्रणियागि ।
महियोळगे चरिसीदेनु महादेवने ॥

अहिभूषणने यन्न अवगुणग ळेणिसदले ।
विहितधर्मदि विष्णुभकुति कोडु शंभो ॥
भागिरथीधरने भयव परिहारिसोले ।
सागि नी वलिदनगे संतसदि देवा ॥
भागवत जनप्रिय विजयविट्ठलनंघ्रि ।
जागु माडदे भजिप भाग्यवनु कुडु शंभो ॥

[ हे कैलासांत वास करणाऱ्या गौरीशा, महादेवा, श्रीहरीचे ठिकाणीं तैलधारेप्रमाणें ( रहाणारे असें ) मन दे. हे महादेवा, मी अहोरात्र या पृथ्वीमध्यें सेवकाग्रणी होऊन संचार करतों. हे महादेवा, माझे अवगुण न पाहतां विहितधर्म विष्णुभक्ति मला दे. हे भागीरथी धारण करणाऱ्या शंभो, माझ्या भयाचा परिहार करून श्रीहरीची भक्ति करण्याचें भाग्य मला दे. ]

याप्रमाणें दासकूटांतील अनेक दासवर्यांचीं पदें आहेत. पण विस्तार-भयास्तव तीं देतां येत नाहींत.

या विवेचनावरून वाचकांस कळून येईल कीं, वैष्णव हे शिवद्वेष्टे नाहींत. वैष्णवांनीं शिवरात्रीचा उपवास जरी केला नाहीं, तथापि, शिवाची उपासना तारतम्यपूर्वक करणें हेंहि शास्त्रशुद्धच आहे. जर कोणी अज्ञानानें महादेवाचा द्वेष करीत असतील तर तो त्यांनीं सोडून द्यावा व वैष्णवेतरांनींहि वैष्णव हे शिवद्वेष्टे आहेत ही कल्पना सोडून द्यावी.



## प्रकरण १६ वें

# श्रीमध्वाचार्यांचा कालनिर्णय

श्रीमदानंदतीर्थ उर्फ मध्वाचार्य यांच्या कालाविषयीं अनेक मतें सध्यां प्रचलित असल्यामुळें त्या सर्व मतांचा समन्वय करून सिद्धान्त काढणें हें सर्वस्वीं अशक्य आहे. म्हणून खुद्द आचार्यांचीं वाक्यें व इतर आनुषंगिक उल्लेखांवरून आचार्यांचा कालनिर्णय ठरविण्याचा प्रयत्न केला आहे.

अगदीं सुरवातीस आचार्य हे विलंबि संवत्सरांत अवतीर्ण झाले व पिंगल संवत्सरांत अदृश्य झाले अशी विचारसरणी होती. याला अनुसरून आचार्य हे शक १०४० च्या विलंबि संवत्सरांत अवतीर्ण झाले व शक ११९८ च्या पिंगल संवत्सरांत अदृश्य झाले. याला प्रमाण म्हणून उत्तरादिमठा-वरील होऊन गेलेल्या स्वामीचा परंपरा वृक्ष होय. स्वतः लेखकाजवळहि जुनें दोनशें वर्षांपूर्वी लिहिलेले परंपरावृक्ष आहेत. त्या सर्व परंपरावृक्षांत उपरोक्त शकच गृहीत धरले आहेत. पण हे उपरोक्त शक इतिहासांच्या प्रत्यक्ष घडलेल्या घटनांच्या अगदीं विरुद्ध असल्यामुळें जुन्या लोकांशिवाय कोठेंहि मान्यता पावूं शकले नाहींत.

यानंतर डॉ. बुकॅनन् नांवाच्या एका जर्मन पंडितानें याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला आहे. त्यानें मलबार म्हैसूर, साउथ कॅनरा वगैरे जिल्ह्यांत हिंडून, आचार्यांचे ग्रंथ व उडुपी येथील मठांच्या परंपरा पाहून आचा-र्यांच्या कालाविषयीं निश्चित निर्णय केलेला आहे. त्यांत त्यानें आचार्यांचा अवतार शक ११२१ सन इ. ११९९ धरला आहे. हेंच मत कृष्णस्वामी अय्यर, डॉ. भांडारकर इत्यादिकांनीं मान्य केलें आहे. (पहा:—श्री ग्रेट आचार्थाज्, शैविझम् ॲन्ड वैष्णविझम्)

डॉ. बुकॅनन यानें आपला याविषयींचा लेख "डिस्ट्रिक्ट मॅन्युअल ऑफ साउथ कॅनरा" यामध्यें प्रसिद्ध केला आहे. सामान्यतः आचार्यांचा

वास या मृत्युलोकावर ऐंशी वर्षे होता ही प्रचलित समजूत गृहीत धरून उपरोक्त विद्वानांनीं आचार्यांचा निर्याणकाल ठरविला आहे.

आचार्य हे विलंबि संवत्सरांत अवतीर्ण झाले ही समजूत तीनशें वर्षांपासून प्रचलित असावी. कारण छल्लारी आचार्यांनीं "स्मृत्यर्थसागर" नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे त्याच्या सुरवातीस आचार्यांच्या अवतारशकाविषयीं उल्लेख केला आहे तो असा:—

> एकादशशते शाके विंशत्यष्टयुगे गते ।
> अवतीर्णं मध्वगुरूं सदा वंदे महागुणम् ॥

या उल्लेखावरून आचार्य शके ११०० सालीं अवतीर्ण झाले असावेत असें वाटतें. या उल्लेखांत विलंबि संवत्सरांत अवतीर्ण झाले असा स्पष्ट उल्लेख नसला तरी शके ११०० या सालीं विलंबि संवत्सरच येतें. यापूर्वी कोणा चरित्र ग्रंथकारांनीं उपरोक्त संवत्सराचा कोठेंहि उल्लेख केला नाहीं.

शक ११२१ हें संवत्सर आचार्यांच्या अवताराविषयीं निश्चित होतें न होतें तोंच वै. सी. एम्. पद्मनाभाचार्य यांचा "लाईफ ॲन्ड टीचिंग ऑफ् मध्वाचार्य" हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्यांत या उपरोक्त मतांचा विचार करून तीं सर्व मतें त्याज्य ठरविलीं. त्यांत त्यांनीं मध्वाचार्यांच्या कालाविषयीं खुपच चिकित्सा केली आहे व ती चिकित्सा करतांना "नरहरितीर्थांचे शिलालेख, वेदांतदेशिकाचार्यांनीं अक्षोभ्यतीर्थांचा केलेला उल्लेख, अक्षोभ्यतीर्थ व विद्यारण्य या उभयतांचा झालेला वादविवाद, शृंगेरी पीठावरील विद्याशंकरतीर्थांचें आचार्यांशीं समकालीनत्व, मध्वविजयांत देवगिरीच्या महादेव नामक राजाचा आलेला उल्लेख या सर्व गोष्टींचा व उपरोक्त विलंबि व पिंगल संवत्सरीं आचार्य अवतीर्ण व अदृश्य झाले या सर्व गोष्टींचा मेळ घालून त्यांनीं पुढीलप्रमाणें निर्णय केला आहे. सी. एम्. पी. आचार्य आपल्या ग्रंथांत म्हणतात कीं,

" आचार्य हे विलंबि संवत्सरांत अवतीर्ण झाले व पिंगल संवत्सरांत अदृश्य झाले यांत संशयच नाहीं. पण हीं विलंबि व पिंगल संवत्सरें कोणतीं ? विलंबि व पिंगल संवत्सर ही पुढीलप्रमाणें येतात.

| | | | |
|---|---|---|---|
| विलंबि संवत्सर | १०४० | शक | इ. स. १११८ |
| | ११०० | ,, | ,, ११७८ |
| | ११६० | ,, | ,, १२३८ |
| पिंगल संवत्सर | १११९ | ,, | ,, ११९७ |
| | ११७९ | ,, | ,, १२५८ |
| | १२३९ | ,, | ,, १३१७ |

मठाच्या जुन्या वंशावळींत व आमच्या मताप्रमाणें इ. स. १३१७ शक १२३९ पिंगल संवत्सर हें आचार्यांचें निर्याण वत्सर धरलें तर एकशें वीस वर्षांची तफावत पडते.

पण पहिलें मत ( शक १११९ इ. स. ११९७ या पिंगल संवत्सरांत अदृश्य झाले हें मत ) गृहीत धरलें तर नरहरितीर्थांच्या शिलालेखाची वाट काय ? नरहरीतीर्थांचा शेवटचा शिलालेख इ. स. १२९४ या सालचा आहे. नरहरीतीर्थ हे आचार्यानंतर सात वर्षांनीं पीठावर आले व ते नऊ वर्षें पीठावर होते. आचार्यांचा निर्याणशक १११९ इ. स. ११९७ हा जर गृहीत धरला तर शक ११२५ इ. स. १२०४ या सालीं नरहरी तीर्थ पीठावर आले इ. स. १२१३ या सालीं वृंदावनस्थ झालेल्या नरहरी तीर्थांचे शिलालेख इ. स. १२९४ सालीं कसे असतील ! यावरून व विद्याशंकर तीर्थांच्या कालावरून आचार्य शके ११६० इ. स.१२३८ या वर्षांच्या विलंबि संवत्सरांत अवतीर्ण झाले व शक १२३९ इ. स. १३१७ या वर्षीं अदृश्य झाले हेंच बरोबर ठरतें."

याप्रमाणें सी. एम्. पद्मनाभाचार्य यांनीं इ. स. १२३९ हा अवतार घेतलेला सन व इ. स. १३१७ हा निर्याणाचा सन ठरविला आहे. याला त्यांनीं एक नवीनच प्रमाण दिलें आहे. हृषीकेशतीर्थ नांवाच्या यतीनीं ' सांप्रदाय पद्धती ' या नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे त्यांतील प्रमाणें सी. एम्. पद्मनाभाचार्य यांना अनुकूल आहेत.

**त्रिशताब्दोत्तरचतुस्सहस्राब्देभ्य उत्तरे ।**
**एकोनचत्वारिंशाब्दे ( एकोनविंशतितमे )**
**विलंबि परिवत्सरे ॥**

आश्विनशुक्लदशमी दिवसे भुवि पावने ।
पाजकाख्ये शुचिक्षेत्रे दुर्गया चाभिवीक्षिते ।
जातो मध्याह्नवेलायां बुधवारे मरुत्तनुः

या उल्लेखावरून आचार्यांनीं स्वतः केलेल्या उल्लेखास बाध न येतां विलंबि व पिंगल या संवत्सरांचा समन्वय होत असला तरी हें मत सयुक्तिक नाहीं. स्वतः श्रीमन्मध्वाचार्योंनीं आपल्या कालाविषयीं भारततात्पर्यनिर्णय या ग्रंथांत उल्लेख केला आहे.

चतुःसहस्रे त्रिशत्तोत्तरे गते संवत्सराणां तु कलौ पृथिव्यां
जातः पुनर्विप्रतनुः स भीमो...(भा. ता. नि. अ. ३२–१३१)

[ कलियुगाची त्रेचाळीशें वर्षें गेल्यावर कलियुगांत भीम ब्राह्मणरूपानें अवतीर्ण झाले. ]

सध्यांच्या पंचांगावरून पाहिलें असतां कलियुगांची ५०४९ इतकीं वर्षें गेलीं आहेत. श्रीमध्वाचार्य हे कलियुगाच्या ४३०० व्या वर्षी अवतीर्ण झाले. म्हणजे त्यांना अवतार घेऊन आज बरोबर ७४९ वर्षें झालीं. सध्यां चालू असलेल्या शके १८७० मधून ७४९ वर्षें वजा केली म्हणजे शक ११२१ हा येतो. म्हणून आचार्यांच्या उल्लेखास प्राधान्य देऊन हाच शक ग्राह्य धरणें युक्त होय.

## याची कारणपरंपरा

आचार्य दिग्विजय करीत असतां त्यांना अनेक नररत्नें मिळालीं; त्यांत शाभशास्त्री नांवाचे पंडित होते. हेच पुढें नरहरीतीर्थ नांवानें प्रसिद्ध झाले. हे जसे पंडित होते तसेच राजकारणधुरंधुर होते. आचार्यांचें कालीं ओरिसा प्रातांत गंग घराणें राज्य करीत होते. आचार्योंचे काळीं भरतखंडांत सर्वत्र कमीजास्त प्रमाणांत मुसलमानांच्या स्वाऱ्यांचें चटके बसूं लागले होते. आचार्यांच्या संचारांत कांहीं ठिकाणीं मुसलमानांचा त्रास झाल्याचें आढळून येते. त्याप्रमाणें ओरिसा प्रांतावरहि मुसलमानांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या होत्या. ओरिसा प्रांतांतील राजांना "गजपति" अशीहि संज्ञा

असे. कारण यांचेजवळ हत्तींचें सैन्य तयार होतें. या गजपति घराण्याचा व चालुक्य घराण्याचा संबंध होता. या घराण्यांत गजपति पहिला नरसिंह हा राज्यावर आला. याचें कालीं मुसलमानांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या तरी त्याचा प्रत्यक्ष त्रास या नरसिंहास झाला नाहीं.. हा पुढें इ. स. १२६४ मध्यें वारला. त्यावेळीं त्याचा मुलगा भानुदेव हा गादीवर आला. हा गादीवर आल्यानंतर थोड्याच दिवसांत ओरिसा प्रांतावर मुसलमानांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या. शेवटीं त्याचा बंदोबस्त करण्याकरितां स्वतः हा राजा गेला असतां त्याठिकाणीं मारला गेला. या घटनेविषयीं फारशी कोणी माहिती दिली नाहीं. फक्त 'सत्यनिधि विलास' नांवाच्या एका काव्य-ग्रंथांत ओझरता उल्लेख केला आहे.

तस्मिन् राष्ट्रे परिव्राजि वसत्यद्भुतविक्रमः ।
सुयशाः प्रस्थितो जेतुं पाश्चात्यैर्यवनैर्हतः ॥ ६१ ॥
अराजके तदा राष्ट्रे मंत्रिणो ये विचक्षणाः ।

(सत्यनिधिविलास सर्ग २)

हा भानुदेव इ. स. १२७९ या सालीं मरण पावला. याचा मुलगा लहान होता. व हा लहान असल्यामुळें राज्यधुरा वाहण्यास तशाच जबरदस्त राजकारणी पुरुषाची जरूरी होती. म्हणून भानुदेवाच्या राणीला नरहरी तीर्थांचें स्मरण झालें असावें कारण या कलिंग-ओरिसा प्रांतांचें मुख्य अमात्यपद नरहरीतीर्थांच्या घराण्यांत एक दोन पिढ्या तरी पूर्वीपासून असावें असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. कारण श्रीकूर्म येथील योगानंदनृसिंहाच्या देवालयांत कोरलेल्या शिलालेखांतील सहाव्या श्लोकांत

" पित्र्याचारमुपैति सूनुरिति सन्नीतिस्थितो धर्मतः ॥

अशीं वाक्यें आहेत. यावरून नरहरीतीर्थांचे वडील गजपति घराण्याचे मुख्य प्रधान असावेत असें वाटतें. इतकेंच नव्हे तर इ. स. १२६४ सप्टेंबर १९ (शक ११८६ कन्या राशीचा वद्य त्रयोदशी शुक्रवार) या सालचा नरहरीतीर्थांचा एक शिलालेख आहे. त्यावरुन नरहरीतीर्थ आचार्यांकडून संन्यास घेतल्यावरहि अमात्यपदावर होते. इ. स. १२६४ मध्यें गजपति पहिला नरसिंह हा वारल्यावर त्याचा मुलगा भानुदेव हा गादीवर आला.

या नवीन राजाचें व नरहरीतीर्थांचें पटलें नसावें. त्यामुळें त्यांनीं अमात्यपद सोडलें असावें. व पुन्हा १२७९ नंतर त्यांनीं आचार्यांचें आज्ञेवरून अमात्यपद स्वीकारलें असावें. कारण त्यांचा पुन्हां शिलालेख इ. स. १२८१ या सालचा आहे. व मध्यतरींच्या कालांत ते आचार्यांजवळच येऊन राहिले असावेत. पण हे शिलालेख प्रसिद्ध करणारे कृष्णशास्त्री यांनीं नरहरीतीर्थ हे ओरिसा प्रांताच्या रीजंट पदावर तीस वर्षें असावेत असें अनुमान केलें आहे. सदर अनुमान निर्मूल असावें असें आम्हांस वाटतें. इ. स. १२८१ ते १२९५ या कालांतील चार पांच शिलालेख डॉ. किलहॉर्न यांनीं संपादन केलेले असून त्याचा संक्षेपानें सारांश एफिग्राफिका इंडिका, भाग सहावा, पृष्ठ २६० ते २६६ वर दिला आहे.

नरहरी तीर्थांचा सर्वांत मोठा नऊ श्लोकांचा शिलालेख शके १२०३ इ. स. १२८१ या सालचा आहे. त्यांतील सहाव्या व सातव्या श्लोकांवरून शबर जातीच्या लोकांपासून कलिंग प्रांताच्या रक्षणाची जबाबदारी नरहरीतीर्थांनीं पत्करली होती असें दिसते.

नरहरी तीर्थांचा एक शिलालेख नरहरीतीर्थ ज्या राजाचे अज्ञान पालक होते त्या नरसिंहदेवास अठरावें वर्ष लागल्यामुळें आनंदाप्रीत्यर्थ सुवर्णदान देवविल्याविषयीं आहे.

( या सर्व शिलालेखांची तपशीलवार माहिती शेवटीं परिशिष्टांत जोडली आहे ती पहावी. )

सी. एम्. पद्मनाभाचार्यांच्या मताप्रमाणें इ. स. १३१७ हा काल ( शक १२३९ माघ शु॥ नवमी ) आचार्यांच्या निर्याणाचा काल धरल्यास नरहरीतीर्थांचें स्वत: वृंदावनस्थ होतांना किती वय असावें याचें अनुमान निघूं शकतें.

इ. स. १२६४ मध्यें ते अमात्यपदावर होते. त्यावेळीं ते कमींत कमी तीस वर्षांचे तरी असावे. हीं तीस वर्षें, राज्यकारभाराची १२६४ पासून १२९५ पर्यंतचीं एकतीस वर्षें, आचार्य १३१७ सालीं अदृश्य झाल्यावर सात वर्षांनीं इ. स. १३२४ सालीं नरहरी तीर्थ पीठावर आले. म्हणजे २४ + ५ एकूण २९ वर्षें. म्हणजे नरहरीतीर्थ वयाच्या नव्वदाव्या वर्षीं

पीठावर आले व नऊ वर्षे पीठावर असल्यामुळें ९९ व्या वर्षी ते समाधिस्थ झाले असें अनुमानानें निघूं शकेल. हा दुसरा नरसिंह याला अठरा वर्षें पूर्ण झाल्यावर नरहरीतीर्थांनीं रीजंटपद सोडलें असावें. या सर्व शिलालेखांवरून नरहरीतीर्थ हे कमीत कमी पंधरा वर्षें राज्यकारभार पहात असावेत. त्यांच्या स्तोत्रांत मात्र मोघमपणें "ते राज्यावर बारा वर्षें होते" असें म्हटलें आहे.

("चक्रे तद्राजकार्यं सकलजननुतो द्वादशाब्दान् सुसक्तः"

(नरहरीयति स्तोत्र)

पण प्रत्यक्षांत सन १२७९ नतर त्यांनीं राज्यकारभाराचीं सूत्रें हातीं घेतली व १२९४ अखेर ते राज्यकारभारांतून निवृत्त झाले असावेत व ते एकूण पंधरा वर्षें राज्यकारभार पहात असावेत, असें अनुमान निघतें. [पहा—हिस्टरी ऑफ् ओरिसा पृष्ठ २७०]

यदा राजपुत्रो युवा भूत्पदानीं तदीयं समस्तं समर्प्यास्य कोशं।
स्थितं रामदेवं ससीतं ममेह देहीति चोक्त्वा गृहीत्वा गमद्राक्

या शिवाय वासिष्ठरामायणाच्या पंधराव्या अध्यायांतहि या विषयीं उल्लेख केला आहे.

राज्ये संस्थाप्य तं पुत्रं जगाम स्वमठं पुनः।
गच्छंतं तं यतिश्रेष्ठं मंत्रिणः स पुरोहिताः॥
स्वामिन् कोशगृहे राज्ञो यद्वस्तु मनसेच्छसि।
तद् गृहीत्वा प्रगंतव्यं नात्र कार्या विचारणा॥
एवमुक्तो नरहरी तीर्थार्यः प्रविचिन्त्य सः।
तथाह परमप्रीतः ससीतं रघुनंदनम्॥
रामचंद्रं स संगृह्य गुरवे चार्पयद्यतिः॥

या सर्व उल्लेखांवरुन नरहरीतीर्थांनीं राज्यकारभाराचीं सूत्रें खालीं ठेवल्यानंतर त्यांचा आदर करण्याकरितां तरुण राजपुत्रानें सर्व खजिना त्याचेसाठीं मोकळा केला, तेव्हां नरहरीतीर्थ म्हणाले, "मला स्वतःस द्रव्य नको आहे. मी तर बोलून चालून संन्यासी." याप्रमाणें सांगितल्यावर

पुन्हां राजपुत्रानें फारच आग्रह केला त्यावेळीं श्रीमध्वाचार्यांना अपेक्षित असणाऱ्या मूलराम, सीतादेवी यांच्या प्रतिमा मागितल्या. राजपुत्रानें कोणत्याहि तऱ्हेची आडकाठी न आणतां आपल्या कोशगृहांत असणारी मूलराम व सीतादेवी ह्या प्रतिमा असलेली रत्नखचित पेटी नरहरीतीर्थांस समर्पण केली. त्यानंतर नरहरीतीर्थांनीं त्या प्रतिमा घेऊन त्वरेनें श्रीमदाचार्यांकडे आगमन केलें व त्या प्रतिमा आपल्या गुरुस–श्रीमन्मध्वाचार्यांस समर्पण केल्या. श्रीमदाचार्योनीं त्या प्रतिमांचें ऐंशी दिवस पूजन केलें व नंतर श्रीपद्मनाभतीर्थांस त्या प्रतिमा दिल्या. श्रीपद्मनाभतीर्थांनीं अजमासें सात वर्षें त्या प्रतिमांचें पूजन केलें. नंतर पद्मनाभतीर्थांनीं त्या नरहरितीर्थांस दिल्या. नरहरितीर्थांनीं त्या प्रतिमांचें नऊ वर्षें पूजन केलें. नंतर पुढील स्वामीच्या–माधवतीर्थांच्या–स्वाधीन त्या प्रतिमा केल्या.

सामान्यतः पीठावरील पहिले स्वामी वृंदावनस्थ होतांना मठांतील प्रतिमा, वेदव्यास शिला, वगैरे पुढील स्वामीच्या स्वाधीन करतात. हा नियम अगदीं प्रारंभापासून आहे. श्रीमदाचार्यांना या प्रतिमा मिळाल्या त्या त्यांच्या अगदीं शेवटच्या दिवसांत मिळाल्या असेंच अनुमान "त्यांनीं ऐंशीं दिवस पूजन त्या प्रतिमांचे केलें" या वाक्यावरून निघतें. श्रीमदाचार्यांना त्या प्रतिमांचें वाटत असलेलें महत्व व त्यासाठीं त्यांनीं केलेले प्रयत्न पाहतां प्रतिमा आणून दिल्यानंतर फक्त ऐंशी दिवस पूजन करून पुढें त्या पद्मनाभतीर्थांच्या स्वाधीन केल्या व ते संचारार्थ निघून गेले. व पुढें ते पंचवीस वर्षें भूतलावर होते, [ अर्थात् शक ११६० विलंबि संवत्सरीं आचार्य अवतरले व शके १२४० पिंगळ संवत्सरीं अदृश्य झाले हें मान्य केलें तर ] ही गोष्ट संभवनीय वाटत नाहीं. म्हणून आचार्यांना या प्रतिमा अगदीं शेवटच्या दिवसांत मिळाल्या व त्यांनीं फक्त त्या प्रतिमांचें ऐंशी दिवस पूजन केलें हेंच अनुमान सयुक्तिक दिसतें.

नरहरीतीर्थांचा शेवटचा शिलालेख शक १२१५ चा आहे. त्याची इंग्रजी तारीख ३ जानेवारी १२९४ ही येते. शक १२१५ च्या अखेरीस नरहरीतीर्थांनीं आपलें रीजंटपद सोडलें असावें. पुढें त्या प्रतिमा घेऊन आचार्यांना कार्तिक महिन्यांत नरहरीतीर्थांनीं आणून दिल्या असाव्यात. म्हणजे रीजंटपद सोडल्यानंतर सहा सात महिने त्या प्रतिमा आचार्यांना

मिळण्यास लागले असावेत. या सर्व हिशेबावरून शक १२१६ च्या कार्तिक महिन्यांत आचार्यांना या प्रतिमा मिळाल्या. आचार्यांनीं त्या प्रतिमा मिळाल्यावर मोठा उत्सव केला असला पाहिजे. म्हणूनच आजलाहि उत्तरादिमठांत कार्तिक शु० १२ ला रात्रौ स्नान करून श्रीराम, सीतादेवी यांची पूजा करण्याची पद्धत आहे. कारण शु० १२ ला रात्रौ आचार्यांना प्रतिमा मिळाल्या. कार्तिक शु० १२ शिवाय रात्रौ पूजा केली जात नाहीं. पुढें त्याच वर्षी माघ शुद्ध नवमीस आचार्य अदृश्य झाले.

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून वाचकांच्या लक्ष्यांत आलें असेलच कीं, "नरहरीतीर्थांचा राजपदत्याग, व आचार्यांना प्रतिमांची प्राप्ति ह्या घटना एकाच वर्षांत म्हणजे शक १२१६ मध्यें घडल्या व ऐंशी दिवस पूजन झाल्यावर शक १२१६ च्या माघ शु. नवमीस आचार्य अदृश्य झाले."

## हृषीकेशतीर्थांची सांप्रदाय पद्धति

सी. एम्. पद्मनाभाचार्यांनीं आपल्या मताच्या समर्थनार्थ [ ११६० शकांत विलंबी संवत्सरीं आचार्य अवतीर्ण झाले व १२३९ पिंगल संवत्सरींला अदृश झाले या मताच्या ] या संवत्सराशीं व आचार्यांनीं केलेल्या उल्लेखांशी समन्वय करण्याकरितां सांप्रदाय पद्धति या नांवाचा ग्रंथ पुढें आणला आहे. आमच्या मतें या ग्रंथांतील उतारे प्रमाण म्हणून मानतां येतील कीं नाहीं या विषयीं संशय आहे. आमचेजवळ भारततात्पर्यनिर्णयावरील सात आठ टीका आहेत. त्यांत वरदराजाचार्य व वादिराजतीर्थ यांच्याहि टीका आहेत. या दोन टीकाकारांत वरदराजाचार्य हे पहिले टीकाकार होत. वादिराजतीर्थ हे उडुपीकडील स्वादिमठाचें होत. या दोघांनीं "चतुस्सहस्त्रे त्रिशतोत्तरे गते" या बत्तीसाव्या अध्यायांतील उल्लेखावर सरळ टीका केली आहे. या उभय टीकाकारांना "सांप्रदाय पद्धति" हा ग्रंथ माहीत नसावा हें म्हणणें धाष्टर्याचें होईल. त्यांतून वरदराजाचार्यांना—हे महाराष्ट्रांतील असल्यामुळें—कदाचित् हा ग्रंथ माहीत नसणें

संभवनीय आहे. पण वादिराजतीर्थ हे उडुपीचे, हृषिकेशतीर्थ हेहि उडुपीचे राहणारे होत. आजमितीलाहि अनेक प्राचीन हस्तलिखित व तालपत्रांवरील ग्रंथ तेथें संग्रहीत केले आहेत. अशा स्थितींत उडुपीच्या मठावरील हृषिकेशतीर्थांनीं रचलेला " सांप्रदायपद्धति " सारखा आचार्यांच्या कालनिर्णयावर महत्वाचा प्रकाश टाकणारा ग्रंथ उडुपीच्या एका मठावरील स्वामींना—वादिराजतीर्थांना—माहीत नव्हता असें म्हणणें अत्यंत धाडसाचें होय. जर सदर ग्रंथ वादिराजतीर्थांना माहीत असतां तर भारततात्पर्यनिर्णय ग्रंथावरील आपल्या टीकेंत सांप्रदाय पद्धतींतील विधानांचा त्यांनीं उल्लेख खात्रीनें केला असतांच यांत बिलकुल शंका नाहीं. संवत्सराचा उगम कोठून झाला याचा शोध करण्याकरितां " विद्याधीश विजय, सत्यनिधिविलास, सत्यनाथ विजय, जयतीर्थ विजय (छल्लारी आचार्यकृत), जयतीर्थविजय ( व्यासतीर्थकृत ), राघवेन्द्रविजय या ग्रंथांच्या प्राचीन हस्तलिखित प्रती पाहिल्या आहेत. भारततात्पर्यनिर्णय या ग्रंथावरील वरदराज, वादिराज, मधुसूदनतीर्थ, जनार्दनभट्ट, नृसिंहाचार्य इत्यादिकांच्या टीका पाहिल्या आहेत. पण त्यांपैकीं एकाहि टीकाकारांनीं आचार्यांच्या भारततात्पर्यनिर्णयावरील आपल्या टीकेंत सदर श्लोकाचें व्याख्यानाचे वेळीं सांप्रदायपद्धति पद्धतींतील वचनांचा उल्लेख केला नाहीं. त्यामुळें हृषिकेशतीर्थांच्या सांप्रदायपद्धतीच्या प्रामाण्याविषयीं शंका निर्माण होते. शिवाय डॉ. बुकॅनन यानें उडुपीच्या सर्व मठाधिपतींची व विद्वानांची मुलाखत घेऊन सभा भरविली असतां आचार्यांच्या कालावर प्रकाश टाकणारा हा सांप्रदायप्रदीप ग्रंथ कोणीहि पुढें आणला नाहीं. तात्पर्य नरहरीतीर्थांचे शिलालेख व आचार्यांनीं स्वतः केलेला उल्लेख यावरून आचार्यांचा काल ठरविणें योग्य होय.

**आचार्य शक ११२१ या सालीं अवतरले व शक १२१६ सालीं मनुजदृष्टीस अगोचर झाले. ते एकुण ९५ वर्षे भूतलावर होते व त्यांपैकीं ८० वर्षे पीठावर होतें.**

कालिदासाच्या कालांत जसा विक्रमादित्यानें गोंधळ घातला आहे तद्वत् आचार्यांच्या कालाविषयीं या संवत्सरानें घोळ घातला आहे.

या आमच्या निर्णयास इतर कोणत्याहि ऐतिहासिक घटनांचा विरोध येत नाहीं. मध्वविजयांत "देवगिरीचा महादेव वर्मा" याचा उल्लेख आला आहे. त्याचा कालहि शक ११६० ते ११७१ हाच येतो. सुप्रसिद्ध विद्यारण्य स्वामींचें गुरु विद्याशंकर भारती यांचा उल्लेख मोघमांत आला आहे. तोहि उल्लेख या निर्णयाच्या विरुद्ध जात नाहीं. पुढें विद्यारण्य व अक्षोभ्यतीर्थ यांचा वादविवाद झाल्याचा वेदांतदेशिकवैभवांत जो उल्लेख आहे तोहि या कालाला अनुसरुन विरुद्ध जात नाहीं. म्हणून आम्ही मांडलेला कालनिर्णयविषयक सिद्धांन्त हाच सयुक्तिक होय.



# प्रकरण १७ वें

# श्रीमध्वाचार्यांचे ग्रंथ

कोणताहि सिद्धान्त व त्याकरितां प्रवृत्त झालेल्या शास्त्रीय ग्रंथांत प्रकरणग्रंथ, सिद्धान्तग्रंथ व वादग्रंथ असे मुख्य भेद पडतात. याप्रमाणें आचार्यांच्या सदतीस ग्रंथांत तीन भेद आहेत.

## प्रकरणग्रंथ

१ प्रमाणलक्षण, २ मायावादखंडन, ३ उपाधिखंडन, ४ प्रपंचमिथ्यात्वानुमानखंडन, ५ तत्वसंख्यान, ६ तत्वविवेक, ७ तत्त्वोद्योत, ८ कथालक्षण, ९ कर्मनिर्णय, १० विष्णुतत्वनिर्णय.

## वादग्रंथ

१ अनुव्याख्यान, २ न्यायविवरण.

## सिद्धान्तग्रंथ

१ गीताभाष्य, २ गीतातात्पर्यनिर्णय, ३ ब्रह्मसूत्रभाष्य, ४ भारततात्पर्यनिर्णय, ५ भागवततात्पर्यनिर्णय, ६ दशोपनिषद् भाष्यें (एकूण १०) ७ ऋग्भाष्य, ८ अणुभाष्य, ९ कृष्णामृतमहार्णव, १० तंत्रसार, ११ सदाचारस्मृति, १२ द्वादशस्तोत्र, १३ यमकभारत, १४ यतिप्रणवकल्प, १५ जयंतीनिर्णय, १६ नखस्तुति;

वैदिक म्हणविणाऱ्या सर्व आचार्यांनीं गीता, ब्रह्मसूत्रें व ईशावास्यादि दहा उपनिषदें यावर आपआपल्या सिद्धान्ताप्रमाणें भाष्यें रचलीं आहेत.

ब्रह्मसूत्रें बादरायण वेदव्यासप्रणीत असून एकूण तीं सूत्रें पांचशें चौसष्ट आहेत, त्यांची विभागणी चार अध्यायांत केली असून प्रत्येक अध्यायाचे चार पाद आहेत. सूत्रांच्या व अधिकरणांच्या संख्येंत पांचहि आचार्यांचें मतभेद आहेत.

| ॰ | शंकराचार्य | रामानु-जाचार्य | मध्वाचार्य | निंबार्क | वल्लभ |
|---|---|---|---|---|---|
| सूत्रें | ५५५ | ५४५ | ५६४ | ५४९ | ५५० |
| अधिकरणें | १९२ | १५६ | २२३ | १६२ | १६२ |

बलदेव विद्याभूषणानें आपल्या गोविंदभाष्यांत सूत्रांची संख्या मध्वाचार्यांप्रमाणेंच दिली आहे. ब्रह्मसूत्राचे अध्याय, पाद व अधिकरणें अशी विभागणी कोणी केली असावी, याविषयीं निश्चित अनुमान करणें शक्य नाहीं. तरी पण अध्याय संपण्याचें वेळीं मात्र विषय संपल्याचें निदर्शक असें सूत्र आहे; त्यावरूनच अध्याय विभागणी झाली असावी.

पहिल्या अध्यायाचे शेवटीं " एतेन सर्वे व्याख्याताः व्याख्याताः ", दुसऱ्या अध्यायाचे शेवटीं " वैशेष्यात्तुतद्वादस्तद्वाद", तिसऱ्या अध्यायाचे शेवटीं " एवं मुक्तिफलानियमस्तदवस्था धृतेस्तदवस्था धृतेः ", चवथ्या अध्यायाचे शेवटीं " अनावृत्तिः शब्दात् अनावृत्तिः शब्दात् " अशीं सूत्रें आहेत. यावरुन विषय संपला म्हणून अध्याय संपला अशी पद्धत पडलीं असावी.

या सूत्रांमध्यें शंकराचार्य व रामानुजाचार्य हे कांहीं सिद्धान्तसूत्रें व कांहीं पूर्वपक्षसूत्रें असा भेद करतात. पण मध्वाचार्य मात्र सर्व सिद्धान्तसूत्रें मानतात. ब्रह्मसूत्रांच्या या चार अध्यायांस समन्वयाध्याय, अविरोधाध्याय, साधनाध्याय, फलाध्याय अशीं नांवें आहेत.

ब्रह्मसूत्रावर श्रीमध्वाचार्यांचे अगोदर एकवीस भाष्यें झालीं आहेत. त्या सर्वांच्या प्रतिपादनांत कमी अधिक फरक असला, तरी तीं भाष्यें द्वैत अगर अद्वैत यांतच मोडतात. शंकराचार्य व मध्वाचार्य या उभयतांनीं ब्रह्म-सूत्रांचा परस्परविरोधी अर्थ केला असल्यामुळें कोणताहि एकच अर्थ खरा असणें संभवनीय आहे. म्हणून ब्रह्मसूत्रें हीं द्वैत प्रतिपादन करतात कीं अद्वैत प्रतिपादन करतात हें पाहणें असेल तर कोणत्याहि भाष्याच्या साहाय्यावाचून पहावें.

कोणतेंहि भाष्य मदतीसाठीं न घेतां ब्रह्मसूत्रांच्या अर्थावर नजर फेकली असतां ब्रह्मसूत्रें द्वैतपरच आहेत असें वाचकांस आढळून येईल. अगदीं प्रारंभींच "अथातो ब्रह्मजिज्ञासा, जन्माद्यस्ययतः" या दोन सूत्रांत ब्रह्माची जिज्ञासा करावी असें सांगून लगेच "ज्याचे पासून जगताचें जन्मादिक होतात" तें ब्रह्म होय असें सांगितलें यावरून जगत्, जिज्ञासू, जिज्ञास्य हे आवश्यक असून त्यांत भेद असेल तरच जिज्ञासा व जन्मादिक संभवतील; अन्यथा नाहीं. अशा रीतीनें पुढील सर्व सूत्रार्थावर नजर टाकली असतां ही सूत्रें द्वैतवादी आहेत हें स्पष्टपणें कळेल.

श्रीमध्वाचार्यांनीं ब्रह्मसूत्रांवर आपलें भाष्य रचून तें भाष्य बदरिकाश्रमीं गेल्यावेळीं वेदव्यासांना समर्पण केलें व पुढें त्याचा प्रसार केला.

## ब्रह्मसूत्रभाष्याचें तात्पर्य

गौतम ऋषींच्या शापानें सर्व ऋषि अन्यथा ज्ञानी झालेले पाहून ब्रह्मरुद्रादिकांनीं सर्वांचे अन्यथा ज्ञान नष्ट करण्याविषयीं श्रीहरीची प्रार्थना केली. त्यावेळीं त्यांच्या प्रार्थनेमुळें श्रीहरीनें वेदव्यास नामक अवतार घेऊन एका वेदाचे चार विभाग केले; पुन्हां अनेक पोटविभाग केले. या वेदाचेहि आकलन होईना तेव्हां वेदार्थनिर्णायक अशीं ब्रह्मसूत्रें रचलीं. शिवाय महाभारत, पंचरात्र, मूलरामायण इत्यादि ग्रंथ रचले. ( याप्रमाणें ब्रह्मसूत्रांची पूर्वपीठिका सांगितली आहे. )

जगांत प्रत्येकाला इष्टप्राप्ति व अनिष्टपरिहार व्हावा अशी इच्छा असते. तदनुसार ब्रह्मजिज्ञासा करावी—तें ब्रह्म म्हणजे ज्याचेपासून जगताच्या उत्पत्त्यादिक क्रिया होतात तें ब्रह्म—तोच विष्णु होय. त्याचे विषयींची जिज्ञासा शास्त्राभ्यासामुळें पूर्ण होते. शास्त्र या पदानें "सर्व वेद, भारत, पंचरात्र, मूलरामायण" याचा स्वीकार करावा. यांना अनुकूल असणाऱ्या इतर शास्त्रानांहि शास्त्र म्हणण्यास हरकत नाहीं व यांनाच प्रामाण्य आहे. इतर शास्त्रें जीं विरुद्ध आहेत तीं अप्रमाण होत. हीं विरुद्ध शास्त्रें अयोग्य जीवांस मोह निर्माण करण्याकरितां श्रीहरीच्या आज्ञेनें निर्माण केली आहेत.

[सृष्टिकर्तृत्वादिक हें श्रीहरीचेच आहेत हें शंका घेऊन सिद्ध करतात.]

वेद हें प्रमाण मानल्यावर वेदांमध्यें अनेक परस्परविरोधी वाक्यें आहेत. कांहीं ठिकाणीं आकाश हें जगत्कारण म्हणून म्हणतात तर लगेच श्रीविष्णु हे जगत्कारण आहेत असें सांगितलें आहे. एके ठिकाणीं पृथ्वी, स्वर्ग यांना रुद्र हें आधार आहेत असें म्हणतात तर लगेच श्रीहरीच्या आधारें सर्व जगत्, सूर्या, चंद्रमस् आहेत असें म्हणतात. तर अशा परस्परविरोधी तत्त्वें सांगणाऱ्या वेदांस प्रमाण कसें मानावें ?

याचें उत्तर देतातः—

वेदांत अशा तऱ्हेचा आपाततः विरोध भासला तरी तो विरोध नव्हे. पूर्वापर वाक्यांचा विचार केल्यास त्यांत एकवाक्यताच दिसून येईल. आकाश, रुद्र, अग्नि, वायु, जीव, अन्न वगैरे सर्व शब्द परममुख्य वृत्तीनें श्रीहरीचेच वाचक आहेत. त्यामुळें ज्या ज्या ठिकाणीं श्रीहरीच्या प्रसिद्ध नांवावाचून इतर नांवांनीं सृष्टिकर्तृत्व सांगितलें असेल तीं सर्व नांवें परमात्म्याचीच वाचक समजावींत. कारण ‘ सर्व नांवें ज्याची वाचक आहेत तो परब्रह्म विष्णुच होय ’ असें श्रुतिप्रमाण आहे.

जीव हे सृष्टिच्या पूर्वीं होतेच. जसा परमात्मा अनादि तसेंच जीवहि अनादिच आहेत. जीवांचा बाह्यदेहसंबंध श्रीहरीच्या इच्छेनें होतो. तीच जीवसृष्टी होय.

तर मग ही जीवसृष्टी स्वप्नवत् मिथ्या असेल ? अशी शंका आल्यास त्याचें उत्तर देतात:—

स्वप्नें मिथ्या नसून सत्यच आहेत. स्वप्नसृष्टी व स्वप्ननाश हीं सर्व श्रीहरीच्या इच्छेनेंच होतात. म्हणून स्वप्नसृष्टि सत्य आहे तद्वत् ही जीवसृष्टि सत्य आहे.

ही सृष्टि उत्पन्न करण्याचें प्रयोजन श्रीहरीस कांहींच नाहीं. पण आनंदानें अंतःकरण प्रसन्न झाल्यानंतर नृत्यगायनादिक जसें मनुष्याचे हातून सहज होतात तद्वत् ही सृष्टि कोणताहि हेतु न धरतां श्रीहरीनें उत्पन्न केली आहे.

## जीवाचें स्वरूप

जीव हा अणु असून तो परमात्म्याहून अत्यन्त भिन्न आहे. तो जीव हृदयांत असतो. ज्याप्रमाणें दीप लहान असला तरी आपल्या प्रकाशानें सर्व खोली व्यापतो तद्वत् जीव, अंशानें, गुणानें देहांत सर्वत्र व्यापून असतो. जीव हे सात्त्विक, राजसिक, तामसिक असे त्रिविध आहेत. अशा तऱ्हेच्या जीवांत मुक्तियोग्य सात्विक जीवांना ज्ञान, आनंद प्राप्त होतो. तमोयोग्य तामसिक जीवांना अज्ञान व दुःखाची प्राप्ती होते व नित्यसंसारी जीवांना मिश्रफल प्राप्त होतें.

जीव भगवंताचे अधीन आहेत तरी पण भगवंतानें किंचित् स्वातंत्र्य दिलेलें आहे. असें जर नसतें तर शास्त्रांचें प्रयोजनच राहिलें नसतें. प्रत्येक जीवाला त्याच्या कर्मानुसार वारंवार अनेक जन्म येतात व या जन्ममरणापासून मुक्तता होऊन त्याला मोक्ष प्राप्त व्हावयाचा असेल तर अपरोक्ष ज्ञान होऊन त्याचेवर परमात्म्याचा अनुग्रह झाला पाहिजे. श्रीहरीच्या अनुग्रहामुळें प्राप्त झालेल्या अपरोक्ष ज्ञानानें त्याचा महाप्रसाद होतो. परमात्म्याचा अनुग्रह नवविधात्मक भक्तीनें व तदंगभूत शमदमादिकांच्या आचरणानें होतो.

## कर्म

भक्तीनें जर परमात्म्याचा अनुग्रह होतो तर कर्माचें प्रयोजन काय ? ( या शंकेचें उत्तर देतातः–) सकाम व निष्काम असें कर्म द्विविध आहे. काम्य कर्म हें ऐहिक व आमुष्मिक असें नश्वर फल देतें. निष्काम कर्म जर अपरोक्ष ज्ञानाच्यापूर्वी घडत असेल तर तें ज्ञानसाधन होतें. अपरोक्षज्ञानानंतर जर तें घडलें तर मोक्षांत आनंदाभिवृद्धीला कारण होतें.

## वेदाधिकारी

त्रैवर्णिकांमध्यें जे विष्णुभक्त, गुरुभक्त व शमदमादि गुणांनीं संपन्न आहेत तेच वेदाधिकारी होत. कांहीं जीव स्वभावतःच योग्य आहेत. त्यांना भगवदपरोक्ष होतो. पण कांहीं जीव नित्य संसारी आहेत तर कांहीं जीव तमोयोग्य आहेत त्यांना भगवदपरोक्ष कदापि होत नाहीं. श्रवणमनन

आदि करणाऱ्या अयोग्य जीवांना भगवदपरोक्ष होत नाहीं. तमोयोग्य जीवांना नित्य नरकाची प्राप्ति होते. नित्यसंसारी जीवांना नित्य संसार प्राप्त होतो.

स्त्री शूद्रादिकांना वेदाधिकार नसला तरी भारतादि पुराणश्रवणाचे ठिकाणीं अधिकार असल्यामुळें पुराणश्रवणानें त्यांना ज्ञान प्राप्त होईल. स्त्रियांत देवऋष्यादि स्त्रियांना वेदाधिकार आहे. इतर स्त्रियांना मात्र शूद्राप्रमाणें वेदाधिकार नाहीं.

भगवदपरोक्षानें मोक्ष प्राप्त होतो. पण रामकृष्णादि अवतारकालीं अनेकांना भगवदपरोक्ष झालेहि असेल; पण त्यांना मोक्षप्राप्ति नाहीं. हृदयस्थ बिंबापरोक्षानेंच मोक्षप्राप्ति होते. भगवदपरोक्ष झाल्यानंतर दुष्कर्म घडल्यास मोक्षहानि होत नसून फक्त आनंदाचा ऱ्हास होतो. सत्कर्मानुष्ठानानें मोक्षफल उत्कटत्वानें प्राप्त होतें. म्हणून ज्ञानी ज्ञानोत्तरकालीं सत्कर्मानुष्ठान करीत असतात.

मोक्ष म्हणजे प्राकृतिकभूतबंधनिवृत्ति ( संसारापासून मुक्तता ) होय. मोक्ष प्राप्त झाल्यानंतर जीवांना त्यांच्या योग्यतेप्रमाणें आनंदप्राप्ति होत असते. अपरोक्षानंतर प्रारब्धकर्म नसेल तर तात्काल मोक्षप्राप्ति होते. ( यावर अशी शंका येईल कीं, प्रारब्ध कर्म असतांना अपरोक्ष कसें होईल ? )

अपरोक्षप्रतिबंधक कर्म शिल्लक असेल तर अपरोक्ष कदापि होणार नाहीं. अपरोक्षानंतर अप्रारब्ध योग्य कर्मांतील पुण्यकर्म आप्तेष्टांना जाईल व पापकर्म द्वेष्ट्यांना जाईल.

## लयमार्ग

कांहीं विशिष्ट देवता सोडून बाकीचे ज्ञानी देहपातानंतर अर्चिरादि मार्गानें अतिवाहिक नामक वायुलोकांस येतात. तेथून तटिल्लोक द्वारा वायुलोकांस येऊन ब्रह्मदेवासह विष्णुलोकांस जातात. देवता, शतऋषी, शतगंधर्व, शतराजे हे मात्र स्वोत्तम देहांत विलीन होऊन परंपरेनें उत्तमोत्तम द्वारेण विष्णुलोकांस प्राप्त होतात. विष्णुलोकांस प्राप्त झाल्यावर त्य ठिकाणीं श्रीहरीच्या आज्ञेनें आपआपल्या योग्यतेप्रमाणें सालोक्य, सारूप्य

सामीप्य, सायुज्य मुक्तीत येऊन तेथें स्वसंकल्पाप्रमाणें सृष्टयादिव्यतिरिक्त इतर कामांचा चिद्रूपेण किंवा शुद्ध सत्वात्मक देहानें उपभोग घेतात. या सर्वांना पुनरावृत्ति नाहीं.

मुख्य नरक सात असून त्यापैकीं दोन नित्य व पांच अनित्य आहेत. नित्य नरकांस तामिस्र व अंधतामिस्र अशीं नांवें असून रौरव, महारौरव, अग्नि, वैतरणी, कुंभिपाक अशीं पांच नांवें अनित्य नरकांची आहेत. याशिवाय अनेक अवांतर नरक आहेत.

## श्रीविष्णुचें लक्षण

श्रीहरी आनंदपूर्ण आहे, सर्वान्तर्यामी, सर्वब्रह्माण्डाला आधार, अदृश्य, प्राकृतरुपरहित, ज्ञानानंदाद्यात्मक, देहवान्, सर्वपालक, सृष्टिसंहारकर्ता, मुक्तांना प्राप्य, सर्वगत, सर्वशब्दवाच्य, चिंत्याचिंत्य अशा अनेक गुणांनीं युक्त असा आहे.

श्रीहरी अदृश्य असला तरी उपासकांना व्यक्त होतो. वेदांमध्यें परमात्मा हा अवाच्य, अज्ञेय म्हणून सांगितला आहे; याचा अर्थ साकल्यानें 'अवाच्य, अज्ञेय' असा घ्यावा.

मनुष्यानें श्रीहरीची उपासना सत्य, ज्ञान, आनंदादि गुणांनीं करावी. देवता त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें एककालीं जितक्या गुणांचे स्फुरण होईल तेवढ्या गुणांनीं उपासना करतात. ब्रह्मदेव सर्व वेदोक्त गुणांनीं उपासना करतात. सर्वांनीं श्रीहरी हा माझा स्वामी आहे या अनन्यभावानें उपासना करावी. अधिक गुणोपासनेनें अधिक फल मिळत जातें. मोक्ष प्राप्त झाल्यार मुक्त श्रीहरीची उपासना स्वेच्छेनें करीत असतात. मोक्षांतहि आनंदादि गुणतारतम्य आहे. मोक्षांतहि भेद असतो. मुक्त झालेले जीव कधींहि परत येत नाहींत. श्रीलक्ष्मी नित्यमुक्त असली तरी तीहि स्वेच्छेनें श्रीहरीची उपासना करते.

याप्रमाणें ब्रह्मसूत्रभाष्याचें तात्पर्य आहे. तें क्रमानें दिलें नसून विषयवार दिलें आहे.

आचार्यांनीं आपल्या भाष्यांत वेदांतील सर्व शाखांतील ऋचांचें प्रमाण म्हणून उतारे उद्धृत केले असल्यामुळें या भाष्याच्या पारायणानें सर्व

वेदांचें पारायण केल्याचें फल मिळतें असा माध्वांचा दृढविश्वास आहे. नारायणपंडितांनीं या भाष्याचें फल पुढीलप्रमाणें सांगितलें आहे.

महानंदतीर्थस्य ये भाष्यभावम् मनोवाग्भिरावर्तयंते स्वशक्त्या ।
सुराद्या नरांता मुकुंदप्रसादादिमं मोक्षमेने भजंते सदेति ।।

जयतीर्थ ऊर्फ टीकाचार्यांनीं या भाष्याचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे.

स्वान्तध्वान्तनिकृन्तने जितमहावैकर्तनाशुव्रजं
निर्दोषे जितचंद्रचंद्रिकमलं तापत्रयोन्मूलने ।
गांभीर्ये जितसिंधुराजमजितं भाष्यं.........

याप्रमाणें आचार्यांनीं रचलेल्या या भाष्याचे अनेकांनीं वर्णन केलें आहे.

## २ अणुभाष्य

अणुभाष्य हे भाष्याची संक्षिप्त आवृत्ति होय. श्रीमन्मध्वाचार्यांनीं आपल्या गुरुंना द्वादशीच्या दिवशीं भाष्यपारायणाची अडचण होऊं नये म्हणून हा अणुभाष्य ग्रंथ रचला आहे. याचे चार अध्याय असून प्रत्येक अध्यायांत आठ नऊ श्लोक आहेत. या अणुभाष्यांत सर्व भाष्यांचें सार आणलें असल्यामुळें या ग्रंथाचें पारायण करणाऱ्यांस संपूर्ण भाष्याचें पारायणफल मिळतें असा माध्वांचा विश्वास आहे. या अणुभाष्याविषयीं मध्वविजयकारांनीं म्हटलें आहे.

अनंतार्थः प्रकटिस्त्वतयाणौ भाष्यसंग्रहे ।
अहो आत्मपरिज्ञप्त्यै कृष्णेनेवाननांतरे ।। ८० ।।

ही उक्ती सार्थ असल्याचें तो ग्रंथ गुरुमुखांतून जाणून घेणाऱ्यांस कळेल.

## ३ न्यायविवरण

ब्रह्मसूत्रावरचा आचार्यांचा हा तिसरा ग्रंथ होय. ब्रह्मसूत्रांवरील अनुव्याख्यानांत ज्या गोष्टी, जे न्याय सांगितले आहेत त्यांचें विवरण या ग्रंथांत आचार्यांनीं केलें आहे. आचार्य या ग्रंथाच्या शेवटीं म्हणतातः—

न्यायामृतार्णवमिमवगाह्य विभाज्य च ।
संक्षेपविस्तराभ्याम् च चकार व्याकृतिं कृतिम् ॥
इत्यनंतमहान्यायमीमांसापारवारिधेः ।
उत्तारणात्यशक्त्यैव व्याकुलीकृतचेतसां ॥

[ अनंत अशा न्यायमीमांसा रूप समुद्रांतून तरून जाणें ज्यांना अशक्य आहे व त्यामुळें ज्यांचें अंतःकरण व्याकुळ झालें आहे त्यांचेसाठीं न्यायार्णव घुसळून त्यांतील अमृतरूपी तत्व संक्षेपानें व विस्तारानें सांगितलें आहे. ]

या ग्रंथाची २५५ श्लोकसंख्या आहे.न्यायविवरणांत अनुव्याख्यानांतील वादविवादाचे शास्त्रीय विषय सोडून प्रत्येक अधिकरणांत पूर्वपक्ष कोणता आहे व त्यावर सिद्धान्त काय आहे हें क्रमवार सांगितलें आहे.

उदाहरण प्रथमपादांतील घेऊं

१ जीव व ईश्वर यांत अभेद आहे. ते जीव स्वयंप्रकाशी असल्यामुळें जीवानें ब्रह्माची जिज्ञासा कशी करावयाची ?

२ ब्रह्मशब्द, जाति, जीव, ब्रह्मदेव व शब्दराशि इतक्यांचा वाचक आहे म्हणून ब्रह्म शब्दानें ' जीव ' असा अर्थ घ्यावा.

याचें उत्तर सिद्धान्तरूपानें सांगतात:—

१ जीव आणि ईश्वर यांच्यांमध्यें नित्य भेद आहे. कारण जीव हा अल्पगुणी व ईश्वर गुणपरिपूर्ण असल्यामुळें उभयतांत ऐक्य असणें शक्य नाहीं. म्हणून जीवानें ब्रह्मजिज्ञासा करावी.

२ ब्रह्मशब्दानें ' जीव ' असा अर्थ घेतां येत नाहीं. कारण वेदांमध्यें ' यतो वा इमानि ' इत्यादि श्रुतीच्या द्वारें ब्रह्माचे ' जगज्जन्मादि कर्तृत्व ' असें जें लक्षण सांगितलें आहे तें जीवाचे ठिकाणीं व इतरत्र लागू पडत नसल्यामुळें ब्रह्मशब्दानें ' जीव ' अगर इतर कोणीहि न घेतां ' परमात्मा ' असा अर्थ घ्यावा.

याप्रमाणें न्यायविवरणांत आचार्यांनीं अनुव्याख्यानाच्या प्रत्येक अधिकरणांत सांगितलेले पर्वपक्ष व सिद्धान्त हे क्रमवार सांगितले आहेत.

## ४ अनुव्याख्यान

आचार्याचा ब्रह्मसूत्रावरचा अत्यंत महत्वाचा ग्रंथ म्हणजे अनुव्याख्यान होय. या अनुव्याख्यानाचे ब्रह्मसूत्रभाष्याप्रमाणेंच अध्याय, पाद, अधिकरण असे विभाग आहेत; इतरांनीं ब्रह्मसूत्राचे जें अन्यथा अर्थ केले आहेत त्याचें खंडन केलें आहे. अगदीं प्रारंभींच शंकराचार्यांनीं मोठ्या अट्टाहासानें आपल्या शारीरिक भाष्यांत ज्या अध्यासाचा पुरस्कार केला आहे तो अध्यासवाद पूर्णपणें खंडिला आहे. या ग्रंथांत इतर कांहीं दर्शनकारांचें खडन केलें आहे; ग्रंथ प्रायः श्लोकबद्ध आहे. ग्रंथसंख्या सुमारें चार हजार आहे. सूत्रावर भाष्य असतांना हा स्वतंत्र ग्रंथ करण्याचे प्रयोजन प्रारंभींच आचार्यांनीं सांगितलें आहे.

स्वयंकृतापि तद्व्याख्या क्रियते स्पष्टतार्थतः ।

स्पष्टतार्थतः याचे विवेचन टीकाकारांनीं श्रीमन्न्यायसुधेंत केलेलें आहे.

**स्पष्टिकरणं चानेकविधं । कचिदनुक्तांशस्योक्तिः । कापि अतिसंक्षिप्तस्य विवरणं । कुत्राप्युक्तस्योपपादनं । कचिदपव्याख्याननिरासेन दृढीकरणम् ।**

( स्पष्टीकरण हें अनेक प्रकारचें आहे. कांहीं ठिकाणीं जें सांगितलें नसेल त्याचें प्रतिपादन, कांहीं संक्षिप्त असेल तर त्याचें विवरण, कांहीं ठिकाणीं सांगितलेलें जें त्याच्या दृढीकरणार्थ उपपादन, कांहीं ठिकाणी अपव्याख्यानाचें खंडन करून सिद्धान्ताचें दृढीकरण करणें. )

आचार्यांनीं या सर्व गोष्टी आपल्या अनुव्याख्यानांत केल्या आहेत. ब्रह्मसूत्रभाष्याप्रमाणें अनुव्याख्यानाचें तात्पर्य द्यावें म्हटलें तर तें कदापि शक्य होणार नाहीं. कारण अनुव्याख्यानांत इतर मतांचें खंडन केलें असल्यामुळें मूळ खंडनीय विषय लक्षांत आल्याशिवाय खंडनांतील सूक्ष्म विवेचन लक्षांत येणार नाहीं. म्हणून आचार्यांच्या दुसऱ्या ग्रंथाप्रमाणें अनुव्याख्यानाचें तात्पर्य देण्याचा विचार नाहीं. श्रीमन्मध्वाचार्यांनीं आपल्या अनुव्याख्यानग्रंथांत ' ब्रह्मतर्क ' ग्रंथासंबंधीं उल्लेख करून त्याची माहिती दिली आहे.

एतत्सर्वं तर्कशास्त्रे ब्रह्मतर्के हि विस्तरात् ।
उक्तं विद्यापृथक्त्वात्तु संक्षेपेणात्र सूचितम् ॥
प्रमाणन्यायसच्छिक्षा क्रियते तर्कशास्त्रा तः ॥
ब्रह्मतर्कं च भगवान् स एव कृतवान् प्रभुः ॥
पंचाशत्कोटिविस्तारान्नारायणतनौ कृतात् ॥
उद्धृत्य पंचसाहस्रं कृतवान् बादरायणः ।
अतस्तदर्थसंक्षेपादत इत्यभ्यसूचयन् ॥

याप्रमाणें आचार्यांनीं ब्रह्मतर्कासंबंधीं माहिती दिली आहे. मायावादाचें खंडन करतांना मायावादाला असंख्य दोष देऊन शेवटीं सांगितलें कीं,

तदसंख्यातदोषं तं हेयमेव शुभार्थिभिः ॥
असंख्यत्वेन दोषाणां ग्रंथाधिक्यभयादपि ॥

[ असंख्यात दोष या मायावादांस येत असल्यामुळें कल्याण व्हावें अशी इच्छा करणाऱ्यांनीं हें मायावादमत त्याज्य समजावें. यांस दोष असंख्य आहेत. ते सर्व यात्रे म्हटलें तर ग्रंथ वाढेल या भीतीनें आतां येथेंच थांबतों. ]

आचार्यांच्या ग्रंथांत परमताचें खंडन करणारा हा ग्रंथ आहे. प्रसंगानुसार इतर ग्रंथामध्येंहि परमताचें खंडन केलेलें आहे. हा ग्रंथ वादग्रंथांत मोडतो. यावर अनेक टीका, टिप्पणी आहेत. मुख्यतया अनुव्याख्यानावर न्यायसुधा नांवाचा अमूल्य टीकाग्रंथ आहे.

यानंतर अगोदर प्रकरणग्रंथाचा विचार करूं. श्रीमध्वाचार्यांनीं रचलेले दहा प्रकरणग्रंथ प्रसिद्ध आहेत. याशिवाय इतर द्वैती पंडितांनीं रचलेले प्रकरणात्मक ग्रंथहि अनेक आहेत. कोणत्याहि शास्त्राच्या अध्ययनाचें वेळीं अगोदर प्रकरणग्रंथांचा अभ्यास करावा लागतो. नंतर सिद्धान्तग्रंथ व त्यानंतर वादग्रंथ असा क्रम आहे. शास्त्रांत प्रकरणाचें लक्षण पुढीलप्रमाणें दिलेलें आहे.

शास्त्रैकदेशसंबद्धं शास्त्रकार्यान्तरे स्थितम् ।
आहुः प्रकरणं नाम ग्रंथभेदं विपश्चितः ॥

[शास्त्राच्या एका भागाशीं संबद्ध असून शास्त्रकार्यांत सहभागी असणारें त्यांस प्रकरण असें विद्वान् म्हणतात.]

या लक्षणाप्रमाणें विष्णुतत्त्वनिर्णयादि दश प्रकरणें द्वैतशास्त्राच्या एक एक अंगाचें प्रतिपादन करणारीं असून शास्त्रकार्यात सहभागी आहेत.

## विष्णुतत्त्वनिर्णय

विष्णुतत्वनिर्णयाचे तीन परिच्छेद असून ग्रंथ संख्या सुमारें साडेचारशें श्लोक आहे. या ग्रंथांत आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें आचार्यांनीं श्रुति, स्मृति, पुराण यांतील वचनें प्रमाणादाखल उद्धृत केलेलीं आहेत. त्याचें वर्गीकरण केल्यास अजमासें निरनिराळया बारा श्रुतिग्रंथांतील व निरनिराळ्या नऊ पुराणांतील वचनें आहेत.

## विष्णुतत्त्वनिर्णयाचा सारांश

अद्वैतवाद्यांनीं गृहीत धरलेल्या माया, उपाधि, विश्वमिथ्यात्व या मताचें खंडन "मायावादखंडन, उपाधिखंडन व प्रपंचमिथ्यात्वानुमानखंडन" या तीन ग्रंथानें केल्यावर श्रीहरीस अभिप्रेत असणारें तत्व कोणतें हें सांगणें ओघानेंच येतें. त्याप्रमाणें आचार्यांनीं या विष्णुतत्वनिर्णय ग्रंथांत हरीला अभिप्रेत तत्वाचें प्रतिप्रादन केलें आहे.

अगदीं प्राचीनकालापासून वैदिक व अवैदिक असे द्विविध सांप्रदाय चालू आहेत. अवैदिक सांप्रदायांत बौद्ध, चार्वाक, लोकायत इत्यादिकांचा अंतर्भाव होतो. शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य, निंबार्क इत्यादिकांचा वैदिक सांप्रदायांत समावेश होतो. वैदिक म्हणजे वेदास प्रमाण मानणारे व अवैदिक म्हणजे वेदास प्रमाण न मानणारे होत. विष्णुतत्वनिर्णयाच्या पहिल्या परिच्छेदांत हे जे अवैदिक सांप्रदाय आहेत त्यांचें खंडन करून "वेद हे अपौरुषेय आहेत, नित्य आहेत, त्यामुळें तेच मुख्यतया प्रमाण होत" हें निरनिराळीं श्रुतिस्मृतिवचनें देऊन सिद्ध केलें आहे. याप्रमाणें मुख्य वेद हे प्रमाण म्हणून मानल्यावर त्याला अविरोधी असणारे तेच सदागम होत व त्यांना वेदाच्या खालोखाल प्रामाण्य आहे.

निर्दोष प्रमाण म्हणून मानल्यावर त्याच वेदांत भेद, अभेद, भेदाभेद अशी परस्पर विरुद्ध असणारीं तत्वें सांगितलीं जाणार नाहींत. कांहीं तरी एकच तत्व प्रतिपादन केलें असलें पाहिजे. तेव्हां आगमाच्या जोडीला प्रत्यक्ष व अनुमान याच्या साहाय्यानें सर्वत्र द्वैत कसें आहे हें सांगितलें आहे. या भेदाचें विवरण करतांना "केवल जीव व परमेश्वर या उभयतांतच भेद नसून हा भेद १ ईश्वर व जीव २ जीव व जीव ३ जीव व जड ४ जड व ईश्वर ५ जड व जड असा पांच प्रकारचा आहे, हें त्यांनीं विस्तृतपणें दाखविलें आहे. त्यानंतर तत्वमस्यादि वाक्यें–जीं वाक्यें अभेदप्रतिपादक आहेत असें अद्वैतवादी म्हणतात–त्या श्रुतींचा वास्तविक अर्थ कोणता हें सांगितलें. हें सांगितल्यावर सर्व श्रुतींचें तात्पर्य श्रीहरीचें गुण वर्णन करणें हेंच असून या श्रुती व सदागम यांच्या द्वारें सर्व श्रेष्ठ असणाऱ्या श्रीहरीची प्राप्ति व त्याचें ज्ञान करून घ्यावें हें कंठरवानें सांगितलें आहे.

अतः सदागमैरेव सर्वस्मात् भिन्नत्वेन, सर्वस्मात् विशिष्टत्वेन च विज्ञेयो भगवान्नारायणः इति सिद्धम् ॥

[ म्हणून या सदागमानेंच सर्वांहून भिन्न असणारा, व सर्वांहून श्रेष्ठ असणारा असा भगवान् श्रीहरी आहे असें सिद्ध होतें. ]

याप्रमाणें प्रथम परिच्छेदांत सांगून द्वितीय परिच्छेदांत ब्रह्मादि देव व महालक्ष्मी यांचेपासून तो अगदीं तृणजीवापर्यंत तारतम्य सांगून या सर्वांपेक्षां श्रीहरी हे सर्वोत्तम आहेत हें सिद्ध केलें आहे व तें सिद्ध करतांना क्षर, अक्षर इत्यादि शब्दांचा अर्थहि सांगितला आहे. तृतीय परिच्छेदांत श्रीहरीचें निर्दोषत्व कथन करतांना अवताराचे वेळीं मानुषजन्माप्रमाणें कोणत्याहि रीतीनें त्यांना दोष नाहींत अगर चिंता, संताप, अज्ञान वगैरे दोष नाहींत हें श्रुति, स्मृति व पुराण यांच्या वचनाधारें सिद्ध करून ग्रंथपरिसमाप्ति केली आहे.

याप्रमाणें आचार्यांनीं रचलेल्या विष्णुतत्वनिर्णयाचा सारांश आहे.

## ६ तत्त्वोद्योत

तत्वोद्योत लहानसा ग्रंथ असून त्यांत प्रकरण वगैरे कांहीं नाहीं. या ग्रंथांत प्रथमतः अद्वैतवाद्यांनीं केलेले 'विश्वं मिथ्या' या अनुमानास

दृश्यत्वात् जडत्वात् परिच्छिन्नत्वात्' असें जे तीन हेतु दिलेले आहेत त्याचें पूर्णपणें खंडन केलें आहे. व पुढें नासदीय सूक्तावर ( नासदासीन्नो-सदासीत् ) शंकराचार्यांनीं रचलेल्या आपल्या भाष्यद्वारा हें सूक्त विश्व-मिथ्यात्वाचें बोधक आहे असें जें म्हटलें आहे तें सर्व श्रीमध्वाचार्यांनीं खंडिलें आहे. मध्यंतरीं प्रसंगानुरोधानें बौद्ध व मायावादी यांचें साम्य कसें आहे हें दाखविलें आहे.

न च शून्यवादिसकाशात् वैलक्षण्यं मायावादिनः ।
व्यावहारिकसत्यस्य तेनापि अंगीक्रियमाणत्वात् ॥
सत्यं तु द्विविधं प्रोक्तं सांवृतं पारमार्थिकम् ।
सांवृतं व्यावहार्यं स्यान्निवृत्तौ पारमार्थिकं ॥

[ शून्यवाद्यापेक्षां मायावाद्यांत कांहींहि वैलक्षण्य नाहीं. व्यावहारिक सत्य शून्यवाद्यानेंहि स्वीकारलें आहे. सत्य हे सांवृत व पारमार्थिक असें द्विविध आहे. सांवृत म्हणजे व्यावहारिक, अज्ञाननिवृत्तिनंतरचें पारमार्थिक सत्य होय. ]

या तत्वोद्योत प्रकरणांत विश्वमिथ्यात्वाचें नुसतें खंडन केलें नसून जगत्सत्यत्वहि प्रतिपादन केलें आहे. त्याकरितां श्रुतींचीं प्रमाणें भरपूर दिलेलीं आहेत.

## ७ तत्वसंख्यान व ८ तत्वविवेक

आचार्यांच्या सदतीस ग्रंथांमध्यें हे ग्रंथ दहा व अकरा या क्रमांकांचे आहेत. प्रकरणांत सहावे व सातवे आहेत. तत्वसंख्यान व तत्वविवेक हे दोन ग्रंथ एकाच विषयावरचे आहेत. तत्वसंख्यान हा ग्रंथ असतांनाहि तत्वविवेक हा ग्रथ कां रचला ? याविषयीं आपल्या टीका ग्रंथांत टीका-चार्यांनीं प्रारंभींच खुलासा केला आहे.

**ननु परमपुरुषादितत्वानां विवेकः शास्त्र एव कृतः। तत्किमनेन प्रकरणेन विक्षिप्तसंग्रहार्थमितिचेन्न । संग्रहस्यापि तत्वसंख्याने कृतत्वात्। सत्यं। तथापि तत्वसंख्यानोक्तेर्थे साक्षित्वेन भगवत्प्रणीतं तत्वविवेकगतान्याचार्यैः समुदाहृतानीत्यदोषः ॥**

[ परम पुरुषार्थरूप तत्वाचा विचार शास्त्रांत केला असतां हे तत्वविवेक प्रकरण रचण्याचा उद्देश काय? शास्त्रामध्यें अनेक ठिकाणीं तत्वाचा विचार केला असल्यानें त्याचें ज्ञान सुलभतया एकत्र जिज्ञासूंस व्हावें म्हणून हा ग्रंथ रचला आहे असें म्हणाल तर तेंहि बरोबर नाहीं. कारण हें कार्य तत्वसंख्यान नामक ग्रंथानें केलें आहे. मग याचें प्रयोजन काय? तुमचें म्हणणें बरोबर आहे तत्वसंख्यानांत जो विषय सांगितला आहे त्यांस साक्षित्वें करून तीं वाक्यें या ग्रंथांत घेतली आहेत. अतएव हा ग्रंथ आचार्यांनीं रचला आहे. ]

## या ग्रंथांतील विषयाचें स्वरूप

या दोन्ही ग्रंथांत तत्वाचा विचार केला आहे. पाश्चात्य तत्वज्ञ ज्यांस ( Categories ) म्हणतात तशाच प्रकारचा विचार यांत केला आहे. प्रारंभींच " स्वतंत्रमस्वतंत्रं च द्विविधं तत्वमिष्यते " अशा तऱ्हेनें द्विविध तत्वें आहेत असें सांगून स्वतंत्र तत्व म्हणजे परमात्मा असून अस्वतंत्र तत्व कोणतें याची फोड करून सांगितली आहे. " तत्व म्हणजे अनारोपित पदार्थ वस्तु " होय. भ्रांतिमूलक पदार्थास तत्व म्हणतां येत नाहीं. यथार्थ ज्ञानाला विषय असणाऱ्या पदार्थास तत्व म्हणतात अशी तत्वशब्दाची व्याख्या केली आहे.

यथार्थ ज्ञानाला विषय असणारे पदार्थ कित्येक दर्शनकार सोळा मानतात. वैशेषिकदर्शनकारांनीं मानलेला 'समवाय' हा पदार्थ मध्वाचार्यांना मान्य नाहीं. विशेषतः या ग्रंथांत अस्वतंत्रतत्व म्हणजे काय व त्याचे प्रकार किती हें स्पष्टतया सांगितलें आहे.

हे परतत्र तत्व श्रीहरीच्या अधीन आहे असें जाणणारा मुक्त होईल असें तत्वविवेक ग्रंथाच्या शेवटीं सांगितलें आहे.

> **य एतत् परतंत्रंच सर्वमेव हरेः सदा ।**
> **वशमित्येव जानाति संसारान्मुच्यते हि सः ॥**

## ९ कथालक्षण

**कथालक्षण या ग्रंथाचें थोडक्यात वर्णन करावयाचें झाल्यास "प्राचीन सभाशास्त्र" या शब्दानें करतां येईल. श्रीमध्वाचार्यांनीं प्रथम कथेचें लक्षण,**

सांगून वादाचे प्रकार सांगितले आहेत. यांत अध्यक्ष कसा असावा? प्राश्निक कसा असावा? वादाला प्रमाणभूत ग्रंथ कोणते व कसे असावेत? इत्यादि प्रश्नांचा विचार केला आहे व या ग्रंथाची मूल पीठिकाहि सांगितली आहे.

आनंदतीर्थमुनिना ब्रह्मतर्कानुसारतः ।
कथालक्षणमित्युक्तं प्रीत्यर्थं शार्ङ्गधन्वनः ॥

श्रीमदाचार्यांनीं आपल्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं ब्रह्मतर्काचा उल्लेख केला आहे. ब्रह्मतर्काविषयीं किंचित् माहिती आचार्यांनीं आपल्या अनुव्याख्यान ग्रंथांत दिली आहे.

## १०-११-१२ खंडनत्रय

श्रीमदाचार्यांनीं "मायावादखंडन, उपाधिखंडन व प्रपंचमिथ्यात्वानुमानखंडन" नांवाचे तीन प्रकरण ग्रंथ रचले आहेत. यालाच खंडनत्रय असें संक्षिप्त नांव आहे.

ब्रह्म हें एकच सत्य व तदितर सर्व मिथ्या आहे व जीव हा ब्रह्मच आहे असें अद्वैतवादी म्हणतात. यावर कोणी म्हणतील कीं, "दिसतें तें जग व त्यांतील मी तूं हा भेद, सुख दुःख वगैरे प्रत्यक्ष क्षणोक्षणीं दिसत असतां तें मिथ्या कसें म्हणावें?" असा आक्षेप आला असतां जगन्मिथ्यात्वाला शंकराचार्यांनीं अनुमानप्रमाण सांगितलें आहे.

१ जें दिसते तें मिथ्या होय.

मग दृश्य जगत् वास्तविक नाहींच तर! दिसतें तें काय अशी शंका आली असतां अद्वैतवाद्यांनीं त्यांस उत्तर दिलें :—

२ दिसतें तें सर्व मायाजाल आहे, आभास आहे, व सत्यज्ञानानंतर त्या मायाजालाचा, आभासाचा नाश होतो.

यावर शंका आली कीं ही माया, अज्ञान वगैरे कोठून आली? या शंकेचें निवारण करण्यासाठीं शंकराचार्यांनीं सांगितलें कीं :—

३ निर्गुण, निरंजन, परब्रह्माला उपाधि लागल्यामुळें तें जीवभावास प्राप्त झालें. व त्यामुळें जीव व ब्रह्म असा औपाधिक भेद उत्पन्न झाला. हा औपाधिकभेद उत्पन्न होतांच जीवांस अज्ञानानें पछाडलें.

शंकराचार्यांनीं मांडलेल्या या तीन मुद्यांच्या खंडनार्थ श्रीमध्वाचार्यांनीं १ प्रपंचमिथ्यात्वानुमानखंडन २ मायावादखंडन ३ उपाधिखंडन या तीन प्रकरण ग्रंथांची रचना केली आहे.

## १३ प्रमाणलक्षण

कोणताहि सिद्धान्त आपणांस प्रतिपादन करावयाचा असल्यास त्यासाठीं प्रमाणांची निश्चिती असावी लागते. त्याशिवाय तत्वसिद्धि करतां येत नाहीं. कदाचित् वादविवादांत प्रतिपक्षांकडून वाटेल त्या गोष्टी प्रमाण म्हणून पुढें आणल्या जातील ! यासाठीं प्रमाणें कोणतीं हें निश्चितपणें ठरलें पाहिजे. न्यायकोर्टांत जसा पुराव्याचा कायदा असतो त्याप्रमाणें हा प्रमाणलक्षण-ग्रंथ होय. श्रीमध्वाचार्यांनीं स्वतः अंगिकारलेल्या तत्वाच्या सिद्धीसाठीं प्रत्यक्ष, अनुमान, आगम हीं तीन प्रमाणें मानलीं आहेत. यांत प्रथमतः प्रमाण म्हणजे काय? याची व्याख्या करून नंतर त्रिविध प्रमाणांचीं लक्षणें व त्यांचे प्रकार सांगितले आहेत. शंकराचार्यांनीं या तीन प्रमाणा-शिवाय ‘ उपमान, अर्थापत्ति, अनुपलब्धि ’ अशीं तीन प्रमाणें जास्त मानलीं आहेत. त्यांचेंहि खंडन आचार्यांनीं सदर ग्रंथांत केलें आहे. उप-रोक्त शंकराचार्यांनीं मानलेल्या ‘ उपमान, अर्थापत्ति व अनुपलब्धि ’ यांचा समावेश प्रत्यक्ष, अनुमान, आगम यांतच होत असल्यामुळें त्यांस स्वतंत्र प्रमाण मानण्याची जरुरी नाहीं. या ग्रंथांत प्रमाणाचें लक्षण सांग-तांना नैय्यायिक, भाट्ट, प्राभाकर इत्यादि मतांचेंहि खंडन केलें आहे. या ग्रंथावरील प्रमुख टीकाकारांनीं ‘ अनुमान द्व्यवयवी, त्र्यवयवी असावें ’ या मताचें खंडन करून अनुमान पंचावयवी असावें हें सिद्ध केलें आहे. आचार्यांनीं या ग्रंथाला ब्रह्मतर्काचा आधार घेतला आहे. सामान्यतः प्रकरण ग्रंथांत याचें अगोदर अध्ययन केलें जातें.

## १४ कर्मनिर्णय

कर्मनिर्णय हें प्रकरण कांहीं ब्राह्मणखंडावरील भाष्यासारखें आहे. यांत महानाम्नी नामक ज्या ऋचा आहेत त्याचा अर्थ सांगितला आहे. वेदांतील सर्व शब्द श्रीहरीचेंच वाचक आहेत असें म्हटल्यावर कर्मपर

असऱ्या वेदांतील वाक्यांचा अर्थ काय ? असा प्रश्न साहजिकच उपस्थित होतो. याचें उत्तर या प्रकरण ग्रंथांत दिलें आहे. कर्मपर असणारीं वाक्येंहि श्रीविष्णुपरच कशीं आहेत हें सोपपत्तिक दाखविलें आहे.

याप्रमाणें आचार्यांनीं हीं दहा प्रकरणें रचलीं आहेत. आतां सिद्धान्त-ग्रंथाचा विचार करूं.

## १५-२४ दशोपनिषद् भाष्य (एकूण हे दहा ग्रंथ)

ईश, तलवकार, कठ, प्रश्न, मुंडक, मांडूक्य, ऐतरेय, तैत्तिरीय, छांदोग्य, बृहदारण्यक या दहा उपनिषदावर शंकराचार्याप्रमाणेंच मध्वाचार्यांचीं भाष्यें आहेत. शंकराचार्यांनीं आपल्या उपनिषद्भाष्यांत अनेक ठिकाणीं आपणांस अभिप्रेत अर्थ निवण्यासाठीं अध्याहृत पदें घेऊन अर्थ केला आहे. कांहीं ठिकाणीं अनुमानप्रमाणानें आपलें मत प्रतिपादन केलें आहे. मताचा ज्यावेळीं कमकुवतपणा असतो त्यावेळीं स्वमतसमर्थनार्थ आपाततः युक्तीचा अवलंब केला जातो.

श्रीमध्वाचार्यांनीं आपल्या मताच्या सिद्धिकरतां स्वतंत्रतया अनुमान-प्रमाण स्वीकारलें नसून प्रत्येक ठिकाणीं स्वतःकडे मोठेपणा न घेतां श्रीहरीचें अवतार समजल्या जाणाऱ्या वेदव्यासांनीं या उपनिषद्वाक्यांचा अर्थ काय केला आहे हें दाखविलें आहे. नंतरच वेदव्यासप्रणीत अर्थाचा सयुक्तिकपणा दाखविला आहे.

शंकराचार्यांनीं ईशावास्योपनिषदांतील "संभूति च विनाशं च" या वाक्याच्या अर्थाचे वेळीं, त्या ठिकाणीं वाक्याच्या प्रारंभीं निघत नसलेलें 'अ' हे अक्षर जास्त घेऊन त्याचा अर्थ केला.

'वाचारंभण विकारो' या श्रुत्यर्थाचें वेळीं 'मात्र' या पदाचा अध्याहार केला. 'तत्वमसि' या श्रुत्यर्थाचे वेळीं शंकराचार्यांना साहित्य-शास्त्रकारांनीं व इतरानीं न मानलेली 'जहदजहल्लक्षणा' नवीन तयार करावी लागली. 'ऐतदात्म्यमिदं सर्वं' या श्रुतीचा अर्थ करतांना त्यांनीं 'एव' या पदाचा अध्याहार केला आहे.

या सर्व गोष्टींचें खंडन मध्वाचार्यांनीं त्या त्या ठिकाणीं केलें आहे. या दशोपनिषद्भाष्याचें थोडक्यांत सार देणें शक्य नाहीं. दशोपनिषद् भाष्याचें

अध्ययन केलें असतां काय फल मिळतें हें मध्वविजयकारांनीं एकें ठिकाणीं सांगितलें आहे.

दशोपनिषदो देवी देवा इव समीप्सिताः ।
युक्ताः प्रसादयन्त्यर्था एषु भाष्यालयेष्वलम् ॥

या दशोपनिषद् भाष्याव्यतिरिक्त इतर द्वैती पंडितांनीं श्वेताश्वतर, नारायण, नृसिंहतापनी, कौषितकी, इत्यादि उपनिषदावर भाष्यें रचलीं आहेत.

शिवाय मांडूक्योपनिषदकारिका म्हणून ज्या प्रसिद्ध आहेत त्या कारिका अद्वैतवाद्यांनीं गौडपादकारिका म्हणून मानल्या आहेत. या मांडूक्योपनिषदांतील कारिकावर, श्रीमध्वाचार्यांनीं आपलें भाष्य रचलें आहे. अर्थात् कित्येक अद्वैती गौडपादकारिका श्रीमध्वाचार्यांनीं स्वीकारल्या म्हणून आनंद मानीत असतात. पण या कारिका उपनिषदांच्याच आहेत हें अनेकांनीं दाखविलें आहे.

## २५. ऋग्भाष्य

श्रीमदाचार्यांनीं ऋग्वेदांतील कांहीं सूत्रावर भाष्य करून वेदाचा अर्थ कसा करावा हें दाखविलें आहे. "सर्ववेदैकवेद्यत्व" जर श्रीहरीला आहे तर इंद्रसूक्त, वरुणसूक्त, अग्निसूक्त आदिसूक्तांतील देवतावाचक शब्दानें इंद्रादिदेवांची स्तुति कशी केली? याचें विवेचन आचार्यांनीं या भाष्यद्वारा केलें आहे. इंद्रादि शब्दहि श्रीविष्णुचेंच वाचक आहेत हें शब्दव्युत्पत्तीनें वेदवचनानें व पुराणवचनाधारें दाखविलें आहे. इतकेंच नव्हे तर प्रत्येक सूक्ताच्या ऋषि, छंद, देवता हि श्रीविष्णुच आहेत हें त्यांनीं दाखविलें आहे. आचार्य ऋग्भाष्यांत म्हणतातः--

मुनिस्तु सर्वविद्यानां भगवान् पुरुषोत्तमः ।
विशेषतश्च वेदानां यो ब्रह्माणमिति श्रुतिः ॥
ऋग्वेदादिकमस्यैव श्वसितं प्राह चापरा ।
वाचो बभूवुरुशतीर्हयग्रीवादिति स्फुटम् ॥

"यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं" "यस्य निश्वसितं वेदाः" इत्यादि ऋचा-वरून सर्व वेदांचे ऋषि मुख्यत्वें करून श्रीहरीच आहेत हें सांगून उपऋषि कोण व किती व त्यांचेमधील तारतम्य सांगितलें आहे. ऋषिप्रमाणें छंद, देवतांचेहि विवरण वरच्यासारखेंच केलें आहे. मुख्यतया ऋषि, छंद देवता हे सर्व श्रीहरीच आहेत आणि याच ज्ञानानें श्रीहरिप्रसाद होतो हें स्पष्टतया सांगितलें आहे.

ऋषिच्छन्दो दैवतानि ज्ञात्वार्थं चैव भक्तितः ।
स्वाध्यायेनैव मोक्षः स्याद्विरक्तस्य हरिस्मृतेः ॥

म्हणूनच मोक्षप्राप्तीसाठीं ऋषि, छंद, देवता यांचे सम्यक् ज्ञान झालें पाहिजे. वेदसंहितेंत अष्टक, अध्याय, वर्ग हें जें वर्गीकरण आहे त्याविषयीं आचार्य म्हणतात—

अनंतत्वात्तु वेदानां प्रायः कर्मानुसारतः ।
संक्षेपं कृतवान देवः शिष्याश्च तदनुज्ञया ॥
अष्टकाध्यायवर्गादि भेदं च कृतवान् प्रभुः ।
स्वाध्यायविश्रमार्थाय तस्मात्क्रमविपर्ययः ॥

आचार्यांनीं भाष्याच्या प्रारंभीं 'श्रीहरीच्या प्रीतिकरितां वेदाचा अर्थ सांगतों,' असें म्हटलें आहे.

'सर्वेश्वरं गुरुमजेशनुतं प्रणम्य वक्ष्यामि ऋगर्थमतितुष्टिकरं तदस्य' याप्रमाणें श्रीहरीप्रीतिकरतां अर्थ सांगतों असें म्हणून वेदाचा अर्थ कसा करावा? व त्याचें तात्पर्य काय आहे? हे कांहीं सूक्तावर भाष्य करून दाखविलें आहे. आचार्यांचे अगोदर ऋग्वेदावर कोणाचें भाष्य होते हें समजण्यास मार्ग नाहीं.

## २६ गीताभाष्य २७ गीतातात्पर्य

गीताभाष्य हा ग्रंथ आचार्यांनीं प्रथमतः रचला आहे. गीतेंतील दुसऱ्या अध्यायाच्या 'अशोच्यानन्वशोचस्त्वं' या श्लोकापासून भाष्य असून जरूर त्या ठिकाणींच अर्थप्रतिपादन केलें आहे. त्यामुळें आचार्यांचें हें भाष्य सकृद्दर्शनी त्रुटित वाटतें. हा त्रुटितपणा गीतातात्पर्य या

ग्रंथानें भरून काढला आहे. गीतातात्पर्य ग्रंथांत आचार्यांनीं प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभीं या अध्यायांत काय प्रतिपादन केलें आहे तें सांगून साधक बाधक विचारानें तात्पर्य सिद्ध केलें आहे. अलिकडील कर्मयोगवाद्यांनीं प्रतिपादन केलेल्या कर्मयोगाचें विवेचन करून ज्ञानोत्तर ज्ञानी मनुष्यानें कर्म केलें पाहिजे हें त्यांनीं दाखविलें आहे. गीतातात्पर्य ग्रंथांत आचार्य म्हणतातः—

'ज्ञानी च कर्माणि सदोदितानि कुर्यादकामः सततं भवेत्।
न सर्वकर्मणां त्यागः कस्यचिद्भवति क्वचित्।

[ज्ञानी मानवानें आपलें नियत कर्म निष्कामें करुन सतत केलें पाहिजे. सर्वकर्माचा त्याग कोणत्याहि वेळीं होत नाहीं.]

अशा तऱ्हेनें ज्ञान्यानें केव्हांहि कर्माचा त्याग करूं नये असें स्पष्ट सांगणारीं वचनें गीतातात्पर्य ग्रंथांत आहेत. तसेंच 'सर्वधर्मान् परित्यज्य' 'त्रैगुण्यविषया वेदा' इत्यादि श्लोकांचे अर्थ, तसेंच कर्म, योग, सांख्य निष्ठा, इत्यादि शब्दांचें अर्थ गीता व इतर पुराण यांच्या साहाय्यानें सांगितलें आहेत. प्रत्येक श्लोकांचे विवाद्य अर्थहि अति सयुक्तिकपणें दाखविलें आहेत. गीताभाष्य व गीतातात्पर्य या दोन ग्रंथाविषयीं नारायण पंडिताचार्य म्हणतात.

गीतातात्पर्यभाष्याभ्याम् आभ्याम् विश्वं प्रकाशते।
गोगणैरप्रतीकारैरर्केन्दुभ्यामिवाधिकम्॥

## २८ भागवततात्पर्यनिर्णय

आचार्यांनीं भागवतांवरील अनेक टीका पाहून त्यांतील प्रक्षिप्त भागहि पाहिला. त्यावेळीं त्यांनीं आपल्या संचारक्रमांत अनेक देशोदेशींच्या प्रती पाहून संशोधित प्रत तयार केली. व नंतरच प्रत्येक अध्यायांतील संशयास्पद विषयावर निःसंदिग्ध अर्थ प्रतिपादन करणारा आपला भागवततात्पर्य ग्रंथ रचला आहे. भागवततात्पर्यनिर्णय भागवतावरील टीकेसारखा आहे. भागवत वाचतानां ज्या विषयाचा नीट उलगडा होत नाहीं अशा विषयाचा भागवततात्पर्यनिर्णय वाचण्यानें उत्तम तऱ्हेनें उलगडा होतो.

प्रथम स्कंधांत अष्टादश पुराण व महाभारतासारखा सर्वोत्कृष्ट ग्रंथ रचणाऱ्या वेदव्यासांच्या मनांस असमाधान प्राप्त झालें अशी हकीकत आहे. वेदव्यास जर श्रीहरीचे अवतार आहेत तर त्यांना असमाधान कसें झालें? असमाधान वाटलें असें गृहीत धरलें तर परमात्म्याच्या अवतारांत अपूर्णत्व येईल. श्रीमदाचार्यांनी या शंकेचें निवारण सोपपत्तिक केलें आहे.

परमात्म्याच्या एकनिष्ठ भक्तांसहि मोक्ष व परमात्म्याच्या आत्यंतिक द्वेष्ट्यालाहि मोक्ष तेव्हां नानातऱ्हेचा त्रास सोसून परमात्म्याची भक्ति करण्यापेक्षां त्याचा द्वेष करणेंच योग्य होय असें वाटेल. म्हणून आचार्यांनीं मोक्ष, म्हणजे काय हें सांगून दैत्यांना कोणता मोक्ष मिळतो व भक्तांना कोणता मोक्ष मिळतो हें सविस्तर प्रसंगानुसार प्रतिपादन केलें आहे. अशा तऱ्हेचें अनेक विषयावरील आपले निर्णय पुराण व इतिहास यांच्या आधारें दिले आहेत. या ग्रंथाविषयीं मध्वविजयकार म्हणतात.

पुराणस्थानपांथानामभाषात्रयवेदिनाम् ।
भवता सुसखा चक्रे श्रीभागवतनिर्णयः ॥

वेदव्यासांनीं समाधि, गुह्य, दर्शनी या भाषांचा स्वीकार ग्रंथ रचनेत केला आहे. सामान्य जनतेला समाधि, गुह्य भाषा कळत नसल्यामुळें दर्शनी भाषेनें अर्थ केला असतां कित्येक वेळां विपरीत अर्थामुळें मनाचा गोंधळ उडतो. त्या कारणानें यथार्थ ज्ञान होत नाहीं. हें जाणून आचार्यांनीं या त्रिविध भाषांतून प्रतीत होणारा अर्थ विशद करून सांगितला आहे.

## २९ भारततात्पर्यनिर्णय

वेदभाष्यकारांत आचार्य जसें प्रथम आहेत तसेंच पुराणसंशोधक व पुराणार्थनिर्णायक म्हणूनहि आचार्यांनाच प्रमुख स्थान दिलें पाहिजे.

न पुराणादिमानत्वं विरुद्धार्थे श्रुतिर्भवेत् ।
पुराणस्योपजीव्यश्च वेद एव न चापरः ।
तद्विरोधे कथं मानं तत्तत्र च भविष्यति ।

पुराणानि पुराणार्थैर्विरुद्धत्वान्न तत्प्रमा ।
तद्विरुद्धेषु नो मानं पूर्वापरविरोधतः ॥

श्रीमध्वाचार्यांच्या अगोदर पुराणांचें यथार्थ स्वरुप कोणीहि दाखविलें नाहीं. श्रीमद्वेदव्यासांच्या पुराणांना अवमानणाऱ्यांस तुच्छ लेखून पुराणांचें वेदोपजीव्यत्व आचार्यांनीं सिद्ध केलें आहे. या पुराणसंशोधनाचें मूर्तफल म्हणजेच "भागवततात्पर्यनिर्णय व भारततात्पर्यनिर्णय" हे ग्रंथ होत. श्रीमदाचार्यांनीं ग्रंथाच्या प्रारंभींच म्हटले आहे.

क्वचिद् ग्रंथान् प्रक्षिपंति क्वचिदंतरितानपि।
कुर्युः क्वचिच्च व्यत्यासं प्रमादात् क्वचिदन्यथा ॥

अशा तऱ्हेची स्थिति थोड्या फार अंशानें भागवत, भारत व इतर पुराणें व पंचरात्रागम यांची झाली आहे. म्हणून स्वतः ग्रंथाचे संशोधन कसें केले आहे व कसें करावें याची दिशा त्यांनीं दाखवून दिली आहे.

देशे देशे तथा ग्रंथान् दृष्ट्वा चैव पृथग्विधान्।
यथाह भगवान् व्यासः साक्षान्नारायणः प्रभुः ॥
जगाद भारताद्येषु...........( भारततात्पर्यनिर्णय अ. २ श्लो. ७।८,

याप्रमाणें संशोधन करून भागवततात्पर्यनिर्णय व भारततात्पर्य निर्णय हें ग्रंथ त्यांनीं रचले आहेत.

भारततात्पर्यनिर्णय या ग्रंथाचे बत्तीस अध्याय आहेत. त्यांत पहिल्या तीन अध्यायांत सृष्टिक्रम व तारतम्य सांगून चवथ्या अध्यायापासून नऊ अध्याय अखेर रामचरित्र सांगितलें आहे. नंतर वेदव्यास चरित्र सांगून श्रीकृष्णचरित्र व पांडवाचें चरित्र संक्षेपानें सांगितलें आहे. हें सांगतांना युधिष्ठिराचा जन्म, दुर्योधन. भीम, अर्जुन, यांचे जन्म, यांच्या परस्परांच्या वयांतील अंतर, श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या वयांतील अंतर हे सर्व इतर पुराणांच्या आधारें व्यवस्थितपणें सांगितलें आहेत. याशिवाय पांडवांच्या अज्ञातवासकालाच्या समाप्तीविषयीं विचार केला असून तो आजच्या संशोधकांना मान्य होण्याजोगा आहे. ( पहाः—भारत ता. नि. अ. २३ श्लो. ५६–५७ ) या शिवाय बभ्रुवाहन व अर्जुन या उभयतांचें ज्या

ठिकाणीं युद्ध झाले त्या स्थानाचा निर्देश,(भारत ता.नि.अ.३० श्लोक १००) बुद्धावताराचा काल ( भारत तात्पर्य अ. ३२ श्लोक १३९ ) धर्मराजानें भारतीय युद्धानंतर किती दिवस राज्यकारभार केला याचा उल्लेख ( भा. ता. नि. अ. ३१ श्लोक ७७ ) इत्यादि इतर पुराणांच्या आधारावरून केलेले उल्लेख हें सर्व त्यांच्या संशोधकतेचेच द्योतक आहेत. हा भारत-तात्पर्यनिर्णय ग्रंथ दुसरी बदरिकाश्रमाची यात्रा झाल्यावर रचला असावा असें वाटतें. कारण आचार्य आपल्या ग्रंथाच्या शेवटीं म्हणतात :—

आनंदतीर्थाख्यमुनिः सुपूर्णप्रज्ञाभिधो ग्रंथमिमं चकार।
नारायणेनाभिहितो बदर्यां तस्यैव शिष्यो जगदेकभर्तुः ॥ १७० ॥
यस्तत्प्रसादादखिलांश्च वेदान् सपंचरात्रान् सरहस्यसंग्रहान्।
वेदेतिहासांश्च पुराणयुक्तान्यथावदन्या अपि सर्वविद्याः ॥ १७१॥
समस्तशास्त्रार्थविनिर्णयोयं विशेषतो भारतवर्त्मचारी।
ग्रंथः कृतोयं जगतां जनित्रं हरिं गुरुं प्रीणयतामुनैव ॥ १७२ ॥
व्यासाज्ञया भाष्यवरं विधाय पृथक् पृथक् चोपनिषत्सुभाष्यम्॥
कृत्वाखिलान्यं पुरुषोत्तमं च हरिं वदंतीति समर्थयित्वा ॥१७५ ॥

यावरून भारततात्पर्यनिर्णय हा ग्रंथ गीताभाष्य, ब्रह्मसूत्रभाष्य, उपनिषद्भाष्य वगैरे ग्रंथाची रचना झाल्यावर रचला असावा असें दिसतें. या भारततात्पर्यनिर्णय ग्रंथाविषयीं नारायणपंडिताचार्य म्हणतातः—

इतिहासपुराणाब्धेर्मवच्चित्ताद्रिलोडनात्।
जातां भारततात्पर्यसुधां कः सन्न सेवते ॥

## सदाचारस्मृति, कृष्णामृतमहार्णव, तंत्रसार

श्रीमदाचार्यांनीं हे तीन ग्रंथ आचाराविषयीं रचले आहेत. एकाच विषयावर हें ग्रंथ असले तरी उद्देश मात्र निराळा आहे.

## ३० तंत्रसार

तंत्रसार या ग्रंथाचे चार अध्याय असून निरनिराळ्या वृत्ताचे अजमासें ४२५ श्लोक आहेत. तंत्रसार या ग्रंथांत नित्यविधि कसें करावेत ? याचें

विवेचन केलें आहे. सध्यां माध्ववैष्णवांत जी आचारपद्धति चालू आहे ती या तंत्रसारोक्त पद्धतीनेंच होय. निरनिराळ्या मंत्रांचे न्यास, ध्यान वगैरे सर्व दिले आहेत. तत्वन्यास, मातृकान्यास, प्रतिमापूजा, पीठपूजा, आवरणपूजा, देवमंदिर कसें असावें? नित्यसंध्यावंदन, प्राणायाम व अष्टांग-योग, त्याचे प्रकार आणि तो करण्याची पद्धत वगैरे विषयाची सांगोपांग चर्चा केली आहे. या ग्रंथाविषयीं आचार्य म्हणतातः—

निर्दोषाखिलसंपूर्णगुणेन हरिणा स्वयम्।
ब्रह्मणे कथितं तंत्रसारादुत्धृत्य सादरम्॥
आनंदतीर्थमुनिना कृतोयं ग्रंथमंजसा।

नारायणपंडिताचार्य या तंत्रसाराविषयीं म्हणतात.

कस्तंत्रसारं संप्राप्य न स्यात्पर्याप्तवांछितः।
अमरैराश्रितच्छायं कल्पद्रुममिवोत्तमम्॥

## ३१ सदाचारस्मृति

सदाचारस्मृति या ग्रंथामध्यें अवघे ४०–४१ श्लोक आहेत. तंत्रसाराची संक्षिप्त आवृत्ति म्हणजे सदाचारस्मृति ( धर्मशास्त्र ) होय, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. यांत विशेषतः नित्यविधि कसे करावेत याविषयीं संक्षेपानें माहिती दिली आहे.

आनंदतीर्थमुनिना व्यासवाक्यसमुद्धृतिः।
सदाचारस्य विषये कृता संक्षेपतः शुभा॥

## ३२ कृष्णामृतमहार्णव

हा ग्रंथ सामान्यतः तीनशें श्लोकांचा आहे. यावर ताम्रपर्णी आचार्यांची एक टीका आहे. त्यांनीं या ग्रंथाचें २३५ श्लोक धरले आहेत. दुसरी टीका उमर्जी आचार्यांची असून त्यांनीं या ग्रंथाचे २७० श्लोक धरलें आहेत. आमचेकडे एक तालपत्रावरची पोथी आहे, त्यांत २९० श्लोक आहेत. या ग्रंथांत नित्यविधिशिवाय एकादशीचें व्रत कां करावें? उपोषणास एकादशी तिथी कशी असावी? शुद्धा, विद्धा, अतिरिक्ता, श्रवणोपवास, विष्णुपंचकव्रत याविषयीं विवेचन केलें असून

शेवटीं श्रीहरीसर्वोत्तमत्व प्रतिपादन केलें आहे. मोक्षसाधनांत असलेलें भक्तीचें श्रेष्ठत्व वर्णन करून श्रीहरीला सर्व कर्मे समर्पण कां करावें ? याचें विवेचन केलें आहे.

## ३३ द्वादशस्तोत्र

हें स्तोत्र बारा अध्यायाचें असून त्यांत अजमासे १७५ श्लोक आहेत. श्रीमध्वाचार्यांना श्रीकृष्णप्रतिमांचा लाभ झाला त्या दिवशीं हें स्तोत्र सहजस्फूर्तीनें रचलें आहे. माध्ववैष्णवांत नैवेद्य समर्पणाचे वेळीं हें स्तोत्र म्हणण्याचा परिपाठ आहे. या स्तोत्रपठनांत दृष्टिदोष व विष यांचा परिहार करण्याचें सामर्थ्य आहे. याविषयीं एक ऐतिहासिक कथा आहे. व स्तोत्रांत प्रमेयभागहि पुष्कळच आहे.

## ३४ यतिप्रणवकल्प

श्रीमदाचार्यांचें त्रिविध अनेक शिष्य होते. त्यांच्या उपयोगाकरितां हा ग्रंथ रचला असावा. यांत संन्यास घेतांना व घेतल्यावर काय करावें हें सांगितलें आहे. आचार्य या ग्रंथाच्या प्रारंभीं म्हणतात.

समिच्चर्वाज्यकान् हुत्वा......पुरुषसूक्ततः ।
सर्वेषामभयं दत्वा विरक्तः प्रव्रजेद्धरिः ।

या प्रमाणें वैराग्य निर्माण झाल्यावर शुद्ध भागवत आचार्यांची प्रार्थना करून संन्यास घ्यावा. व नंतर कोणत्या मंत्राचे जप करावेत, द्वैततत्त्वज्ञानावर सर्वस्वी श्रद्धा ठेवून संन्यासाश्रम कसा पाळावा ? हें स्पष्टतया या ग्रंथांत सांगितलें आहे. याचे श्लोक अवघे ३० आहेत.

## ३५ जयंतीनिर्णय

यांत एकादशी व्रताप्रमाणेंच श्रीकृष्णाष्टमी व्रत कां व कसें करावे ? तिथीवर हें व्रत करावें कीं, नक्षत्रावर हे व्रत करावे याचें विवेचन केलें आहे. त्या दिवशींचा समग्र पूजाविधि पण सांगितला आहे.

## ३६ यमकभारत

आचार्यांनीं पांडवांच्या चरित्रावर रचलेला काव्यग्रंथ आहे. याचें ९०

श्लोक आहेत. प्रत्येक श्लोकांत यमक साधला आहे. म्हणून यास 'यमक-भारत असें नांव पडलें आहे. आचार्य म्हणतात.

**कृष्णकथेयं यमिता सुखतीर्थेनोदिताऽनेनेयं यमिता ।**
**भक्तिमता परमेशे सर्वोद्रेकात्सदानुवताऽऽप रमेशे ॥**

या यमकभारतांत एकाक्षरी श्लोक आहे तो असा:—

" भा भा भा भा भा भा भा भा " असें " भा " अक्षराचें चार चरण आहेत. या यमकभारताविषयीं एका कवीनें म्हटलें आहे.

**सुरशिखामणि मध्वविनिर्मितं यमकभारतमेतदशेषतः ।**
**विवरितुं नहि शक्यमथापि तत्करुणया कृतिरीषदीयं मया ॥**

## ३७ नखस्तुति

त्रिविक्रमपंडिताचार्यांनीं रचलेल्या वायुस्तुतीस स्वतः श्रीमदाचार्यांनीं नरसिंहनखस्तुतिरूप मंगलाचरण म्हणून दोन श्लोक रचले आहेत.

येणेंप्रमाणें आचार्यांचे ग्रंथ आहेत. या ग्रंथांवरून आचार्यांच्या प्रतिभेची विशालता अजमावणें सामान्य मनुष्याच्या आटोक्याबाहेर आहे. आचार्यांनीं आपल्या सर्व ग्रंथांत निरनिराळ्या श्रुति, स्मृति, पुराण इतिहास ग्रंथांतील शेकडों वचनें प्रमाणादाखल उद्धृत केलीं आहेत. मानवाच्या आयुष्यांत इतके ग्रंथ एकवार पहाणेंहि अशक्य होय. मग संशोधन करून उतारे काढणें व त्याचा योग्य त्या ठिकाणीं उपयोग करणें हें सर्वस्वीं अशक्यप्राय होय. म्हणूनच आचार्यांना सर्व वैष्णवजन वायुदेवाचें अवतार मानतात तें योग्य होय.

**श्रीमदानंदतीर्थीयशास्त्रमाचंद्रतारकं ।**
**आसेतोराहिमाद्रेश्च समीचीनं प्रवर्ततां ॥**

**श्रीकृष्णार्पणमस्तु**

# तत्वज्ञान विभाग

## प्रकरण १ लें

## उपोद्घात

मनुष्यप्राणिमात्रालाच काय ? पण जगांतील यच्चावत् चेतन प्राणीमात्रांना दुःख अजिबात न होता नेहमीं सुख मिळावें अशी इच्छा असते. व त्यासाठीं त्यांचे नेहमीं प्रयत्न चालू असतात. आणि सुख कोणतें, दुःख कोणतें हें आपोआप चेतन प्राणिमात्रांना कळतें. मूल जन्मल्याबरोबर मातेचें स्तनपान करूं लागतें. त्याचें अंगावर उष्ण पाणी पडल्याबरोबर तें रडूं लागतें. मुंगी साखर खाते. पशूंचीं वांसरें आपल्या आईची ओळख ठेवतात. वृक्षानांहि सुखदुःखाच्या संवेदना होतात. या सर्व प्राणिमात्रांना सुखाची आवड असते व दुःख नकोसें होतें. आणि सुखासाठींच यच्चावत् प्राणिमात्राचें प्रयत्न चालू असतात. प्रत्येकाच्या सुखाच्या कल्पनाहि पण निराळ्या असतात.

एकाच व्यक्तीच्याहि सुखविषयक कल्पना निश्चित नसतात. वेळोवेळीं बदलत जाणाऱ्या सुखाच्या कल्पनेप्रमाणें तो प्रयत्न करीत असतो. या प्रयत्नाचें फल त्यांस मिळतेंच असें नाहीं. शास्त्रकारांनीं " अनुकूलवेदनीयं सुखं, प्रतिकूलवेदनीयं दुःखं" अशी सुखदुःखाची व्याख्या केली आहे. प्रत्येकांस मिळत असलेलें सुख अनित्य असतें. म्हणूनच त्यांस नित्य असें सुख मिळावें अशी इच्छा असतें. ही इच्छा फक्त मानवांतच आहे. यच्चावत् मानवेतर प्राण्यांकडे नजर टाकली असतां त्यांना वर्तमानकालावांचून इतर कालाचें ज्ञान नाममात्र असतें. फक्त मानवप्राणी मात्र भूतकालावरून भविष्यकालाविषयीं किंचित् ज्ञान मिळवूं शकतो. त्या गोष्टीस आवश्यक असणारी बुद्धि परमेश्वरानें त्यास दिलेली आहे. म्हणून तोंच सर्व प्राण्यांत श्रेष्ठ आहे. म्हणून 'बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठाः' असें भागवतांत म्हटलें आहे.

अशा तऱ्हेचा बुद्धिमान् मानव सुखासाठीं सतत प्रयत्न करूनहि अपेक्षित फल आपणांस मिळत नाहीं असें पाहातो. इतकेंच नव्हें, तर अनंतानंत अडचणी सुखदायक मार्गांत उपस्थित होतात त्यावेळीं असें कां व्हावें? याविषयी तो अंतर्मुख होऊन विचार करूं लागतो, तेव्हां त्याचेंसमोर अनेक प्रश्न येतात.

मी म्हणजे कोण? माझा व आजूबाजूच्या जगाचा संबंध काय? मी कोठून आलों? मी जाणार कोठें? मला जन्मास घालणारा कोण? या आजूबाजूच्या विश्वाचें कोण नियमन करतो?

[ किं कारणं ब्रह्म । कुतः स्म जाताः जीवामः । केन क्व च संप्रतिष्ठाः। अधिष्ठिताः केन सुखेतरेषु वर्तामहे । (श्वेताश्वतरोपनिषद्) ]

अशा तऱ्हेचे अनेक प्रश्न जरी प्रत्येकाच्या मनांत आले तरी त्या प्रश्नांचें उत्तर मिळविण्याचें सामर्थ्य मात्र त्याच्याजवळ नसतें. अशा तऱ्हेनें विचार करणाऱ्या लक्षावधि मानवी जीवांत एखादा महानुभाव कालांतरानें निघतो. व तो अनेकांच्या मनांत निर्माण झालेल्या प्रश्नांचें उत्तर आपल्या अमोघ, तेजस्वी व प्रासादिक वाणीनें देत असतो. त्यावेळीं सामान्य जनता त्याचे अनुयायित्व पत्करून त्याचें मागून जाण्यास सिद्ध असते. दुःखबाहुल्य असलेल्या या प्रपंचांत नानाविध दुःखानें त्रस्त झालेला मानवी जीव त्या महापुरुषानें दाखविलेल्या मार्गानें जाण्यास सिद्ध होतो.

आपल्या भरतखंडांत त्रस्त झालेल्या मानवी जीवांस मार्गदर्शन करणारे अनेक महानुभाव होऊन गेले आहेत. या सर्वांच्या विचारसरणींतून मुख्यतः दोन प्रवाह बाहेर पडले. त्यापैकीं एक आस्तिकवादी व दुसरा नास्तिकवादी समजला जाऊं लागला. एकाचें म्हणणें असें कीं, "या विश्वास कोणी तरी नियामक, उत्पादक आहे. त्यास परब्रह्म, परमात्मा, इत्यादि अनंत नावें आहेत. याचें कारण चंद्रसूर्यादि गोल नियमित कालांत, नियमित वेगानें मर्यादित स्थलांत, एकमेकांवर आक्रमण न करतां, आपआपल्या कक्षेंत, विश्रांति न घेतां संचार करीत असतात. निसर्गाकडे दृष्टि टाकली असतां वृक्ष, लता यांचें पुष्प, फल वगैरे सर्व नियमित ऋतूंत होतात.

अर्थात् या विश्वांतील भिन्न भिन्न पदार्थांच्या स्थित्यंतरावरून या अखिल-विश्वाची नियामकशक्ति एखादी असली पाहिजे." अशा रीतीनें या विश्वाच्या नियामक शक्तिचें अस्तित्व मानणाऱ्यांस आस्तिक अशी संज्ञा मिळाली.

या शक्तिचें अस्तित्व न मानणाऱ्यांस नास्तिक अशी संज्ञा प्राप्त झाली आहे. हे नास्तिकवादी प्रत्यक्ष प्रमाण मानणारे आहेत. जगाची नियामक शक्ति प्रत्यक्ष दिसत नसल्यामुळें या विश्वाचें नियमन कोणीहि करीत नसून आपोआप या घडामोडी होतात. अशा तऱ्हेनें नास्तिकांचे मत असलें तरी त्या मताचा प्रभाव जनतेवर फारसा पडला नाहीं. त्यामुळें "अतृणे पतितो वन्हिः स्वयमेवोपशाम्यति" या न्यायानें आपोआपच हें मत लुप्त झालें. या मताचा प्रणेता चार्वाक होय. या चार्वाकमताविषयीं आचार्य म्हणतातः—

चार्वाकैरुच्यते मानमक्षजं नापरं क्वचित्।
देह आत्मा पुमर्थश्च कामार्थाभ्याम् विना नहि ॥
यदेवं दर्शनेनास्य को ऽ र्थः प्रत्यक्षगोचरः।
स्वमतेनार्थरहितः उपेक्ष्यः पक्ष ईदृशः ॥
(अनुव्याख्यान २।२)

याचे उलट आस्तिक मतांत मात्र फारच वाढ झाली आहे. आजला आस्तिक दर्शनांत सहा मतें प्रचलित आहेत.

वेदप्रमाणकानीह प्रोचुर्ये दर्शनानि षट्।
न्यायवैशेषकादीनि स्मृतास्ते आस्तिकाभिधाः।

१ न्याय २ वैशेषिक ३ सांख्य ४ योग ५ पूर्वमीमांसा व ६ उत्तरमीमांसा अशीं हीं आस्तिक म्हणविलीं जाणारीं सहा दर्शनें होत. यापैकीं पहिल्या पांच दर्शनांचा शास्त्रीय भाषेंत जरी ग्रंथरूपानें पुष्कळ विचार झाला तरी त्या ग्रथित केलेल्या ज्ञानापासून सामान्य जनता दूरच राहिली. एकेकालीं

उत्तरमीमांसेचा खूप प्रसार झाला पण कालांतरानें अन्यथा ज्ञानाचा प्रसार या उत्तरमीमांसेच्या द्वारें होऊं लागल्यामुळें श्रीहरीनें बादरायण नामक अवतार घेऊन यथार्थज्ञानाचा प्रसार केला. तत्प्रीत्यर्थ त्यांनीं एका वेदाचे मुख्य चार विभाग करून शिवाय अनेक पोट विभाग केले. वेदार्थनिर्णायक अशीं ब्रह्मसूत्र रचलीं. ब्रह्म-सूत्रांच्या व वेदांच्या निर्णायक अर्थाकरितां पुराणें रचलीं. महाभारता-सारखा प्रचंड ग्रंथ रचला, कीं, ज्या ग्रंथाचें महत्व आजच्या कालांतहि कमी झालें नाहीं. या सर्वांस उत्तरमीमांसा—वेदांत अशी संज्ञा प्राप्त झाली. पुढें पुढें या उत्तरमीमांसेंतील श्रुति, ब्रह्मसूत्रें, गीता यांस अतिशय महत्व आलें. या तिघांच्या समुदायांस प्रस्थानत्रयी असें विशिष्ट नांव लाभलें. बादरायणोत्तरकालीन सर्व तत्ववेत्त्यांनीं आपआपल्या अभिप्रेत सिद्धान्ताची उभारणी या प्रस्थानत्रयीवरच केली आहे. या प्रस्थानत्रयीचा प्रभाव भारतीय जनतेवर इतका पडलेला आहे कीं, या प्रस्थानत्रयीला प्रमाण न मानतां रचलेलें कोणतेंहि तत्वज्ञान भारतीय तत्ववेत्त्यांत मान्यता मिळवूं शकलें नाहीं. म्हणूनच अनेकांनीं या प्रस्थानत्रयीवरच आपल्या तत्वज्ञानाची उभारणी केली आहे. बौद्धकालानंतर या प्रस्थानत्रयीवरच आपल्या सिद्धान्ताची मांडणी करणारे शंकराचार्य, रामानुजाचार्य, निंबार्क, मध्वाचार्य व वल्लभाचार्य असें पांच आचार्य होऊन गेले आहेत. या प्रस्थानत्रयीला आधार मानून परस्पर दोन विरुद्ध टोकांस असणाऱ्या तत्व-ज्ञानाची मांडणी शंकराचार्य व मध्वाचार्य या उभयतांनींच केली आहे. बाकीच्या तीन आचार्यांचा समावेश या दोघांतच होईल. या उभयता-पैकीं शंकराचार्य हे अद्वैतवादी व मध्वाचार्य हें द्वैतवादी होत. शंकराचार्य व मध्वाचार्य या उभयतांनीं आपल्या सिद्धान्तास प्रमाण म्हणून उपरोक्त प्रस्थानत्रयीच घेतली आहे. श्रीमध्वाचार्यांनीं या प्रस्थानत्रयीबरोबर प्रस्थानत्रयीस अनुकूल असणारी पुराण व पंचरात्र यानांहि प्रामाण्य दिलें आहे. कारण "इतिहासपुराणाभ्याम् वेदं समुपबृंहयेत्" या व्यासोक्ती-प्रमाणें वेदार्थ स्पष्ट करण्याकरितां पुराणें प्रकट झालीं आहेत. म्हणून प्रस्थानत्रयीस अनुकूल असणाऱ्या पुराणांस प्रामाण्य दिलें. व "पंच-रात्रस्य कृत्स्नस्य वक्ता नारायणः स्वयं" या वचनाप्रमाणें पंचरात्राचा

कर्ता साक्षात् नारायण आहे म्हणून त्यांसहि प्रमाण मानलें आहे. शंकराचार्यांनीं पुराणांस फारसें महत्व दिलें नाहीं व पंचरात्रागमांतील कित्येक तत्वांचें शंकराचार्यांनीं खंडनहि केलें आहे.

वास्तविक या प्रस्थानत्रयीस नुसतें प्रस्थानत्रयी असें नांव न देतां "**वैष्णव प्रस्थानत्रयी**" असें विशिष्ट नांव देणेंच युक्त होय. कारण या प्रस्थानत्रयीपैकीं 'गीता व ब्रह्मसूत्रें' हीं विष्णुचाच अवतार असणाऱ्या वेदव्यासांनीं रचलीं आहेत. त्यांत विष्णुसर्वोत्तमत्वच प्रतिपादन केलें आहे. वेद–श्रुति हे साक्षात् परब्रह्मशब्दवाच्य श्रीहरीचेंच निश्वास होत. त्या वेदांतहि श्रीविष्णुचेंच माहात्म्य वर्णन केलें आहे. वेदविहित कर्माचरणाचें फल देणारे श्रीविष्णुच होत. ज्याला मोक्ष म्हणतात तोहि विष्णुलोकच होय. [ तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यंति सूरयः] मोक्षदाता श्रीविष्णुच होय [ मोक्षदस्तु जनार्दनः ] वेदांतील सर्व नामें श्री विष्णुचीच वाचक ( नामानि सर्वाणि यमाविशंति तं वै विष्णुं परममुदाहरंति ) मोक्षसाधनांत श्रीविष्णुभक्तिच श्रेष्ठ आहे. [ मोक्षसाधनसामग्रया भक्तिरेव गरीयसी ]

ज्यावेळीं श्रीहरीच्या निश्वासभूत असणाऱ्या वेदविहित धर्माची ग्लानी होते त्यावेळीं त्याचा उद्धार करण्याकरितां अवतार घेणारे श्रीविष्णुच होत. यथार्थज्ञानाचा प्रसार करण्याकरितां अवतार घेणारे व्यास, कपिल, दत्तात्रय, महिदास हे सर्व परमात्म्याचे अवतार होत. ब्रह्मदेवास ज्ञानोपदेश करणारे श्रीविष्णुच होत. आगमापैकीं पंचरात्रागमाची रचना करणारे श्रीविष्णुच होत. पंचरात्रागमाचा उपदेश ज्यांना केला ते नारद महामुनि महाविष्णुभक्त होते. कलियुगांत ज्यांनीं या प्रस्थानत्रयप्रणीत तत्वज्ञानाचा उपदेश केला ते मध्वाचार्यहि श्रीविष्णुचें एकांतिक भक्त होत. या प्रमाणें सर्वत्र विष्णुच असल्यामुळें या प्रस्थानत्रयीस "**वैष्णव प्रस्थान**" असें नांव देणेंच श्रेयस्कर होय.

शंकराचार्य व मध्वाचार्य या उभयतांनीं आपआपलें तत्वज्ञान या प्रस्थानत्रयीवरच उभारलें आहे. त्यामुळें जिज्ञासूंच्या मनांत हें खरें कीं ते खरें' असा संशय निर्माण होणें संभवनीय आहे. एक द्वैत तरी प्रतिपादिले असेल अगर अद्वैत तरी असेल दोन्ही प्रतिपादन केलें

असणें शक्य नाहीं. शंकराचार्यांचे अगोदर द्वैततत्वज्ञानाचा ठसा भारतीयांच्या अंत:करणावर इतका स्पष्टपणें उमटला होता कीं, तो ठसा पुसून टाकणें कोणाहि तत्त्ववेत्त्यांस शक्य झाले नाहीं. बौद्धांनीं या द्वैतवादाचा पाडाव करण्याचा कांहींसा प्रयत्न केला व तो कांहीं काल यशस्वी झाला तरी शेंदोनशें वर्षांतच बौद्धवाद भरतखंडांतून कायमचा बाहेर काढला गेला. बौद्धांच्या उच्चाटनास ज्या अनेक गोष्टी कारणीभूत झाल्या त्यांत द्वैतवादाचा बौद्धांनीं केलेल्या खंडनाप्रमाणें या मुख्य वैष्णव प्रस्थान त्रयीस अप्रामाण्य दिलें गोष्ट प्रमुख आहे. याच प्रमुख कारणामुळें बौद्धधर्मीयांना भारतांत मुळींच स्थान उरले नाहीं. आणि म्हणूनच शंकराचार्यांनीं परिस्थितीचा सूक्ष्म विचार करून द्वैताद्वैताचा समन्वय करण्याचा प्रयत्न केला. आणि हा द्वैताद्वैताचा समन्वय करतांना वैदिक समजल्या जाणाऱ्या द्वैततत्वांस गौणत्व दिलें व अवैदिक अशा अद्वैतवादाला ( पर्यायानें बौद्धांच्या शून्यवादाला ) प्राधान्य दिलें. म्हणजे द्वैततत्वांस व त्याला उचलून धरणाऱ्या प्रस्थानत्रयीस व्यावहारिक सत्यत्व ( वस्तुतः मिथ्यात्व ) देऊन बौद्धांच्या शून्यवादांस—अद्वैतवादांस ( वस्तुत:शून्यवाद व अद्वैतवाद यांत शब्दावांचून कांहींच फरक नाहीं ) पारमार्थिक सत्यत्व दिलें आहे. बौद्धांचा शून्यवादच शंकराचार्यांनीं लोकापुढें निराळ्या शब्दांत मांडला आहे, हीं गोष्ट प्राचीन व अर्वाचीन भारतीय आणि पाश्चात्य तत्वज्ञानी लोकांनी स्पष्टतया मांडली आहे.

श्रीशंकराचार्य एका दिग्विजयप्रसंगीं एका देवालयांत जात असतां पुजाऱ्यांनीं दरवाज्यांतच अडवून विचारलें.

" **विज्ञानवादस्य च किं विभेदकं भवन्मताद्ब्रूहि ततः परं व्रज।**

( विद्यारण्यकृत शांकरदिग्विजय )

[ बौद्धाच्या शून्यवादांत व तुमच्या अद्वैतवादांत कोठें फरक आहे हें दाखवा व पुढें या ]

याप्रमाणें ब्रह्मसूत्रावर भाष्य लिहिणाऱ्या भास्करानें " **वैधर्म्याच्च न स्वप्नादिवत्** " ( २–२–२९ ) या सूत्रावरील भाष्यांत " **ये तु बौद्धमतावलंबिनो मायावादिनः तेप्यनेन न्यायेन सूत्रकारेणेव निरस्ता वेदितव्या** " असें म्हटलें आहे. विज्ञानभिक्षुनेंहि आपल्या सूत्रभाष्यांत

म्हटलें आहे.

"ये तु रज्जुसर्पादिवत प्रपंचस्यात्यन्ततुच्छत्वमिच्छंति ते बौद्ध-प्रभेदा एव। मायावादमसच्छास्त्रं प्रच्छन्नं बौद्धमुच्यते। इत्यादि पुराणवचनात्।"

[जे रज्जुसर्पाच्या दृष्टान्ताप्रमाणें सर्व प्रपंच अत्यंत तुच्छ (मिथ्या) आहे असें म्हणतात ते बौद्धप्रभेदच होत. कारण 'मायावाद हे असत् शास्त्र असून त्यांस प्रच्छन्न बौद्ध म्हणावें असें पुराणवचन आहे.]

शंकराचार्यांच्या मतप्रणालीविषयीं प्राचीनांची ही मतें आहेत, तद्वत् अर्वाचीन एस्. राधाकृष्णन्, डॉ. भांडारकर, डॉ. पेंडसे, सर बुईल्यम् जोन्स, जी. ई. मूर, डॉ. बुकहार्ट. चिंतामणराव वैद्य, इत्यादि पंडितांची मतें प्राचीनाप्रमाणेंच आहेत. विस्तारभयास्तव त्यांच्या ग्रंथातील उतारे दिले नाहींत.

शंकराचार्यांनीं प्रसृत केलेल्या मतप्रणालीस अद्वैतवाद म्हणण्यापेक्षां मायावाद म्हणणें जास्त सयुक्तिक होय.

रामानुजाचार्यांच्या मतप्रणालीस विशिष्टाद्वैत म्हणतात.

ब्रह्मैव सूक्ष्मचिदचिद्विशिष्टं कारणं श्रुतेः।
कार्यं च स्थूलचिदचिद्विशिष्टमिति निर्णयः।
विशिष्टाद्वैतमनयोरद्वैतं तद्विशिष्टयोः।

(वेदांत चिंतामणि प्रकरण ११)

[परब्रह्माचें चित् अचित् विशिष्ट सूक्ष्म शरीर कारण व चित् व अचित् विशिष्ट स्थूल शरीर हें कार्य म्हणून चित् अचित् विशिष्ट सूक्ष्म शरीराचें व चित् अचित् विशिष्ट स्थूल शरीराचें ऐक्य होतें म्हणून त्यांस विशिष्टाद्वैत म्हणतात.]

निंबार्क आचार्यांनीं मांडलेल्या सिद्धान्तास भेदाभेदवाद असें म्हणतात.

वल्लभाचार्यांनीं मांडलेल्या सिद्धान्तास शुद्धाद्वैत म्हणतात. "शुद्धाद्वैत" या पदाविषयीं "शुद्धाद्वैतमार्तंड" नामक ग्रंथांत म्हटलें आहे.

शुद्धाद्वैतपदे ज्ञेयः समासः कर्मधारयः ।
अद्वैतं शुद्धयोः प्राहुः षष्ठीतत्पुरुषं बुधाः ॥

[ 'शुद्धाद्वैत' या पदांत कर्मधारय अगर षष्ठीतत्पुरुष समास करावा ]

शुद्धयोः मायासंबंधरहितयोः जगद्ब्रह्मणोः अद्वैतं' ( वल्लभाचार्यकृत अणुभाष्य प्रस्तावना–पाठक ) मायोपाधिसंबंधरहित असें ब्रह्मच जगाला उपादान व निमित्तकारण असल्यामुळें व ब्रह्मच जगद्रूपानें परिणत होतें म्हणून यांस '**ब्रह्मवाद**' असें दुसरें नांव आहे.

श्रीमध्वाचार्यांच्या मताप्रमाणेंच श्रीकृष्णचैतन्यप्रभूंचेंहि मत आहे. या उभयतांचे मतांत फारच सूक्ष्म फरक आहे.

श्रीमध्वाचार्यांनीं प्रसृत केलेल्या सिद्धान्तास द्वैतसिद्धांत असें नांव आहे. त्याची व्युत्पत्ति खालीलप्रमाणें करतां येईल.

द्वाभ्याम्-स्वतंत्रास्वतंत्रतत्वाभ्याम् इतं युक्तं तत् द्वीतं, द्वीतमेव द्वैतम् ( स्वतंत्र व अस्वतंत्रतत्वांनीं युक्त ते द्वीत, द्वीत हेंच द्वैत ) श्रीमध्वाचार्यांनीं मुख्यतः स्वतंत्र तत्व परमात्मा श्रीहरी व अस्वतंत्र तत्व सर्वजीव, अशी दोन तत्वें मानली आहेत.

स्वतंत्रमस्वतंत्रं च द्विविधं तत्वमिष्यते ।
स्वतंत्रो भगवान् विष्णुः ...........

( तत्वसंख्यान )

यांत तत्व म्हणजे काय? हें सांगितलें आहे.

१ यथार्थज्ञानं प्रमा। तद्विषयः प्रमेयं २ तत्वमनारोपितम् ।

१ जें जसें आहे तसेंच जाणणें यांस प्रमा म्हणतात. उदाहरण–सोन्याला तें सोनें आहे असें जाणणें हे ज्ञान प्रमा होय. पितळ्यास सोनें असें जाणणें हें ज्ञान प्रमा नव्हे. प्रमेला–यथार्थज्ञानाला जो विषय असतो तें प्रमेय होय. हें सोनें आहे या ज्ञानाला विषय जें सोनें ते प्रमेय होय. या प्रमेयास तत्व म्हणतात. दुसऱ्या एकप्रकारें तत्वशब्दाचा अर्थ आहे.

तत्व म्हणजे आरोपित नव्हें तें. उदाहरण रुप्याचें ठिकाणीं रूप्यत्व हें आरोपित नसून तें सत्य आहे. म्हणून तें तत्व होय. शिंपल्याचें ठिकाणीं रुपें हे आरोपित आहे म्हणून त्यांस तत्व म्हणतां येत नाहीं.

याप्रमाणें आचार्यांनीं ही दोन तत्वें मानलीं आहेत. मुक्तस्थितींतहि या दोन स्वतंत्र व अस्वतंत्र तत्वांत ऐक्य होत नाहीं. म्हणून श्रीमध्वाचार्यांनीं प्रसृत केलेल्या तत्वज्ञानांस द्वैतसिद्धान्त म्हणतात. पण द्वैतसिद्धान्त या सदराखालीं येणाऱ्या तत्वज्ञानांत या दोन तत्वांचाच समावेश होत नसून आणखी कांहीं तत्वांचा समावेश केला जातो. तीं तत्वें कोणतीं हें एका श्लोकांत एका महानुभाव पंडितांनीं दाखविलें आहे. तो श्लोक असाः—

श्रीमन्मध्वमते हरिः परतरः सत्यं जगत्तत्त्वतो
भेदो जीवगणा हरेरनुचरा नीचोच्चभावं गताः ।
मुक्तिर्नैजसुखानुभूतिरमला भक्तिश्च तत्साधनं
ह्यक्षादित्रितयं प्रमाणमखिलाम्नायैकवेद्यो हरिः ॥

१ श्रीहरी सर्वोत्तम आहे, २ पारमार्थिक दृष्ट्या जगत् सत्य आहे. ३ ईश्वर व जीव यांत भेद असून तो अनादि व सत्य आहे, ४ जीव हे हरीचे सेवक आहेत, ५ जीवाजीवांत भेद असून तारतम्य आहे. ६ स्वस्वरूप योग्य सुखप्राप्ति होणें हाच मोक्ष होय, ७ मोक्षाचें साधन निर्मल भक्ती, ८ प्रत्यक्ष, अनुमान, आगम ही तत्वसिद्धिकरितां प्रमाण होत, ९ अखिलवेदप्रतिपाद्य श्रीहरी होत.

या प्रमाणें हीं नऊ तत्त्वें प्रमुख होत. विष्णुदासाचार्य नामक पंडितांनीं आपल्या वादरत्नावलि नामक ग्रंथात एका अनुष्टुप् श्लोकांत हीं तत्त्वें ग्रथित केलीं आहेत.

विश्वं सत्यं हरिः कर्ता जीवोन्यः परमार्थतः ।
वेदाः सत्यं प्रमाणं चेत्येवं व्यासमतस्थितिः ॥

अशा या नऊ तत्वांना द्वैतसिद्धान्त असें नांव आहे. यापैकीं प्रत्येक तत्वाचा प्रकरणवार विचार करणार आहे.

## प्रकरण २ रें

# विष्णुसर्वोत्तम



शाश्वत सुखाची प्राप्ति व्हावी एवढ्याकरितां चाललेल्या जगांतील मानवी व्यवहाराकडें दृष्टिक्षेप केला असतां सर्वत्र तरतमभाव असलेलाच आपणांस आढळेल. एकाच मातापित्याचीं मुलें, एकाच गुरूचे शिष्य, एकाच ठिकाणीं वास्तव्य केलेले भिन्न कालांतरानें श्रेष्ठकनिष्ठ स्थितीस येतात. यांत कित्येकजण आपल्या गुणामुळें, आपल्या हातीं असलेल्या सत्ते मुळें, आपल्या कृपाळुपणामुळें, आपल्या ऐश्वर्यानें, आपल्या ज्ञानानें, आपल्या सदाचरणानें, आपल्या पराक्रमामुळें व एतद्विरुद्ध गुणामुळें श्रेष्ठ-कनिष्ठ स्थितीस येतात. उपरोक्त कांहीं गुणामुळें मानव हा त्याच्यापेक्षां कनिष्ठ असलेल्यांचा नियामक होतो. या अखिल प्रपंचामध्यें एकाचा नियामक दुसरा, दुसऱ्याचा नियामक तिसरा अशी परंपरा अखंडपणें दिसते. दुसऱ्याचें नियामकत्व आल्यास किती तरी शक्ति एकत्रित करावी लागते. आपल्या लहानशा संसाराची जबाबदारी ( नियामकत्व ) आल्यावर आपणांस किती यातायात पडते? यावरून या प्रचंड विश्वाचें नियमन करणारा जो असेल त्याची शक्ति किती प्रचंड असेल याची कल्पनाहि होणार नाहीं. आपले नियमन करणारी अशी अदृश्य शक्ति नसती तर व आपण स्वतंत्र असतो तर आपल्या मनाप्रमाणें आपणांस इच्छित फलप्राप्ती झालीच असती. श्रीमन्मध्वाचार्य एकें ठिकाणीं म्हणतात—

**‘ यदि नाम न तस्य वशे सकलं कथमेव तु नित्यसुखं न भवेत् ’**

[ द्वादशस्तोत्र अध्याय ३ ]

[ जर आपण सर्व त्याच्या ( नियामक शक्तीच्या ) अधीन नाहीं, तर आपणांस नेहमीं सुख कां मिळत नाहीं ? ]

**या एकाच गोष्टीवरून सर्व जगाची नियामकशक्ती कोणती तरी आहे हें सिद्ध होतें.**

मानवी व्यवहारांत 'राजा' हा सर्वश्रेष्ठ नियामक म्हणून प्रत्यक्ष दृष्टीस पडतो, त्याप्रमाणें जगाच्या सर्वश्रेष्ठ शक्तीस या मानवी इंद्रियद्वारा पाहतां येत नाहीं म्हणून आपण अदृश्य अशा गोष्टीविषयीं आप्तवाक्य प्रमाण मानले पाहिजे. आप्तवाक्य म्हणजे श्रुति होत. याविषयीं आचार्य म्हणतात

न च केवलतर्केण नाक्षजेन च केनचित् ।
केवलागमविज्ञेयो भक्तैरेव न चान्यथा ॥' (विष्णु तत्वनिर्णय)

[भक्तांनीं केवल अनुमानानें, अगर प्रत्यक्ष प्रमाणानें त्यांस जाणण्याचा प्रयत्न करूं नये. तो (परमात्मा जगाचा नियामक) केवल आगमद्वारा जाणावा.]

घटपटादि पदार्थांचे ज्ञान प्रत्यक्ष प्रमाणानें होतें. अप्रत्यक्ष असणाऱ्या धूमानें दिसत नसणाऱ्या अग्नीचें ज्ञान अनुमानानें होईल. पण ईश्वर धर्म अधर्म, स्वर्ग, नरक इत्यादि अतीन्द्रिय पदार्थांच्या ज्ञानासाठीं शब्दप्रमाण मानावें लागतें. वैदिक तत्ववेत्ते शब्दप्रमाण म्हणून वेद, तदनुकूल स्मृति व पुराणें यांना मानतात या परंपरागत नियमाप्रमाणें या विश्वाची नियामक शक्ति कोणाची आहे याविषयीं वेदप्रामाण्य युक्त होय. श्रीमन्मध्वाचार्यांनीं आपल्या सर्व ग्रंथांत वेदप्रामाण्याबरोबर तदनुकुल स्मृति व पुराणें यांना प्रामाण्य दिलें आहे. कारण एकाच श्रुतीचा अर्थ निरनिराळ्या आचार्यांनीं परस्पर विरुद्ध केला आहे. अशावेळीं कोणाचा अर्थ बरोबर धरावा? म्हणून श्रीमध्वाचार्यांनीं स्वतःचा अर्थ न देतां ज्ञानकार्यासाठीं वेदव्यासरुपानें अवतीर्ण झालेल्या श्रीहरीनें स्वरचित पुराणें, पंचरात्र इत्यादि ग्रंथांत त्या श्रुतींचें अर्थ काय केले आहेत हें फक्त दाखवून दिलें आहे.

अखिल विश्वाच्या सर्वश्रेष्ठ नियामक शक्तिस श्रुतीनें परब्रह्म असें नांव दिलें आहे.

"यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवंति ॥
यत् प्रयन्त्यभिसंविशतीति । तद्विजिज्ञासस्व तत् ब्रह्मेति ॥"
(तैत्तिरीय ३-१-१)

[ज्याचे पासून ही सर्व भूतें उत्पन्न होतात, ज्याच्या योगानें जगतात, जो यांचा संहार करतो त्यास ब्रह्म असें जाण.]

ब्रह्मसूत्रकर्त्या वेदव्यासांनीं शाश्वतसुखाची प्राप्ति व्हावी एवढ्याकरितां ब्रह्मजिज्ञासा करावी असें सांगून जिज्ञास्य ब्रह्माचें लक्षण " जन्माद्यस्य यतः " या दुसऱ्या सूत्रानें सांगितलें. [ 'जन्माद्यस्य यतः' याचा अर्थ— ज्याचेपासून या जगाचे जन्मादिक होतात तें ब्रह्म होय. ] जन्मादिक यांतील आदिशब्दाचें स्पष्टीकरण पुराणवचनद्वारा आचार्य करतातः—

" १ सृष्टि, २ स्थिति (पालन), ३ संहार, ४ नियति, ५ ज्ञान ६ आवरण, ७ बंध व ८ मोक्ष हे देणारा एक श्रीहरीच होय "

( —स्कंदपुराण )

या अखिल विश्वाचें जन्माद्यष्टक करणारी शक्ति एकच असून त्यांस परब्रह्म असें म्हणतात हें अनेक ठिकाणीं श्रुतीनीं सांगितलें आहे. यारीतिनें श्रुति, सूत्र, पुराण यांची " जगाचें जन्माद्यष्टक करणारें तें परब्रह्म होय. " याविषयीं एकवाक्यता आहे. म्हणून जगाच्या नियामक शक्तींस परब्रह्म म्हणावें हें मान्य करण्यास प्रत्यवाय नाहीं. पण यानंतर " परब्रह्म" कोणास म्हणावें हा प्रश्न पुढें आला. त्यावेळीं अनेक देवतांची नांवें श्रुतिवचनद्वारा पुढें आलीं.

१ हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातःपतिरेक आसीत् [ उत्पन्न झालेल्या भूतांचा स्वामी प्रथम हिरण्यगर्भ—( ब्रह्मदेव ) एकटाच होता. ( ऋ. ८—७—३. ) ]

२ एको रुद्रो न द्वितीयो ऽवतस्थे [ एकटा रुद्र (महादेव) होता. अन्य कोणीहि नव्हता. ]

३ इन्द्रो यातो वसितस्य राजा ( ऋ. १—२—३८ )

४ सविता पश्चातात् सविता पुरस्तात् ( ऋ. ७-८—११ )

५ सोमःपवते जनिता मतीनां ( ऋ. ७—४—६ )

इत्यादि वाक्यें निरनिराळ्या देवतांचें श्रेष्ठत्व प्रतिपादन करीत असल्या-मुळें यानांच परब्रह्म कां म्हणू नये? अशी शंका आली असतां त्याचें उत्तर आचार्य ऋग्वेदवचनानेंच देतात.

ऋग्वेदांत अंभ्रणीसूक्त या नांवाचें एक सूक्त आहे. यालाच लक्ष्मी सूक्त असें दुसरें नांवहि आहे. या सूक्तांत लक्ष्मीदेवी म्हणते कीं,

" यं कामये तं तमुग्रं कृणोमि ।
तं ब्रह्माणं तमृषिं सुमेधां ।
अहं रुद्राय धनुरातनोमि । "

[ मला वाटेल त्यास मी उग्र ( रुद्र ) करते. वाटेल त्यांस ब्रह्मा पद देतें. मी रुद्रास धनुष्य देते. ]

या ऋचावरून ब्रह्मादि देवापेक्षां लक्ष्मीदेवीचें सामर्थ्य जास्त असल्या-मुळें त्यांचेपेक्षां लक्ष्मीदेवी श्रेष्ठ ठरते. तरीपण लक्ष्मीदेवी लगेंच पुढें म्हणते कीं, मी जरी या देवापेक्षां श्रेष्ठ असले तरी मला कारणीभूत असणारा एक निराळाच आहे. व तो समुद्रांत राहतो.

"**मम योनिरप्स्वा ३ न्तः समुद्रे**—मला कारणीभूत असणारा समुद्राच्या खोल पाण्यांत राहातो.

या वचनावरून लक्ष्मीदेवीपेक्षां श्रेष्ठ असणारा तो समुद्रांत राहतो. अर्थात् समुद्रवासित्व हें लक्षण श्रीविष्णुवांचून दुसरें ठिकाणीं नाहीं, म्हणून श्रीहरी हेंच सर्वोत्तम होत. " महोदधिशयोन्तकः " " समुद्रांत शयन कर-णारा " असें विष्णु सहस्रनामातहि असें नांव श्रीविष्णुस आहे. या सर्व प्रमाणांचा साधक बाधक विचार करून आचार्य म्हणतात.

अंतः समुद्रगं विश्वप्रसूतेः कारणं तु यत् ।
सूक्तोपनिषदाद्युक्त जन्माद्यस्येति लक्ष्यते ।

[ अनुव्याख्यान १–१–२ ]

[ जगाच्या उत्पत्यादिकांस जें कारण, सूक्तांत ( अंभ्रणी सूक्तांत ) उपनिषदांत ते अंतःसमुद्रगामि होय, असें " जन्माद्यस्ययतः " या सूत्रानें सांगितलें आहे. ]

मग इतर देवतांना श्रेष्ठत्व सांगणाऱ्या श्रुतिवचनांचीं काय वाट लावावयाचीं ? या शंकेस श्रुतिवचनद्वारां उत्तर देतात.

" **नामानि सर्वाणि यमाविशंति तं वै विष्णुं परममुदाहरंति ।** "

सर्वनामें ज्यांस वाचक आहेत त्यांस विष्णु म्हणतात, " **अग्निर्वै देवानामवमो विष्णुः परमः** " अग्नी हा सर्वांत कनिष्ठ आणि विष्णु हे सर्वांत श्रेष्ठ होत.

या सर्व श्रुति व तदनुकुल आगम यांतील वाक्यांचा विचार करून आपल्या भाष्यांत आचार्यांनीं श्लोकरुपानें सिद्धान्त सांगितला आहे.

अस्यैव सर्वनामानि व्यतिरिक्तस्य सर्वतः ।
यःस्वतंत्रःसदैवेकः स विष्णुः परमो मतः ॥
( विष्णुतत्वनिर्णय )

[ सर्वांपासून भिन्न असणारा, जो नेहमीं स्वतंत्र व श्रेष्ठ आहे तोच विष्णु होय. व त्यांचीच सर्व नांवें होत. ]

श्रुतींत ज्याचा परब्रह्म म्हणून उल्लेख आहे तो साक्षात् नारायणच होय. यालाच विष्णु म्हणतात. यालाच इंद्र, चंद्र, हिरण्यगर्भ, रुद्र इत्यादि अनंतानंत नांवें आहेत. या श्रुतिप्रमाणावरून आचार्यांनीं प्रसंगानुरोधानें सांगितलें कीं,

" ब्रह्मशब्दश्च विष्णावेव ( ब्रह्मसूत्र भा. १-१-११ )
" देशतः कालतश्चैव गुणतश्चापि पूर्तितः ।
विष्णौ ब्रह्मेति नामैतन्मुख्यतो ऽन्यत्र न क्वचित् ।
( ऐतरेयभाष्य )

देशतः कालतः गुणतः परिपूर्ण असणाऱ्या विष्णुचें ठिकाणीं मुख्य वृत्त्या ब्रह्मशब्द रुढ आहे इतरत्र नाहीं. याविषयीं आचार्यांनीं पंचरात्रांतर्गत बृहद्ब्रह्मसंहितेंतील व भागवतांतील वचनें उद्धृत केलीं आहेत.

"भगवान् वासुदेवेति परमात्मेति वै हरिः ।
विष्णुर्नारायणश्चेतिब्रह्मेति श्रुतयो जगुः ॥ "
( बृ. ब्र. सं. २-२-२९ )

परब्रह्म म्हणजे श्रीविष्णुच होत याविषयीं अनेक प्रमाणें आचार्यांनीं दिली आहेत. असा हा श्रीविष्णु सर्व जगाचा चालक सर्व-तंत्र-स्वतंत्र असून त्याच्याच उपासनेनें शाश्वतपद प्राप्त होतें ज्यांस मोक्ष अशी संज्ञा आहे.

ज्याप्रमाणें राष्ट्रांतील सर्व श्रेष्ठ सत्ताधारी शक्तीनें एकाद्यास जर उत्तम पद दिलें तर त्यांत कोणीहि अडचण आणूं शकत नाहीं तद्वत् श्रीहरीनें एकाद्यास जर उत्तम पद दिलें तर त्याचे विरुद्ध कोणी कांहीं करूं शकत नाहीं. म्हणूनच तो सर्वश्रेष्ठ ठरतो.

" त्याला जे ज्ञानी आपल्या अंतर्यामीं असलेला पाहतात त्यांसच शाश्वतसुख मिळतें. इतरांस नाहीं. " ( श्वेताश्वतरोपनिषद् )

या श्रीहरीच्या भीतिनें " वारा वाहतो, सूर्य उगवतो, आकाशांत याच्याच आज्ञेनें सूर्य चंद्र राहतात. " इत्यादि अनेक वचनें श्रीहरीच्या सर्वोत्तमत्वा विषयींचीं द्योतक आहेत. याच्या उपासनेनें आपणांस सर्व कांहीं प्राप्त होतें. विष्णुचें श्रेष्ठत्व वर्णन करणाऱ्या ऋचा वेदांत अनेक आहेत. त्यांपैकीं पुष्कळशा ऋचा आचार्यांनीं उद्धृत केलेल्या आहेत.

" हे विष्णो, तुझे गुण ( साकल्यानें ) कोण सांगू शकेल ? एखादेवेळेस पृथ्वीवरील धुळीचे कण कोणी तरी मोजूं शकेल" (विष्णुसूक्त २-२-२४.)

" हे विष्णो, मागें झालेल्या, पुढें होणाऱ्या वा सध्यां असलेल्यांपैकीं कोणासहि तुझा श्रेष्ठ महिमा प्राप्त झाला नाहीं. " (ऋग्. ५-६-२४.)

जो परमात्मा प्रकृति, पुरुष, काल यांस आधार आहे असा तो एकटाच पृथ्वी व सर्व भुवनें यांस धारण करितां झाला ( ऋ. २-३-२४

१ माझ्यापेक्षां, हे अर्जुना, दुसरें कोणी श्रेष्ठ नाहीं. ( भ. गी. ७।७ )
२ माझ्या अनुग्रहानें अव्यय व शाश्वतपद भक्ताला मिळते. (भ.गी.१८-५६
३ माझ्या स्थानास आल्यावर, दुःखाचें घर असणाऱ्या व अनित्य असणाऱ्या संसारांत, परमश्रेष्ठ सिद्धी मिळवलेले महात्मे परत जात नाहींत. ( भ. ८, १५ )
४ हे अर्जुना, ईश्वर सर्व प्राण्यांच्या हृदयांत साक्षिरूपानें वास्तव्य करतो व यंत्रारूढ सर्व भूतानां आपल्या इच्छाशक्तीनें फिरवितो ( ईश्वरः सर्व भूतानां ० —भगवद्गीता )

वरील प्रमाणावरून खाली दिलेला निष्कर्ष निघतो.

१ सर्व जगाला कारण परमात्मा आहे.

२ त्याचें गुण साकल्यानें कोणासहि मोजतां येणार नाहींत.

३ त्याच्यापेक्षां श्रेष्ठ कोणी नाहीं.

४ जगांतील यच्चावत् कार्यें त्याच्याच भयानें व प्रेरणेनें चालतात.

५ ज्ञानी त्याच्याच कृपेनें सर्वश्रेष्ठ पद मिळवितात.

६ तो परमात्मा सर्वान्तर्यामी व सर्वव्यापक आहे.

७ त्याला अनंतानंत नावें आहेत.

या विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत आलें असेलच कीं, सर्वव्यापित्व सर्वनियामकत्व, सर्वान्तर्यामित्व, सर्वाधारत्व, अगण्यगुणणोपेतत्व, जगदुत्पत्त्याद्यष्टकर्तृत्व इत्यादिकांमुळें श्रीहरी हेंच सर्वोत्तम होत यांत शंका नाहीं.

यावर कित्येक अशी शंका घेतील कीं, " या अखिल विश्वाला कारण जर तो परमात्मा आहे तर त्यालाहि आमच्यासारखेंच शरीर असेल. आम्हांस जसें या शरीराच्या योगानें निरनिराळीं दुःखें भोगावीं लागतात तद्वत् जगदुत्पत्त्यादि कर्में करणाऱ्या परमात्म्यालाहि दुःखें भोगावीं लागत असतील. मग आम्ही जसें दुःखी, तसाच परमात्माहि दुःखी तर मग आमच्यांत व परमात्म्यांत फरक तो काय राहिला ? जर त्यांस आमच्या प्रमाणें शरीर नाहीं असें म्हणाल तर तेंहि सयुक्तिक होणार नाहीं. कारण जें कार्य करावयाचें असते त्या कार्याचीं साधनें एकत्र करावीं लागतात. प्रयत्न पाहिजे. तीव्र इच्छा पाहिजे. व सर्व साधनें एकत्रित झाल्यावर कार्यनिष्पत्ति होते. त्यांत जे उपादान कारण असेल त्यावर संस्कार करावें लागतात. ज्याचे जवळ इच्छा नाहीं, कार्य करण्याचें साधन नाहीं, प्रयत्न नाहीं, त्याचें कार्यहि सिद्ध होणार नाहीं. हें सर्व असण्यास सुदृढ शरीराची आवश्यकता आहे. शरीरावांचून कोणीहि कार्य करूं शकणार नाहीं. मग परमात्म्याला शरीर नसेल तर त्याचे हातून जगदुत्पत्त्यादि कार्यें कशी होऊं शकतील ? म्हणून परमात्मा शरीरी असला पाहिजे. आणि शरीर असेल तर आमच्या सारखें चिंतासंतापादि दोष

असतीलच. मग त्यांस सर्वोत्तम कसें म्हणतां येईल ? ईशावास्योपनिषदावरील भाष्यटीकेंत टीकाचार्य या तऱ्हेची शंका घेऊन त्याचें उत्तर देतात.

१ यद्यशरीरो विष्णुः न तर्हि तस्य जगत्सर्जनाद्युपपद्यते। घटादिसृष्ट्यादौ शरीरान्वयव्यतिरेकानुविधानदर्शनात्।

२ अतः सत्यानाद्यनंतकालीनजगदुत्पत्त्यादिकारणस्य विष्णोः कथं अशरीरत्वं इत्यादिशंकापरिहारायोक्तस्य कविरित्यादेर्व्याख्यानं।

[ जर विष्णु हे अशरीरी असतील तर त्याचें जगदुत्पत्त्यादिकारणत्व जुळणार नाहीं. अशरीरी पुरुषाला घटादिक निर्माण करतां येत नाहींत. हा अन्वयव्यतिरेकी दृष्टांत आहे.

२ म्हणून सत्य, अनादि अनंत असणारें जगत् निर्माण करणाऱ्या श्रीहरीस शरीर नाहीं, या शंकेच्या निरसनार्थ पुढील भाष्य प्रवृत्त झालें आहे. ]

एवंभूतोपि सार्वज्ञात् कविरित्येव शब्द्यते।
सदानन्याश्रयत्वाच्च स्वयंभूः परिकीर्तितः॥
स सत्यं जगदेतादृङ् नित्यमेव प्रवाहतः।
अनाद्यनंतकालेषु प्रवाहैकप्रकारतः॥
नियमेनैव ससृजे भगवान्पुरुषोत्तमः॥

[ याप्रमाणें तो सर्वज्ञ असल्यामुळें तो कवि होय. सदा सर्वतंत्रस्वतंत्र असल्यामुळें त्यांस स्वयंभू म्हणतात. तो परमात्मा अनाद्यनंतकालीं प्रवाहतः नित्य व सत्य असणारें जग नियमेंकरून उत्पन्न करिता झाला. ]

त्या परमात्म्याला आमच्यासारखें पांचभौतिक शरीर व तज्जन्य दुःख आहे कीं नाहीं याविषयीं आचार्य म्हणतातः—"श्रीविष्णु हें ज्या अर्थी अनंतानंतगुणपरिपूर्ण आहेत, असें श्रुति म्हणते त्या अर्थी परमात्म्यांस शरीर हें असलें पाहिजे, हें निर्विवाद होय. पण त्या परमात्म्याचें शरीर इतर सर्व प्राण्यासारखें प्राकृतिक पंचमहाभूतात्मक नाहीं. त्यामुळें प्रकृतिजन्य चिंता, संताप आदि दोषहि त्यांस नाहींत. आचार्य म्हणतातः—

पंचभूतात्मकं देहो विष्णोः पश्यंत्ययोगिनः ।
तथा न योगिराद्धान्तो ज्ञानं देहो हरेरिति ॥

[ भागवत तात्पर्य निर्णय ]

अज्ञानी लोक विष्णुचा देह पंचभूतात्मक आहे असें समजतात. योगी तसें न समजतां श्रीहरीचा देह ज्ञानरूप आहे असें समजतात.

स्त्रीपुंमलाभियोगात्मा देहो विष्णोर्न जायते ।
किंतु निर्दोषचैतन्यसुखनित्यां स्वकां तनुम् ॥
क व्रणादि कचाज्ञानं स्वतंत्र्याचिन्त्यसद्गुणे ।
कुतो दुःखं स्वतंत्रस्य नित्यानंदैकरूपिणः ॥
आकेशादानखाग्रेभ्यः पूर्णचित्सुखशक्तिकं ।

त्या स्वतंत्र व अचिन्त्य सद्गुणी परमात्म्याचे ठिकाणीं अज्ञान, दुःख हें कोठून असणार ? सर्वतंत्रस्वतंत्र असणाऱ्या नित्य आनंदपरिपूर्ण असणाऱ्या परमात्म्यांस दुःख कोठून असणार !

वेदव्यासांनीं आपल्या ब्रह्मसूत्रांत 'आनंदमयोऽभ्यासात्' या सूत्रानें परमात्मा हा आनंदपरिपूर्ण आहे, असेंच सांगितलें आहे. श्रीमदाचार्यांनीं आपल्या ग्रंथांत ठिकठिकाणीं उपरोक्त सिद्धान्ताविषयीं भरपूर प्रमाणें दिलीं आहेत. याठिकाणीं विस्तारभयास्तव तीं सर्व प्रमाणें न देतां आचार्यांचें सिद्धान्त वाक्यच तेवढें दिलें आहे. या सिद्धान्तवाक्यावरून हें स्पष्टपणें कळतें कीं, परमात्मा श्रीहरी हा अनंतानंतगुणपरिपूर्ण व ज्ञानानंदपरिपूर्ण असल्यामुळें व त्याचा देह प्राकृतिक गुणांनीं युक्त नसल्यामुळें त्यांस चिंता, संताप आदि दोष नाहींत. त्या परमात्म्याचे अवतार अनंतानंत असले तरी त्याच्या अवतारांत मुळींच भेद नाहींत. म्हणूनच आचार्यांनीं 'स्वगतभेदविवर्जितात्मा' असें वर्णन केलें आहे.

## श्रीहरीचें लक्षण

नित्यपूर्णाखिलगुणो निर्दोषः सर्वदैव यः ।
यः स्वतंत्रः परो विष्णुः जन्ममृत्यादिवर्जितः ब्र. सू. भा.

जो नित्य, पूर्ण, अखिलगुणांनीं युक्त, नेहमीं निर्दोष,व सर्वतंत्रस्वतंत्र, जन्ममृत्यु इत्यादिकांनीं रहित आहे, ज्याच्या अधीन सर्व विश्व आहे, तोच सर्व श्रेष्ठविष्णु होय. त्या परमात्म्याचा देह,अवयवहि सत् चित् आनंदस्वरूपच आहेत. असा हा परमात्मा सृष्टि निर्माण करतो तें केवळ त्याची लीला होय. हें आचार्यांनीं 'लोकवत्तुलीलाकैवल्य' या ब्रह्मसूत्र व्याख्यानाचें वेळीं भाष्यांत व अनुव्याख्यानांत सप्रमाण दाखविलें आहे.

सदाप्तवृत्तिरीशस्य स्वभावादेव केवलं ।
अंगचेष्टा यथा पुंसः काश्चिदुद्देशवर्जिताः ।।
देवस्यैष स्वभावोयमित्याह श्रुतिरंजसा ।
इति केवललीलैव निर्णिता प्रभुणा स्वयम् ।।

अनुव्याख्यान २-१-१८१

अशा या परमात्म्याचें यथार्थज्ञान प्राप्त करून घेण्यानेंच आपणांस शाश्वत सुख मिळेल.

विष्णुं सर्वगुणैः पूर्णं ज्ञात्वा संसारवर्जितः ।
निर्दुःखानंदभुङ् नित्यं तत्समीपे स मोदते ।।

विष्णु हा सर्व गुणांनीं परिपूर्ण आहे या ज्ञानानेंच संसारातून मुक्त होऊन दुःखरहित होत्साता आनंदाच्या उपभोग घेत तो जीव वैकुंठांत राहतो.

या प्रमाणें द्वैतसिद्धान्तरीत्या श्रीहरिसर्वोत्तमत्व प्रतिपादन केल्यानंतर इतर आचार्य काय म्हणतात तें तुलने करितां पाहिलें पाहिजे.

श्रीमध्वाचार्यांप्रमाणेंच रामानुजाचार्य, वल्लभाचार्य, निंबार्क, चैतन्य वगैरे महानुभाव श्रीविष्णुसर्वोत्तमत्व मानतात. जगत्कारण म्हणून परब्रह्म श्रीविष्णूच मानतात.

**वासुदेवः परं ब्रह्म कल्याणगुणसंयुतः ॥**
**भुवनानामुपादानं कर्ता जीवनियामकः ॥** (सर्वदर्शन)

**चिदचिद्विशिष्टो ब्रह्मशब्दवाच्यो विष्णवाख्यो परःवासुदेवो नारायण एवैकं तत्वमिति विशिष्टाद्वैतवादिनां दर्शनमिति सिद्धम्॥**

[ मंगलमय अशा अनेक गुणांनीं युक्त असणारा, भुवनांचा उपादान कारण, जीवनियामक वासुदेवच परब्रह्म होय.

चित् अचित् विशिष्ट ब्रह्म शब्दानें वाच्य विष्णु नामक नारायण हेंच एक तत्व होय. ]

यावरून रामानुजाचार्यही जगत्कारण म्हणून विष्णुलाच परब्रह्म मानतात. याशिवाय ब्रह्म शब्दाची अतिशय स्पष्ट व्याख्या श्रीभाष्यांत केली आहे.

**" ब्रह्मशब्देन स्वभावतो निरस्तनिखिलदोषोऽनवधिकातिशया·संख्येयकल्याणगुणगण पुरुषोत्तमोऽभिधीयते** (श्रीभाष्य जिज्ञासाधि)

[ ब्रह्मशब्दानें स्वभावतः निर्दोष, अनंतानंत गुणांनीं युक्त असणारा पुरुषोत्तम सांगितला जातो. ]

वल्लभाचार्यहि श्रीकृष्णालाच परब्रह्म मानून ते सर्व गुणपरिपूर्ण असेंच मानतात.याविषयीं ते आपल्या अणुभाष्यांत म्हणतातः—

जानीत परमं तत्वं यशोदोत्संगलालितम् ।
तदन्यमिति ये प्राहुरासुरांस्तानहो बुधाः ॥५८॥

(वल्लभाचार्यविरचित अणुभाष्य ४–४–२२ )

वल्लभाचार्य सर्वगुणपरिपूर्ण ब्रह्मशब्दवाच्य श्रीकृष्ण असें मानीत असलें तरी तें परब्रह्म विरुद्धधर्मालाहि आश्रय आहे असें मानतात.

**अनंतमूर्ति तद् ब्रह्म कूटस्थं चलमेवच ।**
**विरुद्धसर्वधर्माणामाश्रयं युक्त्यगोचरम् ॥** ( तत्वदीप नि.)

विरुद्धधर्माश्रयत्व परब्रह्माचे ठिकाणीं वल्लभाचार्य मानतात याचें कारण हें असावें:—मायोपाधिरहित ब्रह्म जीवत्वांत स्वतः अविकृत राहून परिणाम पावतें असा त्यांचा सिद्धान्त असल्यामुळें, जीवांचे ठिकाणीं

चिंतासंतापादि दोष आढळतात याची वाट काय ? अशी शंका उपस्थित झाली असतां त्याचें उत्तर देण्याकरितां परब्रह्माचे ठिकाणीं विरुद्धधर्माश्रयत्व मानलें असावें.

निंबार्काचार्य परब्रह्मशब्दवाच्य श्रीकृष्णच असें मानतात. ते आपल्या ब्रह्मसूत्रावरील जन्माधिकरणभाष्यांत म्हणतातः—

**स्वभावतोपास्तसमस्तदोषमशेषकल्याणगुणैकराशिम् ।**
**व्यूहांगिनं ब्रह्मपरं वरेण्यं ध्यायेम कृष्णम् कमलेक्षणम् हरिम् ।**

या श्लोकानें परब्रह्माचें "अशेषदोषराहित्य, अनंतकल्याणगुणैकधाम कमलनेत्र श्रीहरी" असें स्वरुप आहे असें त्यांनीं सांगितलें आहे.

याप्रमाणें परमात्म्याच्या स्वरुपाविषयीं मध्वाचार्य, रामानुजाचार्य, निंबार्क व वल्लभाचार्य या चार आचार्यांची एकवाक्यता आहे. या सर्वांच्या विरुद्ध मत शंकराचार्य यांचें आहे. शंकराचार्यांचें ब्रह्माविषयीं काय मत आहे हें ध्यानांत येण्यासाठीं त्यांची तत्वप्रणाली अगोदर कळली पाहिजे. एका अद्वैती पंडितानें म्हटलें आहे कीं,

**श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः**
**ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरं ॥** (शुकानुशासन)

जे कोटि ग्रंथांनीं सांगितलें आहे तेंच अर्ध्या श्लोकानें सांगतों. "ब्रह्म एकच सत्य व तदितर जग मिथ्या, व जीव हा ब्रह्मच होय. ]

यावरून ब्रह्म हेंच एक सत्य असून तदितर वस्तु सर्व मिथ्या होत. व ब्रह्म हें निगुण, निर्विकार, निष्कल, निधर्मिक आहे. "समस्तविशेषरहितं निर्विकल्पमेव ब्रह्म प्रतिपत्तव्यं न तद्विपरीतं" असें अद्वैतवाद्यांनीं मानलें असून त्यासाठीं खालील श्रुति प्रमाण मानल्या आहेत.

**अस्थूलमनण्वमऱ्हस्वदीर्घ मलोहितमस्नेहमच्छायं**

(बृहदारण्य ३-४-४)

( ब्रह्म हें स्थूल नाहीं, अणु नाहीं, ऱ्हस्व नाहीं, दीर्घ नाहीं, रक्तवर्णीय नाहीं. ]

या श्रुतीनें ब्रह्म हें स्थूलत्वादि धर्मांनीं रहित आहे, असें सांगितल्या-मुळें ते निराकार आहे असें सिद्ध होते.

१ यत्तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णमचक्षुश्श्रोत्रं तदपाणिपादं नित्यं विभुं सर्वगतं ( मुंडक १-१-६.)

[ ब्रह्म हें दृश्यत्वादिधर्मविवर्जित, नित्य, सर्वगत, सूक्ष्म, अव्यय आणि पंचमहाभूतांचें कारण आहे. ]

या श्रुतीमध्यें " अचक्षुः अश्रोत्रं, तदपाणिपादं " वगैरे विशेषणें दिलीं असल्यामुळें ब्रह्म हें निरवयव आहे असें सिद्ध होते.

अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथारसं नित्यमगंधवच्च यत् ।
अनाद्यनन्तं महतःपरं ध्रुवं निचाय्य तं मृत्युमुखात् प्रमुच्यते ॥
( काठक १-३-१५ ).

[ ब्रह्म हें शब्द, स्पर्श, रस, गंध, रूप इत्यादि गुणांनीं रहित, नाशरहित, नित्य, अनादि, अंतरहित, महत्तत्त्वापेक्षां विलक्षण असें आहे; या प्रकारच्या ब्रह्मज्ञानानें मृत्युरूप संसारापासून ( जीव )मुक्त होतो ].

या श्रुतींत " अशब्द, अस्पर्श " इत्यादि शब्द आल्यामुळें परमात्मा निर्गुण, आहे हेंच श्रुतीला अभिप्रेत आहे.

" निर्गुणं गुणभोक्तृ च " या गीताश्लोकाचें तात्पर्यहि " ब्रह्म हें निर्गुण आहे " असें आहे. या वरील श्रुतीवरून ब्रम्ह हें निर्गुण निराकार निरवयव आहे असें शंकराचार्य सिद्ध करतात. सदर तत्वाच्या सिद्धिसाठीं या श्रुतीप्रमाणेंच ब्रह्मसूत्रांचा उपयोग केला आहे. त्यापैकीं फक्त एका सूत्राचाच याठिकाणीं विचार करणार आहे.

**'न स्थानतोऽपि परस्योभयलिंगं सर्वत्र हि'** (३-२-११ ब्र. सू.)

या वरील शंकराचार्यांच्या सूत्रभाष्याचें तात्पर्य खालीलप्रमाणें आहे.

'सर्वकर्मा, सर्वगंधः' इत्यादि श्रुति ब्रह्माला सर्व कामत्वादि धर्म सांगतात. 'अस्थूलमनणु' इत्यादि श्रुति ब्रह्मनिर्गुण आहे असें सांगतात. मग ब्रह्म हें उभयलिंग आहे असें समजावें कीं, अन्यतर लिंग आहे असें समजावें. जर अन्यतर लिंग असेल तर त्यापक्षीं तें सविशेष आहे कीं,

निर्विशेष आहे, याची मीमांसा केली जाते. तशा मीमांसेला प्रारंभ झाला असतां श्रुतीच्या अनुग्रहामुळें ब्रह्म हें उभयलिंग आहे असें प्राप्त होते, अशी शंका आल्यास त्याचें उत्तर देतात.

परब्रह्माचें स्वभावतःच उभयलिंगत्व उपपन्न होत नाहीं. कारण एकच वस्तु रूपविशेषादिकांनीं युक्त व तद्विपरीत अशी विरोधामुळें मानतां येत नाहीं. जर स्थानतः या पृथिव्यादि उपाधिसंबंधामुळें असूं दे म्हणाल तर तेंहि बरोबर नाहीं. कारणामुळेंहि एक प्रकारच्या वस्तूचा अन्य प्रकारचा स्वभाव संभवत नाहीं. उपाधिला अविद्याप्रत्युपस्थापितत्व असल्यामुळें त्याचें तत्कृत उभयलिंगत्वहि भ्रामकच आहे. म्हणून ब्रह्म हें एकप्रकारचें मानलें पाहिजे. तें ब्रह्म निर्विशेष ( सकल धर्मरहित ) आहे असेंच मानलें पाहिजे.

याप्रमाणें शंकराचार्य ब्रह्म हें निर्गुण, निराकार, निरवयव आहे हें सिद्ध करण्याकरितां कोणते आधार देतात हें दाखविलें आहे.

ज्या ठिकाणीं परब्रह्माचें साक्षात् गुणवर्णन असेल, त्या ठिकाणीं शंकराचार्य तें वर्णन सोपाधिक ब्रह्माचें आहे असें समजतात. कांहीं श्रुतींचा व ब्रह्मसूत्रांचा अर्थ लावतांना शंकराचार्य ब्रह्मामध्यें "सोपाधिक ब्रह्म व निरुपाधिक ब्रह्म" असा भेद करतात.

द्विरूपं हि ब्रह्म अवगम्यते। नामरूपविकारभेदोपाधिविशिष्टं तद्विपरीतं च सर्वोपाधिविवर्जितं।

इति चैवं सहस्रशो विद्याऽविद्याविषयभेदेन ब्रह्मणो द्विरुपतां दर्शयंति ॥ ( ब्रह्मसूत्र भाष्य १-१-१२ )

[ ब्रह्म हे द्विरुप आहे. एक नाम, रूप, विकार भेदोपाधिविशिष्ट ब्रह्म व ( दुसरें ) तद्विपरीत सर्वउपाधिरहित.

याप्रमाणें अनेक वेळां विद्या, अविद्या इत्यादि विषय भेदानें ब्रह्माचें द्विरूपत्व दाखवितात. ]

शांकरभाष्यांतील उपरोक्त उताऱ्यांवरून खालील गोष्टी सिद्ध होतात.

१ ब्रह्म, हें निर्गुण, निराकार, निरवयव, निर्धर्मिक आहे.

२ ज्या ठिकाणीं सगुणपर वर्णन असेल त्या ठिकाणचें वर्णन उपाधि-विशिष्ट ब्रह्माचें आहे असें समजावें. म्हणजे निर्गुण, निर्विकार परब्रह्माला जें सगुणत्व येतें तें केवळ उपाधिमुळें येते.

**मायावच्छिन्नं चैतन्यं परमेश्वरः। .........**

**स च परमेश्वरः एकोपि स्वोपाधिभूतमायानिष्ठसत्वरजस्तमो-गुणभेदेन ब्रह्माविष्णुमहेश्वराः इत्यादिशब्दवाच्यतां लभते ॥**

[ मायावच्छिन्न चैतन्य तो परमेश्वर होय. .........

तो परमेश्वर वस्तुतः एकच असला तरी त्याची उपाधि जी माया तिच्या ठिकाणीं राहणाऱ्या सत्व, रजस्, तमस् या गुणांच्या भेदानें ब्रह्मा, विष्णु व महेश्वर इत्यादि शब्दांच्या वाच्यतेला, प्राप्त होतो. ]

याप्रमाणें निर्विशेष ब्रह्म अगर निर्गुण, निर्विकार परब्रह्म व दुसरें मायावच्छिन्न ब्रह्म अगर सविशेष सगुण ब्रह्म असे भेद शंकराचार्य मानतात. त्यांत दुसऱ्या प्रकारचें मायारूप उपाधिच्या योगानें युक्त असल्या-मुळें व उपाधिनाशाबरोबर त्या सोपाधिक परब्रह्माचा नाश होत असल्यामुळें ते मिथ्या होय.

आतां हा जो सिद्धान्त शंकराचार्यांनीं मांडला आहे तो किती सयु-क्तिक आहे व तो सिद्धान्त प्रतिपादन करतांना श्रुति व ब्रह्मसूत्रें यांचा जो अर्थ केला आहे तो बरोबर नाहीं हें विचारांतीं कळून येईल.

कोणत्याहि वाक्यांचा अर्थ करतांना प्रकरणांतील पूर्वापार वाक्यांचाहि विचार करावा लागतो.

शंकराचार्यांनीं आधार घेतलेलीं वाक्यें बृहदारण्यकांत आहेत. या वाक्यांचा पूर्वापरसंबंध व इतर श्रुतींचा विरोध न येणें याचा विचार करून द्वैतवादी म्हणतात तसाच अर्थ करणें सयुक्तिक होय.

शंकराचार्यांनीं केलेल्या अर्थास मान्यता दिली तर इतर श्रुतींचा विरोध होतो.

'अस्थूलं' या बृहदारण्यकांतील श्रुतीचा शंकराचार्यांनीं केलेल्या अर्थावरून ब्रह्म हें निराकार असें ठरविलें तर 'अणोरणीयान् महतो महीयान्' या श्रुतिवाक्यांशीं विरोध येईल. म्हणून उपरोक्त वाक्यांचा अर्थ

'प्राकृतस्थौल्यरहित, प्राकृत अणुरहित' असाच करणें युक्त होईल म्हणून श्रीमदाचार्यांनीं 'अस्थूल' इत्यादि शब्दांचा अर्थ कसा करावा हें सांगितलें आहे.

प्रसिद्धस्थूलसूक्ष्मादि वैलक्षण्या जनार्दनः ।
अस्थूलादिरिति प्रोक्तो नैव स्थौल्याद्यभावतः ॥

[ जगप्रसिद्ध स्थूलत्व, अणुत्व यांच्यापेक्षां श्रीहरी हा विलक्षण असल्यामुळें 'अस्थूल' आदिशब्दांचा प्रयोग आहे. अप्राकृतिक स्थौल्याच्या अभावामुळें नव्हे ]

या प्रमाणें 'अणोरणीयान् महतो महीयान्' श्रुतींतील 'अणु व महत्' या शब्दांचा अर्थहि अप्राकृत अणु, महत् असा करावा म्हणजे श्रुतिविरोधपरिहार होईल. ऋग्वेदांतील पुरुषसूक्तांत अगर विष्णुसूक्तांत परमेश्वराचें साकार वर्णन केलें आहे तर त्या श्रुतीला विरुद्ध होऊन 'निराकार ब्रह्म' असें कसें म्हणतां येईल ?

आथर्वणोपनिषदांतील 'यत्तदद्रेश्यं' या श्रुतीनें ब्रह्म हे दृश्यत्वादि धर्मांनीं रहित आहे असें मानल्यास 'दृश्यते त्वग्रया बुद्ध्या' परात्परं पुरीषयं पुरुषमीक्षते' इत्यादि श्रुतींनीं ब्रह्म हें दृश्य आहे असें म्हटलें आहे. त्या श्रुतिवाक्याशीं विरोध येईल म्हणून तसा अर्थ करणें युक्त नव्हे. 'परमात्मा हा अदृश्य आहे, अग्राह्य आहे' तो अनधिकारी जीवांस होय. किंवा तो परमात्मा प्रत्यक्षानें अगर शुष्क तर्कानें, अगर जें पाशुपतादि दुरागम आहेत त्या योगें तो अदृश्य आहे. अग्राह्य आहे म्हणजे अज्ञेय आहे. असा अर्थ करणें युक्त होईल. पुराणांतरीं सुद्धां असे अनेक दाखले आहेत कीं, अशुद्ध मनानें अगर अनधिकारी जीवानें परमात्म्याची उपासना केली असतां त्या उपासनेनें त्या परमात्म्याचें ज्ञान त्यांस झालें नाहीं. किंवा पाशुपताद्यागमानेंहि परमात्म्याचें यथार्थ ज्ञान होत नाहीं. या सर्व गोष्टींचा विचार करून या श्रुतींचा अर्थ श्रीमध्वाचार्यांनीं आपल्या आथर्वण उपनिषदावरील भाष्यांत सांगितला आहे. आचार्य म्हणतातः—

वेदैश्च पंचरात्रैश्च भक्त्या यज्ञैस्तथैव च ।
दृश्योहं नान्यथा दृश्यो वर्षकोटिशतैरपि ( आथर्वणभाष्य )

असा अर्थ मान्य केला नाहीं तर तलवकारोपनिषद (केन) यांतील श्रुतीशीं विरोध येईल.कारण या उपनिषदांत ब्रह्म हें यक्षरूपानें दिसल्याची कथा आहे.

' अचक्षुः, अश्रोत्रं, तदपाणिपादं ' या सर्वांचा अर्थ प्राकृतिक डोळे, कान, हात, पाय, इत्यादिकांनीं रहित असाच केला पाहिजे. कारण पुरुष-सूक्तांत, वामनसूक्तांत त्या परब्रह्माच्या हात, पाय, डोळे इत्यादिकांचें वर्णन आलें आहे त्यावरून निरवयव म्हणजे प्राकृत अवयवांनीं रहित असाच अर्थ करणें युक्त होय. आचार्यांनीं श्रीहरीचें हस्तपादादि अवयव हे सच्चिदा-नंदात्मक आहेत, असेंच एके ठिकाणीं पुराणाच्या व श्रुतीवचनांच्या आधारें सांगितलें आहे.

सज्ज्ञानानंदशीर्षोसौ सज्ज्ञानानंदबाहुकः ।

या सर्व प्रमाणांवरून ब्रह्म हें निरवयव आहे हें सिद्ध करण्याकरितां श्रुतिवाक्यांचा शंकराचार्यांनीं जो अर्थ केला आहे तो उपयुक्त नव्हे, हें वाचकांच्या लक्षांत येईल.

यानंतर काठकश्रुतीच्या आधारें ब्रह्म हें निर्गुण आहे असें शंकराचार्य ठरवितात तें बरोबर नाहीं. त्यांस " निर्गुणं गुणभोक्तृश्च, साक्षी चेता केवलो निर्गुणश्च " इत्यादि गीतावाक्यें व " न स्थानतोपि परस्योभयलिंगं " इत्यादि ब्रह्मसूत्रें त्याचें निर्गुणत्व सांगतात हेंहि बरोबर नाहीं. कारण विष्णुसूक्तांतच म्हटलें आहे कीं, " हे विष्णो, एकादे वेळेस धुळीचे कण मोजतां येतील पण तुझ्या गुणांची संख्या मोजतां येणार नाहीं." या वाक्याचा विरोध येतो. याशिवाय अनेक गीतावाक्यें, पुराण, श्रुति असें म्हणतात कीं, पर-ब्रह्म हेंच जगाचें नियामक, सर्वाधार, सर्वभोक्ता, सर्वसेव्य, सर्वज्ञेयत्व, सर्वप्राप्यत्व, वगैरे गुणांनीं युक्त आहे मग परब्रह्मांस निर्गुण असें कसें म्हणतां येईल ? निर्गुण शब्दाचा अर्थ सत्वादि प्राकृतिक गुणानीं रहित असाच करणें युक्त होय. शंकराचार्यांनीं " निर्गुण गुण-भोक्तृ " इत्यादि ठिकाणीं निर्गुण शब्दाचा अर्थ " प्राकृतिक सत्वादि गुणांनीं रहित " असा केला आहे. तोच अर्थ कां घेऊं नये ?

"न स्थानतोऽपिपरस्योभयलिंगं" या सूत्रांत निर्विशेष ब्रह्म, सविशेष ब्रह्म इत्यादि बोधक वाक्यें नाहींतच. मग नसलेल्या शब्दांचा अर्थ कां करावा ?

याप्रमाणें ब्रह्म हें निर्धर्मिक, निरवयव, निराकार, निर्गुण आहे याविषयीं श्रुतिप्रमाण नाहीं. ब्रह्म हें द्विविध आहे याविषयीं श्रुतिप्रमाण नसल्यामुळें तसें मानतां येत नाहीं. याचे उलट "आनंदमयोऽभ्यासात्, जन्माद्यस्यतः" आदि सूत्रांनीं "द्वाविमौ पुरुषौ लोके" इत्यादि गीतावाक्यांनीं, सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म, आनंदं ब्रह्मणो विद्वान्, विष्णुसूक्त, पुरुषसूक्त व इतर श्रुतिवचनें यांनीं तो परमात्मा अनंतगुणपरिपूर्ण आहे असेंच सिद्ध होतें.

श्रुतींत ब्रह्माचें गुणवर्णन जेथें असेल तेथें मायोपाधिविशिष्टपरमेश्वराचें आहे असें जें शंकराचार्य म्हणतात त्यांस आधार कांहीं नाहीं. "सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म" इत्यादि वचनें स्वरूपलक्षण सांगतात व "यतो वा इमानि" या वचनानें ब्रह्माचें तटस्थ लक्षण सांगितलें जातें. या अद्वैतवाद्यांच्या म्हणण्यास त्यांच्या वाक्यांवाचून अन्यप्रमाण नाहीं, म्हणून प्रमाणविरुद्ध असें मत ग्राह्य कीं अग्राह्य याचा विचार जिज्ञासु वाचकांनीं करावा. निर्गुण निर्विकार परब्रह्माशीं मायेचा संबंध झाला म्हणजे सगुण ब्रह्म उत्पन्न होतें. अर्थात् तें उपाधिनिर्मित असल्यामुळें तें मिथ्या होय. या शंकराचार्यांच्या मताचें खंडन चवथ्या प्रकरणांत केलें आहे.

याप्रमाणें श्रुति व ब्रह्मसूत्रें यांचा विचार केल्यानंतर श्रीमद्भगवद्गीताहि विष्णुसर्वोत्तमत्व प्रतिपादन कशी करते तें पाहूं.

१ अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥

२ मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ॥

३ द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥
उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।
यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ।
यस्मात्क्षरमतीतोहमक्षरादपि चोत्तमः ।
अतोस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ।

४ न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन । ३-२२
५ मत्तः सर्वं प्रवर्तते । १०-८
६ अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः । १०-२
७ मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते च चराचरम् ।
८ मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥
९ सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यांति मामिकाम् । ९-७
१० ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन् सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ १८-११
११ तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
ददामि बुद्धियोगं तं ये च मामुपयांति ते ॥ १०-११
१२ मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरंति ते । ७-१४
१३ मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।
निर्वैरःसर्वभूतेषु यःस मामेति पांडव ॥ ११-५५
१४ मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ १८-५६
१५ वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यः ॥ १५-१५
१६ ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् ।

१ मी या अखिल जगाचा उत्पत्ति, विनाश कर्ता आहे.

२ हे अर्जुना, माझ्यापेक्षां श्रेष्ठ असें कांहीं नाहीं.

३ लोकांत क्षर, अक्षर असे दोन आहेत. क्षर म्हणजे सर्व भूतें, कूटस्थ अक्षर म्हणजे महालक्ष्मी होय. या दोहोपेक्षां श्रेष्ठ पुरुष हा निराळा असून त्यास परमात्मा म्हणतात. जो परमात्मा सकल ब्रह्मांडांत प्रविष्ट होऊन सर्वांचें पालन करतो तो ईश्वर, सर्वांचा स्वामी. ज्या अर्थी क्षर व अक्षर यांचेपेक्षां मी उत्तम आहे, म्हणून लोकांत व वेदामध्यें मी पुरुषोत्तम म्हणून प्रसिद्ध आहे.

४ या तिन्ही लोकांत मला कांहीं कर्तव्य नाहीं.

५ मी सर्व देव, महर्षि यांना आदि ( कारण ) आहे.

६ माझ्यापासून सर्व प्रवृत्त झालें आहे.

७ माझ्या अधिकारांत प्रकृति सर्व चराचर जगत् उत्पन्न करते.

८ माझे ठिकाणीं सर्व जगत् आश्रित आहे. मण्याचा समुदाय जसा दोरींत ओवलेला असतो तसें.

९ संपूर्ण प्राणी माझ्या स्वाधीन असणाऱ्या प्रकृतींत लय पावतात.

१० ईश्वर हा संपूर्ण भूतांच्या हृदयांत राहून आपल्या मायेनें यंत्रारुढा-प्रमाणें सर्व भूतांना ( जन्म मरणाच्या ) फेऱ्यांतून फिरवतो.

११ प्रीतिपूर्वक जे माझी उपासना करतात ते माझ्यापाशीं येतात.

१२ माझ्याजवळ जे प्राप्त होतात तेच ही माया तरतात.

१३ माझ्या प्रीत्यर्थ कर्म करणारा माझा भक्त संगरहित होऊन माझ्या ठिकाणीं प्राप्त होतो.

१४ माझ्या प्रसादानें शाश्वत पद प्राप्त होतें.

१५ सर्व वेदांनीं मीच जाणला जातों.

१६ ऋषींनीं नाना तऱ्हेच्या ऋचांनीं माझें गायन केलें आहे.

वरील प्रमाणांवरून परब्रह्मशब्दवाच्य श्रीहरी हा आनंदपरिपूर्ण, स्वतंत्र, सर्वज्ञ, जगदुत्पत्याद्यष्टकर्ता, सर्वव्यापी, वेदैकवेद्य भक्ताभीष्टदाता, सर्वोत्तम, मुक्तिदाता इत्यादि अनेक गुणांनीं परिपूर्ण आहे. या सर्व श्लोकांवर भाष्य लिहितांना आचार्यांनीं याचें विशेष स्पष्टीकरण केलें आहे. या शिवाय स्वतंत्रतया पांचरात्राची प्रमाणें पुष्कळशीं देतां येतील, पण आचार्यांनीं दिलेल्या प्रमाणांशिवाय अन्य प्रमाण देण्याचा विचार नसल्यामुळें इतर प्रमाणें दिलीं नाहींत.

हा परमात्मा स्वर, वर्ण यापासून प्रारंभ करून यच्चावत् शब्दांनीं मुख्यवृत्त्या वाच्य असल्यामुळें त्या श्रीहरीला अनंतानंत नांवें आहेत. त्याचे अनंत अवतार आहेत.

**अवतार:**—परमात्म्याचे मूलरूप म्हणजे प्रलयकालीं असणारें रूप होय. या मूलरूपांतच अवतार रुपांचा अंतर्भाव होतो. पुन्हां तेच अवतार त्या त्या वेळीं प्रादुर्भूत होतात. आणि ज्या ज्या वेळीं धर्मग्लानि होते व अधर्माची वाढ होऊन दैत्य प्रबल होतात, पृथ्वी त्यांच्या भारानें त्रस्त होते, त्यावेळीं धर्मग्लानि नाहीशीं करण्यांकरितां व आपल्या भक्तांचें अभीष्ट

परिपूर्ण करण्याकरितां हे अवतार प्रगट होतात व कार्यसमाप्तिनंतर ते अवतार मूलरूपांत ऐक्य पावतात.

**बिंबरूप:**—प्रत्येक प्राणीमात्राचें अंतर्नियामक होय. या बिंबरूपास प्रलयकालींसुद्धां मूलरूपांशीं ऐक्य नाहीं.

**आवेशः**—श्रीहरीकडूनच होणारे असें एकादें कर्म जर एकाद्या जीवाच्या हातून झालें तर त्या जीवाचे ठिकाणीं परमात्म्याचा आवेश आहे, म्हणजे परमात्मा विशेषांशानें त्या जीवांत प्रविष्ट आहे असें समजावें. जसें जीवाच्या स्थूल देहांत पिशाचादिकांचा प्रवेश होतो तद्वत् परमात्मा त्या जीवांत प्रविष्ट होऊन त्याचेकडून अशक्यप्राय असें कर्म करवितो.

लोकदृष्ट्या ज्या ज्या ठिकाणीं परमात्म्याचा तेजोविशेष दृष्टीस पडतो ते ते पदार्थ परमात्म्याच्या विभूति म्हणून समजले जातात.

आवेशरूपें, विभूतिरूपें, ही सृष्टि उत्पन्न झाल्यानंतर प्रगट होतात. अवताररूपें मात्र कांहीं सृष्टि उत्पन्न होण्याच्या अगोदर, व कांहीं सृष्टि उत्पन्न झाल्यानंतर प्रगट होतात.

**सृष्टीच्या अगोदर प्रकट होणारे अवतारः**—वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न, अनिरुद्ध, विष्णु, ब्रह्मा, शिव, केशव या नांवापासून दामोदर या नांवापर्यंत १२, नारायणादि शंभर, विश्वादि हजार रूपें, अजादि अनंत-रूपें सृष्टिच्या अगोदर होतात.

**सृष्टीनंतर प्रकट होणारे अवतारः**—पद्मनाभ, सनत्कुमार, कूर्म, महीदास, कपिल, धन्वंतरी, अजित, नारायण, दत्त, यज्ञ, वडवानल, शिंशुमार, तापस मनु, मत्स्य, वराह, व्यास, ऋषभ, हयग्रीव, हंस, मत्स्यादि दहा अवतार, विभु, सत्यसेन, वैकुंठ, उपेन्द्र, प्रभु, विष्वक्सेन, धर्मसेतु, योगीश्वर, बृहद्भानु, इत्यादि अनंत अवतार सृष्टीनंतर होतात.

बिंबरूप परमात्मा जीवाला सोडून राहील तर जीवाचा नाश होईल. त्यामुळें जीवनित्यत्व नष्ट होतें. त्यामुळें बिंबरूप, जीवाला सोडून कधींहि राहात नाहीं. त्याला प्रकृतिनिर्मित स्वरूप कोणत्याहि कालीं नाहीं. श्रीहरीचे कित्येक अवतार मातेच्या द्वारा प्रकट झाले असें कित्येक ठिकाणीं आढळतें, याचा अर्थ इतर मानवी जीवाप्रमाणें ते जन्मास आले असा

समजूं नये. कारण परमात्म्याला शुक्रशोणित संबंध केव्हांहि नाहीं. नरसिंह-रुपाप्रमाणें श्रीहरीचा अवतार होत असतो.

मूलरुपापासून अवताररुप बाहेर पडले तरी मूलरुप पूर्णच आहे. बाहेर झालेला अवतारहि पूर्णच आहे. परमात्म्याचें कोणतेंहि रुप पूर्णच आहे. त्याच्या रुपांत कोणताहि भेद मानूं नये. म्हणजे परमात्म्याचा एक अवतार पूर्ण व दुसरा अवतार अपूर्ण असा भेद करूं नये. किंवा परमात्म्याच्या अवतारांत भेदहि मानू नये. परमात्मा पूर्णशक्ति असल्यामुळें त्याला असाध्य असें कांहींच नाहीं. त्यामुळें त्याच्या इच्छेस येईल तें तो करूं शकतो. व परमात्म्याचें कर्म हे लीलामात्र म्हणून समजावें.

परब्रह्मशब्दवाच्य परमात्मा हा अनंतानंत मंगलमय गुणांनीं युक्त आहे. त्याच्याच एकनिष्ठ उपासनेनें आपणांस शाश्वत सुखाची प्राप्ति होते.

रामानुजाचार्य, वल्लभाचार्य, निंबार्क हे सर्वजण थोड्या फार फरकानें श्रीमध्वाचार्यांच्या अर्थाप्रमाणें अर्थ करीत असल्यामुळें त्यांच्या म्हणण्याचा अनुवाद केला नाहीं.

शंकराचार्यांनीं उद्धृत केलेल्या सर्व श्रुतिस्मृतिच्या अर्थाचें खंडन करणें या लहानशा ग्रंथांत शक्य नसल्यामुळें शंकराचार्यांचें मत कळण्यापुरतेंच त्यांचीं वाक्यें उद्धृत केलीं आहेत.

एवंच परब्रह्मशब्दवाच्य श्रीहरी हा अनंतानंत गुणांनीं परिपूर्ण असल्यामुळें तो सर्वाधार, सर्व नियामक, सर्वज्ञ असल्यामुळें सर्वांत तोच सर्व श्रेष्ठ होय.

'मत्तःपरतरं नान्यत् किंचिदस्ति धनंजय' या गीतावाक्याप्रमाणें तो सर्वश्रेष्ठ आहे. म्हणूनच आचार्यांनीं मोठ्या कळकळीनें सांगितलें कीं,

**शृणुतामल सत्यवचः परमं शपथेरितमुच्छ्रितबाहुयुगं ।**
**न हरेः परमो न हरेः सदृशःपरमः स तु सर्वचिदात्मगणात् ॥**

---

## प्रकरण ३ रें

# जगत्सत्यत्व



गेल्या प्रकरणांत परब्रह्मशब्दवाच्य श्रीहरी हा सर्वोत्तम, सर्वतंत्रस्वतंत्र जगदुत्पत्त्याद्यष्टकर्ता आहे हें श्रुतिस्मृति पुराणांच्या आधारें दाखविलें आहे. यानंतर साहजिकच दुसरा प्रश्न उपस्थित होतो कीं, परमात्मा जर सर्वोत्तम आहे तर त्याच्यापेक्षां कनिष्ठ कोण आहे? तर, तम याचा उपयोग करावयाचा असल्यास अनेक पदार्थ असावे लागतात. त्याशिवाय तरतमत्व युक्त होणार नाहीं. म्हणून परमात्मा जर सर्वोत्तम आहे. तर त्याच्यापेक्षां कनिष्ठ कोण आहे ! या प्रश्नाचें उत्तर या प्रकरणांत दिलें जाणार आहे. जगत् म्हणजे सत्व, रजस्, तमस् या उपादानभूत त्रिगुणानें होणारा जो सृष्टिप्रपंच त्यांस जगत् असें म्हणतात. व या प्रपंचामध्यें ब्रह्मदेवापासून तों तृणजीवापर्यंत सर्व जीवसमुदायांचा अंतर्भाव होतो. अशा या प्रपंचाच्या उत्पत्तीस निमित्तकारण परमात्मा आहे.

**तस्मादेवाविकारस्य विष्णोरिच्छावशादिदम् ।**
**यथार्थमेव संभूतं इति वेदवचोखिलम् ॥**

[ त्या अविकृत असणाऱ्या श्रीविष्णूच्या इच्छेमुळें हें सर्व सत्य जग निर्माण झालें आहे, असें वेदवचन आहे. ]

**साक्षात् परंपरया वा विश्वोपादानं प्रकृतिः** ( मध्वसि. )

[ साक्षात् व परंपरेनें उपादानकारण प्रकृति होय. ]

**उपादान कारणः**—जें कारण कार्यरूपानें परिणत होतें, तें उपादान-कारण होय. माती घागरीच्या रूपानें परिणत होतें म्हणून माती ही घटांस उपादान कारण होय.

**निमित्तकारणः**—जें कारण कार्यरूपानें परिणत न होतां कार्योत्पत्ति करते तें निमित्तकारण होय. कुंभार स्वतः घागरीच्या रूपानें परिणत न

होतां घागर तयार करतो यास्तव तो निमित्तकारण होय. याप्रमाणें श्रीहरी हा जगतास निमित्तकारण असून प्रकृति ही उपादन कारण होय. श्रीपरमात्म्याप्रमाणेंच प्रकृति, जीव, विश्व हे सर्वच अनादि आहेत. त्यामुळें हे सर्व पारमार्थिक सत्य होत. पारमार्थिक असें म्हणण्याचें कारण कीं, शंकराचार्यही जगाला सत्यत्व सांगतात तें व्यावहारिक सत्य होय. अत एव ते पारमार्थिकरीत्या मिथ्या होय. म्हणून जगत् हें नुसतें व्यावहारिक सत्य नसून त्यांस पारमार्थिक सत्यत्व आहे. म्हणूनच मूळ श्लोकांत 'सत्यं जगत्' याला 'तत्त्वतः' असें विशेषण दिलें आहे.

श्रीमध्वाचार्यांप्रमाणेंच रामानुजाचार्य, निंबार्क, वल्लभाचार्य, चैतन्यप्रभु हें सर्वजण जगतांस पारमार्थिक सत्यत्व आहे असें सांगतात. फक्त शंकराचार्य मात्र जग हें मिथ्या आहे असें सांगतात. विश्व हें प्रत्यक्षांत दिसत असल्यामुळें त्यांतील आपले रोजचे सर्व कार्यक्रम होत आहेत. सूर्यचंद्रादिक हें नित्य आकाशांत अस्तोदित होत असलेले आपणांस दिसत असल्यामुळें ते सत्य आहेत यांत शंकाच नाहीं. म्हणून समोर दिसत असणाऱ्या वस्तूस सत्यत्व सांगण्याविषयीं कांहीं युक्तीची जरूरी नाहीं. मात्र पाहिलेल्या वस्तु मिथ्या आहेत हें सिद्ध करण्यांकरितां युक्तीची अपेक्षा आहे. छांदोग्यभाष्यांत आचार्य म्हणतातः—

"दृष्टवस्तुनः मिथ्यात्वांगीकारे च युक्त्यपेक्षा न तु सत्यत्वे।
दृष्टस्य सत्यतां यातु युक्तिर्वा युक्तिरेव वा ।
भूषणं तस्य मिथ्यात्वे युक्त्यभावोतिदूषणम् ॥

[पाहिलेल्या वस्तू मिथ्या आहेत हें सांगण्यासाठीं युक्तीची अपेक्षा आहे. सत्यत्व सिद्ध करण्यासाठीं युक्तीची जरूरी नाहीं. जर मिथ्याविषयीं युक्ती दाखविली तर त्यांस ते भूषण होय. युक्ती नसणें हें दूषण होय.]

याप्रमाणें स्थिती असल्यामुळें जगाचें सत्यत्व सिद्ध करण्यास प्रत्यक्ष प्रमाण देण्याची आवश्यकता नाहीं. त्याप्रमाणेंच अनुमानप्रमाणानेंहि तें सिद्ध करण्याची आवश्यकता नाहीं. म्हणून आगम प्रमाणाविषयीं या ठिकाणीं विचार करणार आहे. विश्वसत्यत्वाविषयीं आगम प्रमाणें अनेक आहेत. कांहीं त्यापैकीं याठिकाणीं उद्धृत करणार आहे.

**१ यच्चिकेत सत्यमित् तन्न मोघम्.**

[परमात्म्यानें जें विश्व प्रकट केलें तें सत्य होय अत एव तें निष्फळ नव्हे.]

**२ कविर्मनीषि परिभूः स्वयंभूर्याथातथ्यतोर्थान् व्यदधात् शाश्वतीभ्यः समाभ्यः।**

[सर्वज्ञ, सर्वप्रेरक, सर्वोत्तम, सर्वतंत्रस्वतंत्र, परमेश्वर (महदादिपदार्थांना) सर्वकालीं वास्तवत्वें करून निर्मिता झाला.]

**३ विश्वं सत्यं मघवाना युवोरिदापश्चन् प्रमिनंति व्रतं वाम्**

[हे भगवन्, इंद्र बृहस्पति–तच्छब्दवाच्य परमात्मन् तुमच्या अधीन असणारें हें विश्व सत्य आहे. (कारण) तुमचें हें जगदुत्पत्यादि कर्म सर्व देवताहि जाणतात.]

**४ अथेनमाहुः सत्यकर्मेति सत्यमेवेदं विश्वमसौ सृजते।**
**अथैनमाहुर्नित्यकर्मेति। नित्यमेव असौ कुरुते।**

**५ यत्सत्यरूपं जगदेतदीदृक्सृष्टवानत्व भूत् सत्यकर्मा महात्मा।**

[४ हा परमात्मा विश्व हें सत्य असें निर्माण करतो म्हणून त्यांस सत्यकर्मा म्हणतात. हा जगत् नित्य निर्माण करतो म्हणून त्यांस नित्यकर्मा असें म्हणतात.

५ हें सत्य असणारें जगत् निर्माण करतो म्हणून सत्यकर्मा असें म्हणतात.]

**६ तदेतत्सत्यम्**

[हें सर्व जें परमात्म्याच्या अधीन आहे तें सर्व सत्य आहे.]

विश्व हे प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें तें सत्य आहे. व आतापर्यंत कथन केलेल्या श्रुति विश्वसत्यत्वच प्रतिपादन करतात. तर जग भ्रांतिकल्पित असें कसें म्हणतां येईल? या सर्व श्रुतिवरून जगत् हे वस्तुतः सत्यच आहे व त्यांस परमात्मा निमित्तकारण आहे. हे खालील श्रुतिवरून कळून येईल.

**१ यो नः पिता जनिता यो विधाता, धामानि वेद भुवनानि विश्वा।**

२ यतः प्रसूता जगतः प्रसूतिः तोयेन जीवान् व्यससर्ज भूम्याम्

[ १ जो या विश्वाचा उत्पन्नकर्ता, पालनकर्ता आहे तो सर्व भुवनें जाणतो. ]

[ २ ज्याचेपासून मी ( महालक्ष्मी ) निर्माण झालें त्याचेपासून हें जगत् निर्माण झालें. व आपल्या कर्मानें जीवहि भूमीवर निर्माण केले. ]

याप्रमाणें जगसत्यत्वाविषयीं श्रुतिप्रमाण दाखविल्यावर भगवद्गीता काय म्हणते हेंहि पाहिलें पाहिजे.

१ नत्वेवाहं जातु नासं नत्वं नेमे जनाधिपाः ।
नचैव न भविष्यामः सर्वे वयमतःपरम् ॥
२ अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।
३ प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादि उभावपि ॥
४ असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरं ।

१ हे अर्जुना, मी तूं अगर हे राजेलोक पूर्वी नव्हते असें नाहीं. किंवा पुढें असणार नाहीं असें नाहींत. (आपण सर्व पूर्वी होतो व पुढेंहि असणारच. )

२ ज्यानें हे सर्व व्यापलेलें आहे तें सर्व अविनाशि असें समज.

३ प्रकृति व पुरुष हें उभयतां अनादि आहेत असें समज.

४ जग हें खोटें आहें असें म्हणणारे असुर होत.

या सर्व प्रमाणावरून, जगत्, जीव, प्रकृति ही सर्व अनादि आहेत. असेंच श्रीकृष्णांचें मत आहे व जो पदार्थ अनादि आहे त्यांस मिथ्या कसें म्हणतां येईल. तसें झाल्यास परब्रह्माचे ठिकाणींहि मिथ्यात्व येईल. म्हणून अनादि पदार्थ मिथ्या न मानतां सत्यच मानलें पाहिजेत. उलट श्रीकृष्णांनीं गीतावाक्यानें ' जगत् हें असत्य आहे ' असें म्हणणाऱ्यांस असुर असें म्हटलें आहे. या श्लोकांवरील शांकरभाष्यहि असेंच आहे. " असत्यं यथा वयं अनृतप्रायाः तथा इदं जगत् सर्वे असत्यं । ते आसुरा जनाः" असा अर्थ शंकराचार्यांनीं केला आहे. त्यावरून जग हें मिथ्या आहे हा सिद्धान्त श्रीकृष्णांनाहि मान्य नव्हता हें सिद्ध होतें. जगत् हें प्रवाहतः अनादि अत एव सत्य आहे असा मध्वाचार्यांचा सिद्धान्त आहे.

जगत्प्रवाहः सत्योयं नैव मिथ्या कथंचन।
येत्वेतदन्यथा ब्रूयुः सर्वहंतार एव ते ॥

( भागवततात्पर्य )

[ जगत्प्रवाह हा सत्य आहे; हा कदापि मिथ्या नाहीं. जे या विरूद्ध बोलतात ते सर्वघातकी होत. ]

या प्रमाणें जगत्सत्यत्वाविषयीं श्रुति व गीता यांचा आधार दिला आहे ब्रह्मसूत्रावरील शंकराचार्यांची अध्यासवादाची प्रस्तावना सोडल्यास खुद्द ब्रह्मसूत्रांत मिथ्यात्वबोधक पदच नाहीं. सर्वत्र भेदाचें व विश्व सत्यत्वाचेंच प्रतिपादन केलें आहे. याप्रमाणें इतर आचार्य या विश्व-सत्यत्व सिद्धान्ताविषयीं काय म्हणतात तें पाहूं. तसेंच या जगदुत्पत्त्या-दिकांस निमित्त व उपादान कारण कोण आहे ? याविषयीं इतर आचार्य काय म्हणतात तेंहि पाहूं.

जगदुत्पत्तिविषयीं शास्त्रामध्यें ज्या अनेक विचारप्रणालि प्रचलित आहेत त्यास संघातवाद, आरंभवाद, परिणामवाद, विवर्तवाद अशी नांवें आहेत.

पृथिवी, आप, तेज, वायु ही चार भूतें, विषय, इंद्रियें व चार भूतांचे परमाणु पृथिव्यादिरूपानें एकत्रित झाले म्हणजे जगदुत्पत्ति होते हा संघातवाद होय. हा बौद्धांनीं मानला आहे. या संघातवादाचें खंडन सर्वच आचार्यांनीं केलें असल्यामुळें त्याचा विचार येथें कर्तव्य नाहीं.

ज्या वेळेला एक वस्तु आपल्या स्वरूपाच्या त्याग करून दुसरें रूप धारण करते त्यावेळीं त्यांस परिणाम झाला असें म्हणतात. यासच विकृत परिणाम वाद म्हणतात. उदाहरण दुधाचें रुपांतर दह्यांत होते. म्हणून दही हा दुधाचा परिणाम होय. हा परिणामवाद सांख्यांनीं स्वीकारला आहे. रामानुजाचार्य, व निंबार्काचार्य वल्लभाचार्य हे अविकृत परिणामवाद स्वीकारतात. मूल स्वरूपांत कोणताहि विकार न होतां दुसऱ्या आकारानें वस्तु परिणत होणें यांस अविकृत परिणाम म्हणतात. त्याप्रमाणें परब्रह्मा-मध्यें कोणतीहि विकृति न होतां ब्रह्म हें जगदाकार बनतें असा वरील आचार्यत्रयांचा सिद्धान्त आहे. म्हणूनच परब्रह्म हेंच जगाला उपादान कारण व निमित्तकारण असें मानतात.

रामानुजाचार्य आपल्यां श्रीभाष्यांत "जन्माद्यस्ययतः" येथें ब्रह्माचें लक्षण करतांना ब्रह्म हेंच निमित्तोपादान कारण आहे असें म्हणतात.

"तस्माद्यन्मूला जगज्जन्मस्थितिलयाः स्वनिमित्तोपादानभूतं वस्तु ब्रह्मेति लक्षयंति"

[ज्याच्या योगानें जन्मस्थितिलय हे होतात व त्यांस जे स्वतः निमित्तोपादानभूत आहे तें ब्रह्म होय.]

वल्लभाचार्यहि "कार्यकारणरूपंहि शुद्धं ब्रह्म न मायिकम्" अशा रीतिनें जगाला उपादान व निमित्त कारण परब्रह्मच होय असें म्हणतात.

निंबार्काचार्य ब्रह्माचें लक्षण सांगतांना म्हणतातः—

"जगदभिन्ननिमित्तोपादानत्वे सति सत्यादिमत्वं ब्रह्मलक्षणम् (वेदांतपारिजातसौरभ—जन्माधिकरण)

यावरून रामानुजाचार्य, निंबार्काचार्य व वल्लभाचार्य हे अविकृत परिणामवाद मानतात.

शंकराचार्यांनीं विवर्तवादाचा स्वीकार केला आहे. निर्गुण परब्रह्म हेंच जगताला उपादानकारण व निमित्तकारण आहे असें ते समजतात.

उपादानं प्रपंचस्य ब्रह्मणोऽन्यन्न विद्यते।
तस्मात्सर्वप्रपंचोयं ब्रह्मैवास्ति न चेतरत् ॥ ४५ ॥
(अपरोक्षानुभूति).

[या प्रपंचाला परब्रह्माशिवाय दुसरें उपादानकारण नाहीं. म्हणून सर्व प्रपंच ब्रह्मच होय. तद्व्यतिरिक्त (ब्रह्माशिवाय सर्व) मिथ्या होय.]

निर्गुण, निराकार असणाऱ्या परब्रह्मास जगाचें उपादान मानल्यावर ब्रह्म हें कार्यत्वानें जगत्स्वरूपांत परिणत होतें. हें तत्व मान्य केल्यास कारणाभिन्न कार्यरुप जगत् सत्य मानावें लागेल. शिवाय ब्रह्म हें निर्गुण, निराकार आहे या सिद्धान्ताला बाध येईल म्हणून अद्वैतवाद्यांनीं उपादान कारणाचे 'परिणामि उपादान व विवर्तोपादान' असें दोन प्रकार मानून विवर्तोपादानाचा स्वीकार केला आहे. त्यापैकीं परिणामवादाचें लक्षण

वर सांगितलें आहे. विवर्तोपादानाचें लक्षण अद्वैतवाद्यांनीं पुढीलप्रमाणें सांगितलें आहे.

१ अतत्त्वतोऽन्यथाप्रथाविवर्तइत्युदीरितः। ( वेदांतसार )
२ अवस्थांतरभानंतु विवर्तो रज्जुसर्पवत्॥ ( पंचदशी )
३ विवर्तो नाम विषमसत्ताक कार्यापत्तिः। ( वेदांत परिभाषा )

[ तात्पर्यार्थः—१–२ वस्तूच्या मूळरुपाचा त्याग न होतां त्याच वस्तूची रुपांतरानें जी मिथ्याप्रतीति येते त्यांस विवर्त म्हणतात. उदा० रज्जुसर्प

३ उपादानाला त्याच्या सत्तेहून विषमसत्तेनें युक्त अशा कार्याची ( मिथ्या ) प्रतीति येणें हा विवर्त होय. ]

मूळ निर्गुण, निर्विकार असणाऱ्या परब्रह्मावर अज्ञानानें त्याच्या मूलरूपांत बदल न होतां जगाचा भास होतो, यांस विवर्त म्हणतात. हा विवर्त अध्यासमूलक आहे. हा भास मूलस्वरुपाचें ज्ञान होतांच नष्ट होतो, व तो भास असल्यामुळें तो मिथ्या होय. मग या जगाचे व्यवहार प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें त्यांस मिथ्या कसें म्हणावे ? असा प्रश्न उपस्थित झाला असतां " व्यावहारिक, प्रातिभासिक, पारमार्थिक " असे सत्याचे तीन प्रकार मानून पृच्छकाचें समाधान करण्याचा प्रयत्न केला. त्या तीन सत्यांपैकीं ब्रह्म तेवढें वस्तुतः पारमार्थिक सत्य असून ब्रह्मातिरिक्त सर्व वस्तू दुसऱ्या दोन सत्यांत अंतर्भूत होतात. अतएव त्या वस्तु मिथ्या होत.

सत्यंजगदिति भानं संसृतये स्यादपक्वचित्तानां॥
तस्मादसत्यमेतत् निखिलं प्रतिपादयंति निगमांताः ॥
( स्वात्मनिरूपणम् )

अशा रीतिनें जगत् हें ब्रह्मावर अध्यस्त असल्यामुळें तें मिथ्या होय. शंकराचार्यांच्या सिद्धान्ताचा मूल पाया हा अध्यासमूलक विवर्तवाद असल्यामुळें याचेंच खंडन बाकीच्या सर्व आचार्यांनीं केलें आहे. हा अध्यासवाद कसा अयुक्त आहे हें दाखविण्याचें अगोदर अध्यास म्हणजे काय याचा पूर्णपणें विचार केला पाहिजे. तसेंच मिथ्या म्हणजे काय हेंहि कळलें पाहिजे.

## अध्यासाचें लक्षण

अध्यास शब्दाचा अर्थ शंकराचार्यांनीं आपल्या शारीरभाष्यांत 'स्मृतिरूप: परत्र दृष्टावभास:' (स्मृतिरुप अन्य वस्तूचा आभास होणें-ब्रह्मसूत्रशांकरभाष्य – जिज्ञासाधिकरण) असा केला आहे. अन्यत्र रुपें पाहिल्यावर शिंपल्याचें ठिकाणीं सादृश्यामुळें रुप्याचा भास होणें हा अध्यास होय. यालाच भ्रमज्ञान म्हणतात. हे भ्रमज्ञान खऱ्या शिंपल्याचें ज्ञान होण्याबरोबर निवृत्त होतें. त्याप्रमाणें हें दिसतें तें सर्व ब्रह्म आहे. पण अज्ञानामुळें ब्रह्मावर ह्या जगाचा भास होतो. हा भ्रममूलक आहे. म्हणून हें जगत् मिथ्या आहे. आणि अहं ब्रह्मास्मि या ज्ञानानें तो भ्रम नाहींसा होतो. या प्रमाणें या अध्यासाची प्रक्रिया आहे. तात्पर्य अध्यास म्हणजे आरोप एवढा अर्थ आहे. मिथ्या शब्दाचा अर्थ 'ब्रह्मव्यतिरेकेण अभाव:' (ब्रह्माव्यतिरिक्त दुसरा पदार्थ नसणें) असा शंकराचार्यांनीं केला आहे.

पुढें पुढें मिथ्या शब्दाचा अर्थ निश्चित करण्यासाठीं त्या शब्दाची चिकित्सा चालू असतां मिथ्या शब्दार्थाविषयीं विचारलें असतां अद्वैत-वाद्यांनीं मोठ्या मौजेचें उत्तर दिलें आहे. मिथ्या म्हणजे 'अनिर्वचनीय' अनिर्वचनीय म्हणजे काय ? '**सदसद्विलक्षण**' (खरें नव्हें, खोटें नव्हें, या दोहोंपेक्षां विलक्षण) असें सांगितले. या सर्वांचा यथाक्रम विचार करणार आहेंच. अगोदर हा अध्यासवाद कसा चुकीचा आहे हें दाखविणार आहे.

अध्यास–भ्रमज्ञान होण्यास खालीं दिलेल्या कारणांची जरूरी आहे. त्यावांचून भ्रम होणार नाहीं.

१ भ्रम होण्यास अधिष्ठान (जी वस्तु पाहून भ्रम होतो ती वस्तु प्रत्यक्ष) पाहिजे.

२ भ्रम ज्याला होतो तो पाहिजे. ३ सामान्य धर्म ४ विशेष धर्म ५ आरोपित पदार्थाचें आरोपाधिष्ठानपदार्थाशीं सादृश्य ६ भ्रम ज्यास होतो त्यांस सामान्य धर्मासहित अधिष्ठानाचें ज्ञान ७ त्यांस विशेषधर्माचें अज्ञान

८ आरोप केल्या जाणाऱ्या वस्तुच्या सादृश्याचें ज्ञान ९ त्या ज्ञानाला कारण देहेंद्रियादि पाहिजे.

या नऊ कारणावांचून कोणासहि भ्रम होत नाहीं. उदाहरण शुक्ति-रजताचें घेऊं.

१ ज्यावर रुप्याचा भ्रम होतो तें शुक्तीचें अधिष्ठान आपल्या समोर आहे. २ शुक्तिवर रुप्याचा भ्रम ज्याला होतो तो पुरुष आहे. ३–४ शुक्तिचें सामान्य ज्ञान व शुक्तिचें शुक्तीत्व हें विशेष धर्म आहेत. ५ शुक्तींत व रुप्यांत चकचकीतपणाचें सादृश्य आहे. ६ ज्याला रुप्याचा भ्रम झाला आहे त्यांस शुक्तिचें सामान्य ज्ञान आहे. ७ पण शुक्तित्वाचें विशेष ज्ञान नाहीं. ८ शुक्तीवर असलेल्या चकचकीतपणाचें ज्ञान आहे. ९ व हें भ्रम होणें ज्यांस होतें त्या पुरुषांस देहेन्द्रियादिकहि आहेत.

तेव्हां त्या पुरुषांस शुक्तिला पाहून "हें रुपें आहे" असा भ्रम होतो. जो पदार्थ आपण अजिबात पाहिला नाहीं अगर ज्याचें यत्किंचित्‌हि ज्ञान नाहीं अशा पदार्थाचा भ्रम कदापि होत नाहीं. म्हणून भ्रम होण्यास अन्यवस्तूची जरूरी आहे. आचार्य म्हणतातः—

अधिष्ठानं च सदृशं तथ्यवस्तुद्वयं विना ।
न भ्रांतिर्भवति क्वापि स्वप्नमायादिकेष्वपि ॥

[ अधिष्ठान, सादृश्य, व दोन सत्य पदार्थ या वांचून स्वप्नमायादिकाचें ठिकाणीं भ्रम केव्हांहि होत नाहीं. ]

हीच कसोटी आपण ब्रह्मावर जगाचा भ्रम होतो या मायावाद्यांच्या मतांस लावू.

"ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या" असें म्हणणाऱ्या मायावाद्यांच्या मताप्रमाणें ब्रह्मातिरिक्त सत्य वस्तूचा अभाव असल्यामुळें भ्रम कोणास होतो ? भ्रम होण्याला ब्रह्मच अधिष्ठान मानलें तर ब्रह्माचें ठिकाणीं ब्रह्मालाच भ्रम होतो असें मानावें लागेल. ब्रह्म हें निर्धर्मिक (सकलधर्मरहित) असल्यानें ब्रह्माचें ठिकाणीं अधिष्ठान होण्यास कारण असलेलें सामान्यधर्म व विशेष-धर्म आणि आरोप केल्या जाणाऱ्या जगाचें सादृश्य नाहीं, याचप्रमाणें भ्रम होण्यास अवश्य असलेलें सामान्य धर्मज्ञान, विशेष धर्माचें अज्ञान व त्याला

कारणीभूत देहेन्द्रियादिक हे सकलधर्मरहित ब्रह्मास नाहींत. म्हणून ब्रह्मच भ्रमाला अधिष्ठान मानणें सयुक्तिक नाहीं. तसेंच भ्रम कोणास होणार ? भ्रम ज्याला झाला तो पुरुष कोठें आहे ? भ्रम कोणास होणार ? कसा होणार ? या प्रश्नाचें उत्तर देतां येत नाहीं. कारण ज्याचा भ्रम होतो तेंहि ब्रह्मच, ज्यांस होतो तेंहि ब्रह्मच. त्यामुळें भ्रम होतो हे म्हणणेंच जुळत नाही· अत एव अध्यासहि जुळत नाहीं.

दुसरें असें कीं, ज्या वस्तूचा भ्रम आपणांस होतो ती आरोप केली जाणारी वस्तु दुसरीकडे आपण पाहतों. दोरीवर सर्पाचा अगर शुक्तिकेवर रुप्याचा भ्रम होण्यास आपण अन्यत्र सर्प अगर रुपें पाहिलेलें असतें. त्याचें यथार्थज्ञानहि आपणास असतें. आणि म्हणूनच कांहीं तरी दोषांमुळें दोरी व साप, शुक्तिरजत यांच्यांत कांहीं अंशीं असलेल्या सादृश्यामुळें दोरीवर सापाचा,· शुक्तिवर रजताचा भास होतो. तात्पर्य हें कीं, खऱ्या दोन वस्तु व त्यांत असलेल्या सादृश्यामुळें भ्रम होतो. याला स्मृतिरूप वासनाहि कारण आहे. कारण अंधारांत दोरी पाहिल्यावर तिच्या लांबपणाच्या सादृश्यानें आपणांस ज्ञात असलेला सर्प त्या ठिकाणीं भासतो. त्यानंतरच मन भीतिग्रस्त होतें. आपण जी वस्तु अजिबात पाहिलेली नसते अगर आपणांस ज्या वस्तूचें शाब्द ज्ञानहि नसतें त्या वस्तुचा भ्रम होणें कदापि शक्य होत नाहीं. म्हणूनच ब्रह्मावर जगाचा भास व्हायचा झाल्यास अगोदर ब्रह्म व जगत् या दोन वस्तु सत्य पाहिजेत. त्या नंतर अन्यत्र पाहिलेल्या जगताचें ज्ञान पाहिजे. ब्रह्म व जगत् या उभयतांत कसलें तरी सादृश्य पाहिजे. तेव्हां ब्रह्मावर जगाचा भ्रम होईल. मग ब्रह्मावर सध्यां सत्यत्वानें ज्ञात असलेल्या जगाचा अध्यास करण्यासाठीं दुसरें जग खरें मानावयाचें, दुसरें जगहि भ्रमात्मक मानण्यासाठीं तिसरें जग खरें मानावयाचें, अशी भ्रमपरंपरा मानण्याऐवजीं आहे हें जगच सत्य मानलें तर बिघडलें कोठें ? पण स्वसिद्धान्तच खरा असा अट्टाहास करणाऱ्या मायावाद्यांना हा सुविचार सुचेल तर ? याप्रमाणें ब्रह्मावर जगाचा अध्यास जुळत नाहीं हें युक्तीनें दाखविलें आहे. यानंतर जगन्मिथ्यात्वाला अनुमानप्रमाण आहे कीं काय ? याचा विचार

करूं. अद्वैतवादी जगन्मिथ्यात्वाविषयीं एक अनुमान करतात तें अगदीं सुप्रसिद्ध आहे.

विश्वं मिथ्या, दृश्यत्वात् शुक्तिरूप्यवत्

[ हें अनुमान अतिशय सुप्रसिद्ध असून या अनुमानाच्या सिद्धीसाठीं अद्वैती पंडितांनीं व खंडनाकरितां द्वैती पंडितांनीं अनेक ग्रंथ रचले आहेत. ]

" जग हें खोटें आहे. कारण तें दृश्य आहे. जें दृश्य असतें तें मिथ्या असतें. उदाहरण शुक्तिवर दिसणाऱ्या रुप्याचें घ्यावें "

याप्रमाणें अनुमान केल्यावर द्वैतवाद्यांनीं त्यांस अनेक दोष दिलेले आहेत.

## वरील अनुमानाचें खंडन

वरील अनुमान सत्य आहे कीं मिथ्या आहे ? सदर अनुमान खरें आहे असें म्हटल्यास दोन सत्यें ( एक ब्रह्म व दुसरें अनुमान सत्य ) होऊन शंकराचार्यांच्या सिद्धान्ताची हानि होते. तें खोटें आहे असें म्हटलें तर हेतुमुळें मिथ्यात्व सिद्ध होत नाहीं म्हणून सदर अनुमानास असिद्धि हा दोष येतो. शिवाय या अनुमानास आश्रयासिद्ध नांवाचा दोष येतो. या ठिकाणीं जगाचें मिथ्यात्व सिद्ध करावयाचें आहे. पण ज्याचें मिथ्यात्व सिद्ध करणें आहे, तें मिथ्यात्वाला आश्रय असणारें जगत् मुळांत आहे कोठें ? आणि जें आहे तें भासणारें आहे. म्हणून मिथ्यात्वाला आश्रय नाहीं, तर त्या जगाचें मिथ्यात्व कुठें सिद्ध करणार ?

शिवाय जगत् हें मिथ्या आहे या म्हणण्यास "दृश्यत्व" हा हेतु दिला आहे. या 'दृश्यत्व' हेतु वरून द्वैतवाद्यांना जगत्सत्यत्वाचें अनुमान करतां येईल.

" विश्वं सत्यं दृश्यत्वात् यथा संप्रतिपन्नं "

विश्व हें दृश्य असल्यामुळें खरें आहे. उदाहरण उभयसंमत पदार्थ, यावरून ' जें दृश्य आहे तें सत्य आहे ' हा नियम सिद्ध होतो.

याप्रमाणें विश्वमिथ्यात्वाला साधक म्हणून जो हेतु सांगितला त्याच हेतुवरून जगत् हें सत्य आहे असें सिद्ध करतां येणें हें दोषास्पद आहे.

एकाच हेतुमुळें परस्पर विरुद्ध सिद्धान्तासाठीं अनुमान करतां येतें हा हेतुचा दोष आहे. अशा दोषयुक्त अनुमानास प्रामाण्य नाहीं. विश्व हें सत्य आहे याची प्रचीति घडोघडी येत असतां तें मिथ्या मानण्याऐवजीं 'विश्व हें मिथ्या आहे' हें वाक्यच खोटें कां मानूं नये? कारण विश्व हें मिथ्या आहे याला प्रत्यक्ष प्रमाण नाहीं आणि तसा अनुभव नाहीं.

'दृश्यत्व' या हेतुवरून जगाचें मिथ्यात्व सिद्ध केलें तर याच हेतुवरून ब्रह्मालाहि मिथ्यात्व येईल. कारण 'आत्मा वारे द्रष्टव्यः श्रोतव्यो मंतव्यो निदिध्यासितव्यः" "दृश्यते त्वग्रया बुद्ध्या" "परात्परं पुरीशयं पुरुषमीक्षते" इत्यादि श्रुति परब्रह्म हें ज्ञानानें दृश्य आहे असें म्हणतात. तसेंच शंकराचार्यहि परब्रह्म हें ज्ञानानें दृश्य आहे असें मानतात. तेव्हां परब्रह्म हें दृश्य असल्यामुळें त्या दृश्यत्वहेतुमुळें परब्रह्मास मिथ्यात्व येईल. म्हणून दृश्यत्व या हेतुवरून मिथ्यात्व सिद्ध करणें हें दोषयुक्त होय. अत एव दोषयुक्त अनुमानास प्रामाण्य नाहीं.

या नंतर कदाचित् असें म्हणाल कीं, "दृश्य पदार्थ जर सत्य मानला तर शुक्तिरजतालाहि सत्यत्व येईल याची वाट काय? यावर द्वैतवादी म्हणतात, "अहो दृश्य म्हणजे काय? हें तुम्हांस माहीत आहे काय? दृश्य म्हणजे "यत् अबाध्यत्वेन दृढं दृष्टं तदेव दृश्यम्" (नयचंद्रिका) (कोणताहि बाध न येतां जें दिसतें त्यांस दृश्य म्हणावें) शुक्तिरजत हें अबाधित दृश्य नाहीं. पहिल्यांदा खरें वाटतें. क्षणानंतर इंद्रियदोष नष्ट झाल्याबरोबर मूळ शुक्ति मात्र दिसते, म्हणून विश्वमिथ्यात्वानुमानास शुक्तिरजत हा दृष्टांतच योग्य नाहीं. अतएव "विश्वं मिथ्या" या अनुमानास "दृष्टांतसाधनवैकल्य" हा दोष येतो. याप्रमाणें विश्वमिथ्यात्व हें अनुमानद्वारा सिद्ध होत नाहीं. शिवाय प्रत्यक्ष प्रमाणाच्या विरुद्ध वरील अनुमान असल्यामुळें सदर अनुमानास प्रामाण्य नाहीं. आचार्य म्हणतातः—

**प्रत्यक्षमागमो वापि भवेद्यत्र नियामकः।**
**सैव व्याप्तिर्भवेन्मानं नान्या संदिग्धमूलतः॥**

(अनुव्याख्यान २-२)

[ज्यावेळीं प्रत्यक्ष अगर आगम यापैकीं अनुमानास नियामक असेल तेंच अनुमान प्रमाण होय. संदिग्धमूलक अनुमान प्रमाण नाहीं.]

हा सर्व विषय आचार्यांनीं अनुव्याख्यानांत द्वितीयाध्यायांतील द्वितीय पादांत आठव्या अधिकरणांत सांगितला आहे. तो ज्ञानेच्छूंनीं गुरुमुखांतून पहावा. याप्रमाणें अध्यासच जुळत नसल्यामुळें विश्वमिथ्यात्वहि जुळत नाहीं.

आतां मिथ्या शब्दाचा अर्थ " अनिर्वचनीय " असा केला जातो. असा अर्थ केल्यास विरोध व अनेकांतिक हे दोष येतात. कारण " विश्वं मिथ्या दृश्यत्वात् शुक्तिरजतवत् " या अनुमानांत मिथ्यात्व सिद्ध करावयाचें असून त्यास " दृश्यत्व " हा हेतु आहे. पण तो हेतु या अनुमानांत आपलें कार्य करीत नाहीं. कारण जगांत अनिर्वचनीय कांहींच नाहीं. जें दृश्य आहे तें अनिर्वचनीय ( कोणत्याहि प्रमाणांनी न सांगता येण्याजोगें ) आहे असा नियम नाहीं. उलट जें दृश्य आहे तें निर्वचनीय ( प्रमाणांनीं कळण्याजोगें ) आहे. म्हणून अनिर्वचनीयत्वास दृश्यत्व हा हेतु जुळत नाहीं. म्हणून या अनुमानास अनेकांतिक दोष येतो. मिथ्यात्व हें साध्य व त्यांस हेतु दृश्यत्व आहे. मिथ्यात्वाचा अभाव ब्रह्माचें ठिकाणीं आहे. ( म्हणजे ब्रह्म हें सत्य आहे. मिथ्यात्वाचा अभाव म्हणजे सत्यत्व ) आणि ब्रह्म हें ज्ञानानें दृश्य आहे, असें अद्वैतवादीहि मानतात. म्हणून दृशत्व या हेतुमुळें ब्रह्माचा मिथ्यात्वाभाव ( सत्यत्व ) सिद्ध होतो. यास्तव हेतुला अनेकांतिक हा दोष येतो. याप्रमाणें या दृश्यत्व या हेतुनें मिथ्यात्व सिद्ध होत नाहीं. एवढेंच नव्हे तर याच हेतुमुळें विश्वसत्यत्व सिद्ध होतें. तर त्या हेतुवरून विश्व मिथ्यात्व कां ठरवावें? या प्रमाणें मिथ्या शब्दाचा अर्थ " ब्रह्मव्यतिरेकेण अभावः " असा केला तरी कोणत्याहि रीतीनें जगाचें मिथ्यात्व सिद्ध होत नाहीं उलट या त्यांच्या अनुमानास नाना तऱ्हेचीं दूषणें येतात.

शिवाय शुक्तिवर रजताचा भास होतो व शुक्तिज्ञानानंतर रजतज्ञान-निवृत्ति होतें, हें रुपें नाहीं, शुक्ति आहे असें सत्यज्ञान होतें. रजतज्ञान-निवृत्तिनंतर शुक्ति रुप्याच्या रुपांत ज्ञात होत नाहीं. प्रकृतस्थलीं ब्रह्मावर झालेला जगाचा भ्रम " अहं ब्रह्मास्मि " या ज्ञानानें नाहींसा झाल्यावर

आरोपित जगच ब्रह्मरूप होतें. म्हणून रज्जुसर्पाचा दृष्टांत या ठिकाणीं योग्य नाहीं. शिवाय शंकराचार्यांनीं जगाला व्यावहारिक सत्यत्व मानलें आहे. "व्यावहारिकत्वं नाम अर्थक्रियाकारित्वम्" अशी व्याख्या व्यावहारिकत्वाची केली आहे. शुक्तिवर भासणाऱ्या रुप्याचा व्यवहारांत कांहींहि उपयोग नाहीं. म्हणून त्यास अद्वैतवाद्यांनीं प्रातिभासिक सत्यत्व दिलें आहे. मग व्यावहारिक सत्यत्वास प्रातिभासिक सत्यत्वाचें उदाहरण देऊन काय उपयोग?

**तावत्सत्यं जगद्भाति शुक्तिकारजतं यथा।**
**यावन्न ज्ञायते ब्रह्म सर्वाधिष्ठानमद्वयं ॥ ७ ॥** (आत्मबोध)

म्हणून शुक्तिरजताचा दृष्टांत अर्थक्रियाकारित्वाभावामुळें योग्य नाहीं. या प्रमाणें विश्वमिथ्यात्व सिद्ध होत नाहीं. यानंतर विश्वमिथ्यात्वाविषयीं अद्वैतवादी प्रस्थानत्रयींतील कांहीं प्रमाणें उद्धृत करतात त्याचा विचार करूं.

अद्वैतवादी खालीं दिलेल्या श्रुतिचा विश्वमिथ्यात्वाविषयीं प्रमाण म्हणून स्वीकार करतात.

**१ वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ॥**
**२ ऐतदात्म्यमिदं सर्वं तत्सत्यं स आत्मा तत्वमसि ॥**
**३ इदं सर्वं यदयमात्मा ४ ब्रह्मैवेदं सर्वं ५ आत्मैवेदं**
**६ सर्वं खलु इदं ब्रह्म ७ नेहनानास्ति किंचन.**

अगोदर शंकराचार्य या श्रुतींचा अर्थ कसा करतात तें पाहूं.

**१ वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यं ॥**
(छांदोग्य उपनिषद ६-१-४)

या उपनिषद् वाक्याचा अर्थ शंकराचार्यांनीं आपल्या ब्रह्मसूत्र भाष्यांत पुढें दिल्याप्रमाणें केला आहे.

**'यतः वाचारंभणं विकारो नामधेयं वाचैव केवलमस्तीत्यारभ्यते। विकारो घटः शरावः उदंचनं चेति। न तु वस्तुवृत्तेन विकारो नाम कश्चिदस्ति। नामधेयमात्रं ह्येतदनृतं मृत्तिकेत्येव सत्यमिति।** (शां. भा. अ. २-६-१४)

[ कारण ' वाचारंभण विकार नामधेय आहे.' ' वाचरंभणं ' केवल वाणीनेंच–शब्दानेंच तो आहे असा आरंभ केला जातो. विकार म्हणजे घट, शराव, परळ, मोघा वगैरे पण वस्तुतः विकार म्हणून कांहीं नाहीं. कारण तें केवल मिथ्या नाम आहे, मृत्तिका हीच सत्य आहे.] विष्णुशास्त्री बापटकृत भाषांतर.

**वाचारंभणमग्निर्नाम विकारो नामधेयं नाममात्रमित्यर्थः अतो अग्निबुद्धिरपि मृषैव** ( छांदोग्योपनिषद् शांकरभाष्य )

[ वागिंद्रियानें आरंभिलेला अग्निनामक विकार हा नाममात्रच होय. म्हणून अग्निबुद्धि ही सुद्धा मिथ्याच होय.

या सर्व शांकरभाष्याचा तात्पर्यार्थ एवढाच आहे कीं, कार्य म्हणविले जाणारे घटादि समस्त विकार पदार्थ हें केवल शब्दप्रतिपाद्य मात्र होत. त्यांना वस्तुसत्ता नसल्यामुळें तें मिथ्या होत.

घटादिकांना उपादान कारण असणारी मृत्तिका तेवढी सत्य व कार्यरूप घटादि विकार सर्व मिथ्या होत. या दृष्टांताप्रमाणे कारणरूप ब्रह्मच तेवढें सत्य व कार्यरूप जगत् खोटें असें या श्रुतीनें सिद्ध होतें.

याप्रमाणें शंकराचार्य ही श्रुति जगन्मिथ्यात्वाला बोधक आहे असें म्हणतात, तें बरोबर आहे काय ? याचा विचार करूं. या श्रुतिवाक्याचा विचार करतांना खालील गोष्टीचा विचार केला पाहिजे.

या श्रुतींत एखादें मिथ्यात्वबोधक पद आहे काय ? किंवा ध्वन्यर्थ तसा निघूं शकतो काय ? शंकराचार्यांनीं ' मात्र ' हें पद बाहेरून आणून याचा अर्थ केला तो योग्य आहे काय ? त्याला कांहीं प्रमाण आहे काय ?

या श्रुतीला आधार मानून दोन तऱ्हेचें अनुमान अद्वैतवादी करतात. १ "ब्रह्म सत्यं कारणत्वात् मृद्वत् " २ जगत् मिथ्या कार्यत्वात् घटवत्" ( ब्रह्म हें सत्य आहे. ते कारण आहे. मृत्तिकेप्रमाणें ) २ जगत् हे मिथ्या आहे. ते कार्य आहे म्हणून. घटाप्रमाणें. ' वाचारंभण ' या श्रुतींत कारण तेवढें सत्य व कार्य मात्र मिथ्या असें म्हटलें आहे. )

अशा तऱ्हेचें अनुमान केल्यास अनेक दोष त्यांस येतील. प्रथम अनुमानांत पक्षीकृत ब्रह्म हें सगुण आहे कीं निर्गुण आहे ? निर्गुण म्हटल्यास

अद्वैतवाद्यांनीं ब्रह्म हें धर्मरहित असें मानलें असल्यानें 'कारणत्वात्' हा जो हेतु दिला आहे त्याच्या अभावामुळें हेतुस असिद्धि नांवाचा दोष येइल. कारण ब्रह्माचे ठिकाणीं कारणत्वरूप धर्म नाहीं असें अद्वैतवादी म्हणतात. शिवाय ज्या ब्रह्माचा सत्यत्व ( खरेपणा ) धर्म सिद्ध करावयाचा आहे तो ब्रह्याचे ठिकाणीं त्याच्या निर्धर्मिकत्वामुळें जुळत नसल्यानें साध्य धर्माचा अभाव आहे. येणें प्रमाणें निर्गुण ब्रह्म हें अनुमानांत पक्ष मानल्यास असिद्धि दोष येत असल्यामुळें निर्गुण ब्रह्म हें पक्ष मानणें योग्य नाहीं. अतएव सगुण ब्रह्म हें अनुमानांत पक्ष मानूं असें म्हटल्यास तेंहि बरोबर नाहीं. ज्या सगुण ब्रह्माचें सत्यत्व सिद्ध करावयाचें आहे, तें सगुण ब्रह्म अद्वैतवाद्यांनीं व्यावहारिक सत्य म्हणून मानलें आहे. अर्थात या श्रुतीनें सगुण ब्रह्माचें पारमार्थिक सत्यत्व सिद्ध करणार असल्यास अद्वैतवाद्यांच्या सिद्धान्ताची हानि होईल. या ठिकाणीं श्रुतीची व्यावहारिक सत्यत्व ( वस्तुतः खोटेपणा ) सिद्ध करण्याची प्रवृत्ति नाहीं. जर पारमार्थिक सत्यत्व सांगण्यासाठीं हें श्रुतिमूलक अनुमान आहे असें म्हटल्यास तेंहि बरोबर नाहीं. कारण जो मृतिकेचा दृष्टांत दिला आहे त्या मृत्तिकेस अद्वैतवादी पारमार्थिक सत्यत्व न मानतां व्यावहारिक सत्यत्व मानतात. त्यामुळें दृष्टान्तास साध्य वैकल्य दोष येतो.

दुसऱ्या तऱ्हेच्या अनुमानासहि अनेक दोष येतात. अद्वैतमतानें जगत् हें ब्रह्मकारणाचें कार्य असें मानलें नसून ब्रह्माचें ठिकाणीं कल्पित म्हणून मानलें आहे. मृत्तिकेचें कार्य घट आहे. मृत्तिकेचें ठिकाणीं घट हा कल्पित नाहीं. शुक्तिचे ठिकाणीं रजत हें कल्पित आहे. शुक्तिचें कार्य रजत नव्हे, एवंच "जगत् हे कार्य असल्यामुळें मिथ्या आहे. या अनुमानास कार्यत्व हा हेतु दिला आहे तो सिद्ध होत नाहीं. म्हणून सदर अनुमान दोषमूलक आहे.

अगदीं सामान्य व्युत्पन्नालाहि या श्रुतिवाक्यांत मिथ्यात्वबोधक पद नाहीं अगर विश्व मिथ्या आहे असा ध्वन्यर्थहि निघूं शकत नाहीं हें समजेल. " मात्र " हें पद बाहेरचें घेऊन अर्थ करावा याविषयीं यत्किंचितंहि आधार नाहीं. केवल वागिंद्रियानें केलेला व्यवहार हा नाम मात्र होय. " अत एव तो मिथ्या होय " असा अर्थ करणें योग्य नाहीं. बाहेरचे शब्द

घेऊन श्रुतिवाक्याचा अर्थ करावयाचा झाल्यास श्रुतिवाक्यांचा अनर्थ होईल. एखाद्यानें 'सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म' या वाक्यांत नसलेल्या 'न' या पदाचा समावेश करून 'ब्रह्म सत्यं न, ज्ञानं न अनंतं न' असा अर्थ केल्यास तो सयुक्तिक होईल काय? श्रुतींत असलेल्या पदांचा पूर्वापर विरोध न येतां अर्थ करणेंच उचित होय. या सर्व कारणामुळें सदर श्रुतीचा अर्थ श्रीमध्वाचार्यांनीं केलेलाच बरोबर होय. श्रीमध्वाचार्य म्हणातः—

यथा मृत्पिंडविज्ञानात् सादृश्यादेव मृन्मयाः ।
विज्ञायंते तथा विष्णोः सादृश्याज्जगदेव च ॥
यथा स्वर्णस्य विज्ञानात् सर्वे लोहमयास्तथा ।
प्राधान्याद्विष्णुविज्ञानाद्विज्ञातं स्याज्जगत्सदा ॥
अत्यल्पेपि हि विज्ञाते सदृशे तादृशं बहु ।
ज्ञायते नखकृंतन्या यथा सर्वमयोमयम् ॥
किमु विष्णोर्बहोर्ज्ञानादत्यल्पं जगदीदृशम् ॥

[ज्याप्रमाणें मातीच्या गोळयांच्या ज्ञानानें, सुवर्णाच्या, अगर लोखंडी नराणीच्या ज्ञानानें, सर्व मृत्तिकेचें, सुवर्णाचें अगर लोखंडाचें ज्ञान होतें तद्वत् श्रीहरीच्या ज्ञानानें अत्यल्प जगताचेंहि ज्ञान होतें.]

या ठिकाणीं विकारत्व विवक्षा केली तर एक पिंड, मणि, नामधेय इत्यादि शब्दांना व्यर्थत्व येईल. तसेंच विकार मिथ्या आहेत असा अर्थ केला तर "मृत्तिकैव सत्यं, लोहएव सत्यं" एवढ्या वाक्यानेंहि अर्थ सिद्ध झाला असतां "नामधेयं" आदि शब्दाची कांहीं जरुरी नव्हती. म्हणून "वाचारंभणं" या श्रुतीच्या अर्थ पुढील प्रमाणेंच करावा.

मृत्तिकादि नामें संस्कृत म्हणून अपौरुषेयत्वामुळें नित्य होत. माती वगैरे नांवें प्राकृत म्हणून अनित्य होत. तद्वत् ब्रह्म नित्य जगत् अनित्य असें जाणावें.

सत्य शब्दाचा अर्थ "सत्वेन कालतः ततं ज्ञायते" असा आहे. या सत्य शब्दाच्या अर्थाप्रमाणें श्रीमध्वाचार्यांनीं केलेला अर्थच बरोबर आहे.

शब्दानें; नांवानें केला जाणारा कार्यव्यवहार हा सत्य आहे. मूळ कारणाच्या ज्ञानानें कार्यरूप विकाराचें ज्ञान होतें. “ विविधत्वेन कर्तुं योग्यः विकारः ” असा विकार शब्दाचा अर्थ आहे.

शंकराचार्यांनीं या श्रुतींत “ मात्र ” हा नसलेला शब्द योजून या श्रुतीचा अर्थ करण्याचा प्रयत्न केला आहे. तो बरोबर नाहीं. ही श्रुति जगाचें मिथ्यात्व प्रतिपादन करीत नसून सत्यत्व प्रतिपादन करण्याकरितांच प्रवृत्त झाली आहे. कार्य जर मिथ्या ठरलें तर कार्याभिन्न कारण हेंहि मिथ्या कां ठरूं नये ? अगर कारण जर सत्य असेल तर कारणाभिन्न कार्यहि सत्य कां ठरुं नये ? एखाद्या गावांतील प्रमुख मंडळींना भोजन दिलें असतां सर्व गावांस भोजन दिलें असें म्हटलें जातें, तद्वत् गुणपरिपूर्ण श्रीहरीच्या ज्ञानानें सर्व कांही सत्य म्हणून ज्ञात होते असा तात्पर्यार्थ या श्रुतीचा आहे.

अशा तऱ्हेचा सरलार्थ सोडून नसलेलीं पदें योजून श्रुतीचा अर्थ करणें योग्य आहे काय ? याचा विचार करावा.

याप्रमाणें अद्वैतवाद्यांनीं ‘ वाचारंभणं ’ ही श्रुति मिथ्यात्व प्रतिपादक आहे असें जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं.

यानंतर “ ऐतदात्म्यमिदं ” या श्रुतीचा विचार करूं. सदर श्रुति छांदोग्य उपनिषदांत असून तिचा अर्थ शंकराचार्यांनीं पुढील प्रमाणें केला आहे.

२ ‘ **ऐतदात्म्यमिदं सर्वं तत्सत्यं** ’ ( छांदोग्योपनिषद् ) एतत्–सत् परमात्मा ज्याचा आत्मा आहे असा तत् एव– परमात्माच सत्य– परमार्थतः सत्य आहे. तो परमात्मा तूं आहेस.

या श्रुतीवरून जगताला कारणीभूत असणारें सदाख्य ब्रह्म सत्य व तदितर पदार्थ मिथ्या असा शंकराचार्यांचा अभिप्राय आहे. सदर श्रुतीचा अर्थ मिथ्यात्वपर करण्यासाठीं श्रुतींत नसलेला “ एव ” हा शब्द योजावा लागला आहे. साक्षात् श्रुतिवाक्यांत मिथ्यात्वबोधक असें पद नाहीं. अशा स्थितींत बाहेरच्या ‘ एव ’ या पदाची योजना करून “ तत् एव सत्यं–ते परब्रह्मच सत्य व तदितर जगत् मिथ्या होय.” असा अर्थ कां करावा ? यापेक्षां द्वैतवादी करतात तसा अर्थ करणें श्रेयस्कर होय. द्वैतवादी पुढीलप्रमाणें अर्थ करतात:—

**इदं सर्वं ऐतदात्म्यं इदं सर्वं–हें सर्व जगत् ऐतदात्म्यं– एषः आत्मा स्वामी अस्य इति एतदात्माः—**

( ऐतदात्म्य या पदांतील विग्रह–हा परमात्मा याचा–जीवाचा, जगताचा स्वामी आहे म्हणून एतदात्म्य तेंच ऐतदात्म्य–हा परमात्मा याचा स्वामी आहे म्हणजे हें सर्व जगत् त्या परमात्म्याच्या अधीन आहे. अतएव **तत्**– तें जगत् सत्यं–खरें आहे. तो परमात्मा गुणपरिपूर्ण आहे व तूं (अल्पगुणी) आहेस. म्हणून तूं **अतत्**–त्याच्याहून सर्वथा भिन्न निराळा **असि**- आहेस.

तात्पर्य, सर्व जगत् परमात्म्याच्या अधीन आहे. म्हणूनच ते जगत् सत्य आहे. तो परमात्मा गुणपरिपूर्ण आहे व तूं ( अल्पगुणी ) आहेस, म्हणून सर्वथा त्याच्याहून तूं भिन्न आहेस.

या प्रमाणें या श्रुतीचा अर्थ आहे. या ठिकाणीं श्रुतिवाक्याच्या बाहेरचा एकादा शब्द घेण्याची जरुरी पडत नाहीं.

याप्रमाणें हें वाक्यहि जगताला मिथ्यात्व प्रदर्शित करणारें नसून हें वाक्य जगताचें उलट जगत्सत्यत्वप्रदर्शकच आहे.

यानंतर तिसऱ्या श्रुतीचा विचार करूं.

**इदं सर्वं यदयमात्मा** ( बृहदारण्यक )

अद्वैत मताप्रमाणें–'हें सर्व जगत् परमात्म्याचें ठिकाणीं कल्पित आहे.' असा अर्थ असून या श्रुतीवरील शंकराचार्यांचें भाष्य पुढीलप्रमाणें आहे. **यस्मादात्मनो जायते आत्मनि एव लीयते। आत्ममयं च स्थितिकालः आत्मव्यतिरेकेण अग्रहकेणात् आत्मैव सर्वं** (बृह०भाष्य२·४-४)

[ ज्या अर्थी परब्रह्मापासून उत्पन्न होतें. परब्रह्मांतच जगत् लीन होतें. आणि परब्रह्मामुळें या जगताचें पालन होतें. म्हणून परब्रह्माव्यतिरिक्त अन्य कांहीं नसल्यामुळें सर्व परब्रह्मच होय. ]

तात्पर्य श्रुतींत असणाऱ्या 'अयं आत्मा' या वाक्याचा अर्थ 'आत्म्याचें ठिकाणीं कल्पित' असा शंकराचार्यांनीं गौण अर्थ केला आहे. या सर्व श्रुतिवाक्याचा मुख्यार्थ सोडून शंकराचार्यांनीं केलेला गौण अर्थच कां घ्यावा? श्रीमध्वाचार्य या श्रुतिवाक्याचा अर्थ 'हे सर्व जगत् त्या परमात्म्याच्या अधीन आहे' असा करतात. श्रुतीतील पूर्वापार

वाक्यांचा विचार केल्यास श्रीमध्वाचार्यांनीं केलेला अर्थच योग्य आहे, हें वाचकांस कळून येईल. या ' इदं सर्वं यदयमात्मा ' वाक्याच्या अगोदर पुढील प्रमाणें वाक्यें आहेत.

**सर्वं तं परादात् योन्यत्रात्मनः सर्वं वेद। इदं ब्रह्म इदं क्षत्रं इमे लोकाः इमे देवाः इदं सर्वं यदयमात्मा** [ तात्पर्यार्थ, जो कोणी अन्यत्र परमात्म्याला सोडून स्वतंत्र आपल्या सत्तेनें राहणारा आहे असें जो जाणतो त्याला ब्रह्म-ब्राह्मण आपल्या श्रेयो मार्गापासून भ्रष्ट करतो. या प्रमाणें क्षत्रिय लोक, देव, भूतें इत्यादि सकल पदार्थ परमात्म्यावांचून स्वातंत्र्यानेंच आहेत असें जे जाणतात. ते क्षत्रियादि पदार्थ स्वतंत्र मानणाऱ्यांचा तिरस्कार करतात. ]

या पूर्व वाक्यानें सर्व पदार्थ स्वतंत्र नसून परमात्म्याच्या अधीन आहेत असेंच सिद्ध होत असल्यामुळें श्रीमध्वाचार्यांनीं 'जगत् परमात्म्याचे ठिकाणीं आश्रित आहे' हा जो अर्थ केला आहे तोच बरोबर होय. या वाक्याच्या पूर्वी असलेल्या ' सर्वाः प्रजाः सदायतनाः ' या वाक्यानेंहि सर्व प्रजा परमात्म्याच्या अधीन आहेत असें सांगणेंच श्रुत्यभिप्रेत होय. परमात्म्याच्या अधीन जर जगत् आहे तर तें मिथ्या कसें असेल ? तात्पर्य हें वाक्यहि शंकराचार्य म्हणतात त्याप्रमाणें या श्रुतिवाक्यांत मिथ्यात्वबोधक पद नाहीं. या वाक्यांचा अर्थ पदशः पुढीलप्रमाणें करावा.

**इदं सर्वं यत् अयं आत्मा।**

यत्-यस्मिन्- ज्याचे ठिकाणीं ( ब्राह्मण क्षत्रियादि समस्त जगत् ) आश्रित आहे. अयं-हा ( आश्रयदाता ) परमात्मा होय.

यावर अशी शंका येईल कीं श्रुतिवाक्यांत असलेल्या ' यत् ' या प्रथमांत पदाचा 'यस्मिन्' असा सप्तमीचा अर्थ करणें युक्त आहे काय ?

यावर समाधान असें आहे:-- 'यत्' या पदाचा अर्थ सप्तम्यंत करतां येतो. कारण काव्यादिकांत एखाद्या ठिकाणीं 'तत्' असें असेल तर त्याचा अर्थ 'तत्-तस्मात्' असा पंचमीचा अर्थ करतात. त्याप्रमाणें याठिकाणीं 'यत्' याचा 'यस्मिन्' असा सप्तमीचा अर्थ करण्यास कांहीं व्याकरणाची आडकाठीं नाहीं.

याप्रमाणें "आत्म्याचें ठिकाणीं कल्पित" असा शंकराचार्यांच्या मताप्रमाणें अर्थ केल्यास पूर्ववाक्यांचा विरोध येतोच. शिवाय 'यत्' या पदाला वैय्यर्थ येते. कारण 'इदं सर्वं आत्मा' (हे सर्व परब्रह्म आहे) यानेंच अद्वैताभिमत अर्थाची सिद्धि झाली असती. 'यत्' या पदाचें प्रयोजन नसल्यामुळें त्यांस वैय्यर्थ येईल. म्हणून श्रीमध्वाचार्यांनीं केलेला अर्थच बरोबर होय. त्यामुळें कोणत्याहि पदास वैयर्थ्य येत नाहीं.

एवंच या श्रुतींतहि मिथ्यात्वबोधक पद नसल्यामुळें अगर तसा अर्थहि होत नसल्यामुळें ही श्रुति विश्वमिथ्यात्व प्रतिपादन करते हें म्हणणें योग्य नाहीं. यानंतर पुढील श्रुतीचा विचार करूं.

**ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठं** (मुंडक २-२-११) या श्रुतीचा अद्वैतमताप्रमाणें पुढील प्रमाणें अर्थ आहे. इदं सर्वम्-हें सर्व (जगत्) ब्रह्मैव-ब्रह्माचें ठिकाणीं कल्पित आहे. विश्वं इदं वरिष्ठं-हें जग वरिष्ठ, अत्युत्तम (श्रेष्ठ) आहे. यावरील शांकर भाष्य असें आहे.

**किंबहुना ब्रह्मैवेदं विश्वं समस्तमिदं जगद्वरिष्ठं वरतमम् । अब्रह्मप्रत्ययः सर्वः अविद्यामात्राः रज्जाविव सिर्पप्रत्ययः । ब्रह्मैवेकमिति परमार्थसत्यमिति वेदानुशासनं ।। ।।** (शांकर भाष्य मुं.)

[तात्पर्यार्थः- हें ब्रह्मच विश्व होय. हें जगत् वरतम (श्रेष्ठ) आहे. ब्रह्माहून सर्व भिन्न आहे हा प्रत्यय अविद्येनें भासणारा आहे. जसा दोरीचें ठिकाणीं सर्पाचा भास होतो तसा. परमार्थतः परब्रह्मच सत्य होय. असा वेदाचा उपदेश आहे.]

याप्रमाणें अद्वैतमतरीत्या विश्वमिथ्यात्वाविषयीं सदर श्रुति प्रमाण म्हणून मानली जाते. पण हें निर्मूल आहे. कारण विश्वमिथ्यात्वबोधक असें पद या श्रुतिवाक्यांत नाहीं. याठिकाणीं 'ब्रह्म' या शब्दाचा अर्थ 'ब्रह्माचे ठिकाणीं कल्पित' असा करून सर्व विश्व हें ब्रह्माचें ठिकाणीं कल्पित असा अन्वय लावून अर्थ करतात. आणि ही श्रुति मिथ्यात्वाची बोधक आहे असें अद्वैती मानतात.

या श्रुतिवाक्याचीं पूर्व वाक्यें पुढीलप्रमाणें आहेत "आत्मा पूर्वेला आहे. आत्मा दक्षिणेला आहे. तोच वर आहे. तोच खालीं आहे"

याप्रमाणें पूर्व वाक्यें आहेत. हें सर्व प्रकरण परब्रह्माचें सर्वव्यापकत्व सांगण्याकरितांच प्रवृत्त झालें आहे. म्हणून सर्वव्यापकत्व सांगतांना एकच वाक्यानें विश्वमिथ्यात्व सांगण्याचें प्रयोजन काय ? उत्तरवाक्यांतूनहि जीवानें परमात्म्याची उपासना कशी करावी याचेंच विवेचन केलेलें आहे. वर उल्लेखित वाक्य मुंडकोपनिषदाच्या द्वितीय खंडात आहे. त्या खंडाच्या प्रारंभी 'परमात्मा हृदयांत आहे. ज्योतीमध्यें आहे. सूर्यांत आहे.' असें सांगितलें, त्यावर कदाचित् अशी शंका येईल कीं 'परमात्मा कांहीं विशिष्ट स्थळांत असून तो मर्यादित आहे कीं काय ?' ही शंका जमेस धरून श्रुति· वाक्यानें "परमात्मा एवढ्या विशिष्ट स्थळांतच राहात नसून तो सर्वव्याप्त आहे" हें सांगितलें आहे. किंबहुना, या सर्व उपनिषदांतच मिथ्यात्वबोधक वाक्यच नाहीं. हें उपनिषद्च मुळिं उपासना कशी करावी हें सांगण्याकरि· तांच प्रवृत्त झालें आहे.

यापेक्षां श्रीमध्वाचार्य करतात तो अर्थ उपनिषदोक्त विषयाला धरून आहे. त्यामुळें तोच अर्थ ग्राह्य होय. आचार्य म्हणतातः—

**इदं ब्रह्मैव विश्वं पूर्णं इदमेव वरिष्ठं सर्वोत्तमं । इदं शब्दानां बहुत्वाद्ब्रह्मविषय एव इदं शब्दः ।**

[ हें ब्रह्म पूर्ण आहे. सर्वोत्तम आहे. इदं शब्द हा ब्रह्मविषयक समजावा. ]

अशा तऱ्हेचा अर्थ करतांना मुख्यार्थ सोडावा लागत नाहीं. उपनिष· दांतील प्रतिपाद्य विषयालाहि विरुद्ध जात नाहीं.

एकूण तात्पर्य हें कीं, ही श्रुति परमात्म्याचें सर्वव्यापकत्व सागत असून विश्वमिथ्यात्व मुळिंच सांगत नाहीं. अत एव सदर श्रुति विश्वमिथ्या· विषयीं प्रमाण म्हणून मानतां येत नाहीं.

यानंतर दुसऱ्या श्रुतीचा विचार करूं.

**आत्मैवेदं सर्वम्** ( छांदोग्य ७–२५–२. )

आत्म्याचें ( परब्रह्माचे ) ठिकाणीं हें सर्व जग कल्पित आहे. असा अर्थ अद्वैतवादी करतात.

याठिकाणीं "आत्मा, इदं, सर्वं" हीं सर्व पदें एकाच विभक्तीचीं आहेत. त्यामुळें "आत्मा (परब्रह्म) हें सर्व आहे." असा याचा मुख्यार्थ होतो. म्हणजें आत्मा व जगत् हें अभिन्न आहेत असा अर्थ प्रतीत होईल. मग जग मिथ्या व परब्रह्म सत्य, तेव्हां सत्य व मिथ्या याच्यांत अभेद असूं शकणार नाहीं. म्हणून मुख्यार्थ सोडून हे सर्व जगत् आत्म्याचें ठिकाणीं कल्पित" असा अर्थ गौणार्थ घ्यावा, असें शंकराचार्यांच्या मताचें तात्पर्य आहे. हा अर्थ करण्याकरितां अनवस्था, अन्योन्याश्रय इत्यादि दोष येतात.

जग हें मिथ्या आहे हें ठरल्यावांचून वरील श्रुतीचा "आत्म्याचे ठिकाणीं कल्पित" असा अर्थ करतां येत नाहीं. व सदर गौणार्थ केल्याशिवाय विश्वमिथ्यात्व सिद्ध होत नाहीं. अशा तऱ्हेची परंपरा किती काल लांबावयाची? म्हणून शंकराचार्यांनीं केलेल्या अर्थास अनवस्थादि अनेक दोष येतात. याशिवाय पूर्वापार वाक्यांचा विचार केला असतां अद्वैती जनांना अभिमत असणारा अर्थ जुळत नाहीं. मुंडकोपनिषदाप्रमाणें छांदोग्य उपनिषदांत हें वाक्यहि परमात्म्याचें सर्वव्यापकत्व सांगण्याकरितां प्रवृत्त झालें आहे. या वाक्याचें पूर्ववाक्य पुढील प्रमाणें आहे.

**आत्मैवाधस्तात् आत्मा उपरिष्टात् आत्मा पश्चात् आत्मा दक्षिणतः आत्मा उत्तरतः**

[ आत्मा खालीं आहे. आत्मा वर आहे. आत्मा मागें आहे. दक्षिणेस आहे. उत्तरेस आहे. ]

'आत्मैवेदं सर्वं' हे आत्मा सर्वत्र व्यापून आहे असें पुढें वाक्य आहे. यांत 'सर्व' या पदाचा अर्थ सर्व व्यापक असा करण्यास हरकत नाहीं. कारण "सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः" (गीता. अ. ११–४०)– तूं सर्वांस व्यापून आहेस म्हणून तूं सर्व आहेस.

या श्लोकावरील शांकरभाष्यहि असेंच आहे.

"**सर्वं समस्तं जगत् समाप्नोषि ततः सर्वःत्वं असि**" या प्रमाणेंच या श्रुतीचा अर्थहि वरीलप्रमाणेंच कां करूं नये? द्वैतवादी सदर छांदोग्य श्रुति परमात्म्याचें सर्व व्यापकत्व सांगते असें पूर्वापार वाक्यांचा

विचार करून म्हणतात—आत्मैव इदं सर्वं— परमात्माच याला व्यापक आहे.

याप्रमाणें शंकराचार्य ज्या ज्या श्रुति विश्वमिथ्यात्वाच्या बोधक आहेत असें समजतात त्या विश्वमिथ्यात्वाच्या बोधक नाहींत.

यानंतर ज्या ब्रह्मसूत्रांत वरील श्रुति आधार म्हणून शंकराचार्यांनीं घेतल्या आहेत तें ब्रह्मसूत्र तरी विश्वमिथ्यात्व सांगतें कीं काय याचा विचार करूं.

**तदनन्यत्वमारंभणशब्दादिभ्यः** ( ब्रह्मसूत्र अ.२–११४ )

शांकरभाष्याप्रमाणें या सूत्राचा अर्थ पुढीलप्रमाणें आहे.

**तदनन्यत्वं**– त्या कारणब्रह्माहून कार्यभूत जगाचें अनन्यत्व पृथक्–सत्तारहित्य आहे. कोणत्या कारणानें ? आरंभण शब्दादि कारणामुळें ( शा. भा. बापट कृत )

**तात्पर्य:**– या सूत्रांत 'तदनन्यत्वम्' व 'आरंभणशब्दादिभ्यः' असे दोन भाग आहेत. 'तदनन्यत्वम्' हें अभिप्रेत अर्थाला कळविते व अभिप्रेत अर्थाला प्रमाण कळविणारा 'आरंभणशब्दादिभ्यः' हा भाग आहे. या सर्वांमधून असा अर्थ शांकरमताप्रमाणें निघतो.

हें कार्य जगत् कारण ब्रह्माहून निराळें नाहीं. अत एव ते मिथ्या आहे.

कारण 'अनन्यत्व' याचा अर्थ "ब्रह्मव्यतिरेकेण अभावः" (ब्रह्मा-वांचून दुसरा पदार्थ नाहीं) असा केला आहे. याला श्रुतिप्रमाण "वाचा-रंभणं, ऐतदात्म्यं, इदं सर्वं, आत्मैवेदं," इत्यादि आहेत. या सर्व श्रुति जगाला ब्रह्मव्यतिरेकेण अभाव (मिथ्यात्व) सांगतात. म्हणन नाम-रुपमात्र असणारें ब्रह्मव्यतिरिक्त सर्व जगत् मिथ्या आहे.

**कार्यं आकाशादि बहुप्रपंचं जगत् कारणं च परब्रह्म तस्मात्का-रणात् परमार्थतोऽनन्यत्वं व्यतिरेकेण अभावः कार्यस्य अवगम्यते।**

[ याप्रमाणें आकाशादि बहुप्रपंचानें युक्त असलेलें हें सर्व जग त्याला कारण परब्रम्ह, त्या कारणाहून कार्यास परमार्थतः मिथ्यात्व आहे असें जाणलें जातें. ]

याप्रमाणें सदर सूत्र मिथ्यात्वप्रतिपादक आहे असें अद्वैतवादी म्हणतात. पण या सूत्रार्थाचा विचार केल्यास त्यांतून असा मिथ्यात्त्वपर अर्थ निघूं शकत नाहीं. कारण या सूत्रार्थाचे वेळीं 'जगत्' हें पद बाहेरुन घ्यावें लागतें. शिवाय मिथ्यात्वबोधक पद या सूत्रांत नाहीं. अनन्यत्व या पदाचा अर्थ 'मिथ्या' असा होत नाहीं. जगत् हें पद बाहेरुन घ्यावें या विषयीं कांहीं प्रमाण नाहीं. व तत् या पदाचा अर्थ 'ब्रह्म' असा घ्यावा यांसहि कांहीं आधार नाहीं. वास्तविक पहातां 'परमात्मा हा जगाचा स्वतंत्र कर्ता आहे. त्यांस अन्यसाधनाची जरुरी नाही' या सिद्धान्तास कित्येक अनुमानद्वारा विरोध दर्शवितात. त्या अनुमानाच्या निराकरणार्थ हें सूत्र प्रवृत्त झालें आहे. विरोधि अनुमान पुढीलप्रमाणें आहे:–

**"महदादि सृष्ट्यादिकं कर्तृव्यतिरिक्त बहुसाधनसापेक्षं सृष्टित्वात्, स्थितित्वात् संहृतित्वात् घटादि सृष्ट्यादिवत्"**

महदादि सृष्टिस कर्त्याशिवाय अनंत साधनांची अपेक्षा आहे. जी सृष्टि उत्पन्न होते तिचें पालन व तिचा संहार होतो म्हणून. घटादिकांच्या सृष्टिप्रमाणें. घटादिकांच्या सृष्टीस ज्याप्रमाणें कुंभ तयार करणाऱ्या कुंभारास अन्यसाधनाची जरूरी असते त्याप्रमाणें परमात्म्यासहि अन्यसाधनाची जरूरी असेल अशी शंका आल्यास त्याचें उत्तर या सूत्रानें देतात.

तदनन्यत्वम्- जगाला कारण त्या परमात्म्यावांचून अन्य कोणी नाहीं व त्यांस अन्यसाधनाची अपेक्षा नाहीं हे आरंभण शब्दादिकांवरून जाणावें. या ठिकाणीं आरंभण (साधन) शब्द करणवाचक आहे. "आरभ्यते अनेन इति आरंभणं" (ज्यानें आरंभ केला जातो तें आरंभण– साधन) **किं–स्विदासीत अधिष्ठानमारंभणं कतमत्स्वित्**

अगदीं प्रारंभीं, प्रलयकालीं, अधिष्ठान, साधन कोणतें होतें? याचें उत्तर कोणतेहि साधनाची जरूरी त्या सर्वतंत्रस्वतंत्र परमात्म्यास नाहीं. असें उत्तर वरील श्रुतीनें दिलें जातें. आरंभणशब्दानें वरील श्रुति घ्यावी म्हणून आचार्यांनीं आपल्या भाष्यांत पुढीलप्रमाणें या सूत्राचे तात्पर्य या श्रुतीच्या आधारें दिग्दर्शित केलें आहे.

परतंत्रो ह्यपेक्षेत स्वतंत्रः किमपेक्षते ।
साधनानां साधनत्वं यतः किं तस्य साधनैः ॥

[ परतंत्र असणाऱ्यांस अन्य साधनाची जरूरी आहे. स्वतंत्र कशाची अपेक्षा करतो ? जो साधनांना साधनत्व देतो त्याला साधनाची जरूरी काय ? ]

याप्रमाणें सदर सूत्र परब्रह्मांस जगत्सृष्ट्यादिक करण्याकरितां अन्य साधनाची अपेक्षा नाहीं हें सांगण्यासाठीं प्रवृत्त झालें आहे. या द्वितीयाध्यायांतील प्रथमपादांत सर्वत्र ब्रह्मच जगत्कारण आहे, अन्य कोणी नाहीं हा विषय प्रतिपादन केला आहे.अशा स्थितींत मध्येंच एका सूत्रानें प्रकरणाशीं असंबद्ध असें जगन्मिथ्यात्व कसें प्रतिपादलें जाईल ?

जगन्मिथ्यात्वास अद्वैतवाद्यांकडून स्वप्नदृष्टांत दिला जातो याचा विचार करूं.

ब्रह्मव्यतिरिक्त सर्व पदार्थ जर मिथ्या आहेत तर, त्यावर आक्षेपकांनीं विचारलें कीं, हे सर्व मिथ्या आहेत तर मिथ्याज्ञानानें सत्य असणाऱ्या परब्रह्माचें ज्ञान कसें होतें ? या प्रश्नाला स्वप्नाचा दृष्टांत देऊन उत्तर दिलें आहे.जसें स्वप्न पाहात असतां स्वप्नकालीं त्याला हें सर्व मिथ्या आहे याचे ज्ञान नसतें. पण जागृतावस्थेंत जसें स्वप्न हें मिथ्या वाटतें, तसेंच खोट्या असणाऱ्या स्वप्नांतील वस्तूंच्या दर्शनानें जागृतावस्थेंत पुढें होणाऱ्या गोष्टी सुचविल्या जातात. उदाहरणार्थ, स्वप्नांत आपण काळाकभिन्न पुरुष पाहिला असतां तें कृष्णपुरुषदर्शन अनिष्ट असतें. तद्वत् अपरमार्थभूत असणाऱ्या वाक्यानें परमार्थतः सत् असणाऱ्या परब्रह्माचें ज्ञान होऊं शकतें. तात्पर्य हें कीं, असत्य ज्ञानापासून सत्य ज्ञान होऊं शकतें. याप्रमाणें स्वप्नाचा दृष्टांत देऊन शंकराचार्यांनीं असत्य ज्ञानानें सत्य असणाऱ्या परब्रह्माचें ज्ञान होतें हें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. हा सर्व विचार निर्मूल आहे.स्वाप्न पदार्थ हे खोटें नसून खरें आहेत. म्हणजे " ज्या पदार्थांचें ज्ञान बाधित होते ते मिथ्या होय. रज्जूवर सर्पाचें जें ज्ञान होतें तें बाधित होत असल्यामुळें तें मिथ्या होय. याप्रमाणें स्वप्नांत दिसणारे पदार्थ मिथ्या कसे ठरतील ? स्वप्न पाहणाऱ्यांस जागृतावस्थेंतहि स्वप्ना-

मध्यें मी अमके अमके पाहिलें असें ज्ञान असतेच. स्वप्नांत पाहिलेल्या पदार्थांचें ज्ञान बाधित होत नाहीं. जर तें स्वप्नपदार्थज्ञान बाधित होत नाहीं, तर त्यांस मिथ्या कसें म्हणतां येईल?

एका अवस्थेंत पाहिलेला पदार्थ आपणांस अन्य अवस्थेंत कालांतरानें दिसला तर त्या पहिल्या अवस्थेस मिथ्या कसें म्हणतां येईल? बाल्यावस्थेंत पाहिलेला मनुष्य तारुण्यावस्थेंत (बाल्यावस्थेप्रमाणें) दिसला नाहीं म्हणून त्या मनुष्याचें बाल्यावस्थेचें ज्ञान अगर बाल्यावस्था मिथ्या कशी म्हणतां येईल?

सामान्यत: ज्यांस उपादान व निमित्तकारण असून अधिष्ठान आहे त्यांस मिथ्या म्हणतां येत नाहीं.स्वप्नाला मनांतील वासना ही उपादानकारण असून परमात्मा निमित्तकारण आहे. अशा स्थितींत स्वप्नांना मिथ्या कसें म्हणतां येईल?

श्रीहरी हा आपल्या विचित्र स्वप्नसृष्टीनें पुढें घडणाऱ्या गोष्टी दाखवून देतो व निरनिराळ्या प्रकारचीं स्वप्नें ही शुभाशुभसूचक असतात हें अनुभवसिद्ध आहे. स्वप्नांविषयीं फार झालें तर एवढेंच म्हणतां येईल कीं स्वाप्न पदार्थांचा जागृतावस्थेंत कांहीं फारसा उपयोग नाहीं. पण उपयोग नाहीं म्हणून त्यांस मिथ्या म्हणतां येणार नाहीं. लोकांत "स्वप्नवत्" असा दृष्टांत दिला जातो त्यांत त्याचा अर्थ "मिथ्या" हा अभिप्रेत नसतो. तर अनित्य कांहीं काल टिकणारा हा अर्थ अभिप्रेत असतो; अनित्य पदार्थांस मिथ्या म्हणतां येणार नाहीं.

याप्रमाणें या स्वप्नदृष्टांतावरूनहि विश्वमिथ्यात्व सिद्ध करतां येत नाहीं. एवंच जगत् असत्य आहे यांस प्रत्यक्ष, अनुमान, आगम यापैकीं कोणतेंहि प्रमाण नसल्यामुळें विश्वमिथ्यात्व सिद्ध होत नाहीं.

अद्वैतवादी मिथ्या म्हणजे–अनिर्वचनीय–म्हणजे 'सदसद्विलक्षण' असा अर्थ करतात. मिथ्या म्हणजे अनिर्वचनीय (न सांगतां येण्याजोगें) असा अर्थ केल्यास "परब्रह्महि अनिर्वचनीय असल्यामुळें त्यांस मिथ्यात्व येईल" म्हणून मिथ्या म्हणजे अनिर्वचनीय व अनिर्वचनीय म्हणजे सत् नव्हें, असत् नव्हें, तर सदसद्विलक्षण होय असें सांगितलें. हा अर्थ वाचल्यानंतर एका हरदासी नकलेचें स्मरण येतें.

एका राजाजवळ एक राघू होता. तो त्याला अतिशय प्रिय असल्यामुळें त्याच्या शुश्रुषेसाठीं अनेक नोकर त्यानें ठेवले होते. त्या राघुचे कांहीं कमीजास्त झाल्यास नोकरांना शिक्षा दिली जाईल असें सक्त बजावलें होते. कर्मधर्मसंयोगानें तो राघु एके दिवशीं मेला. आतां काय करावें ? या विचारांत नोकर पडले ? तेव्हां त्यापैकीं एका हुषार नोकरानें सांगितलें कीं, मी सर्व व्यवस्था करतो. तुम्ही घाबरूं नका. असें इतरांस आश्वासन देऊन तो राजाकडे आला. त्या नोकरांस पाहून राजानें विचारलें:--

" कायरे, राघु ठीक आहे ना ?
" होय महाराज,
" राघु काय करतो आहे ?
" स्वस्थ डोळे मिटून पडला आहे. .
" आवाज करतो काय ?
" नाहीं महाराज.
" हालचाल करतो काय ?
" नाहीं महाराज.
" राघु खातो, पितो काय ?
" नाहीं महाराज.
" हालचाल व श्वासोच्छ्‌वास घेतो काय ?
" नाहीं महाराज.
" अरे, तर मग तो राघु मेला कीं काय ?
" नाहीं महाराज.
" मग तो अजून जिवंत आहे काय ?
" नाहीं महाराज.

याप्रमाणें तो राघु मेला असें त्या नोकरांस प्रत्यक्ष सांगावयाचें नसल्यामुळें त्यानें द्राविडी प्राणायामानें राजांस राघु मेल्याचें सुचविलें. तद्वत् या मिथ्या शब्दार्थाची स्थिति झाली आहे. शंकराचार्यांनीं मिथ्या शब्दाचे अर्थ कांहींहि केले तरी त्यांनीं " जग हें मिथ्या आहे" या म्हण-

ण्याला जें शुक्तिरजताचें, रज्जुसर्पाचे दृष्टांत दिले आहेत त्यावरुन मिथ्या म्हणजे खोटें हाच अर्थ प्रतीत होतो.

ज्या ज्या ठिकाणीं जगाचे सत्यत्व बोधक श्रुतिवाक्यें असतील तीं वाक्यें जगाचें व्यावहारिक सत्यत्व सांगतात, पारमार्थिक सत्यत्व सांगत नाहीत, असें शंकराचार्य म्हणतात. शंकराचार्य सत्याचें "१ पारमार्थिक सत्य २ व्यावहारिक सत्य ३ प्रातिभासिक सत्य" असे तीन प्रकार मानतात. हे सत्याचे तीन प्रकार मानण्यास आधार कांहीच देत नाहींत. अर्थात् आधार नाहीं असें म्हणण्यापेक्षां गप्प बसणें हेंच श्रेयस्कर होय.

याप्रमाणें जगन्मिथ्यात्वाच्या सिद्धिकरितां शंकराचार्यांनीं मानलेला अध्यासमूलक विवर्तवाद कोणत्याहि प्रमाणानें सिद्ध होत नाहीं हें आतांपर्यंत केलेल्या विवेचनानें अंशतः दाखविलें आहे.

आतां कित्येकजण—रामानुजाचार्य, निंबार्क, वल्लभाचार्य—जगत् हें ब्रह्माचा अविकृत परिणाम आहे असें जें म्हणतात त्याचा विचार करुं.

सामान्यतः परिणाम हा दोन प्रकारचा आहे.

१ एकः पूर्वावस्थासंकोचेन अवस्थांतरविशेषो अन्याधीनः।

(एक प्रकार असाः— वस्तुची पहिली अवस्था संकुचित होऊन दुसरा अवस्थाविशेष येतो. तो हा अवस्थांतरविशेष येणें हें दुसऱ्याच्या अधीन असतें. उदाहरणः— सुवर्ण. सुवर्णाचें अलंकारांत रूपांतर करावयाचें असल्यास तें अवस्थांतर सोनाराच्या स्वाधीन असतें. त्यांवर अनेक अनेक संस्कार करतात तेव्हां सुवर्णाची पहिली अवस्था संकुचित होऊन सुवर्ण अलंकाराच्या अवस्थेंस येतें.

२ अत्यंतपूर्वावस्थाप्रच्युत्या अवस्थांतरभावः।

[ वस्तुची पहिली अवस्था अजिबात सोडून नवीन रुप धारण करणें हा दुसऱ्या तऱ्हेचा परिणाम होय. उदाहरणार्थ—दहि—दुध आपलें पूर्वीचें रूप टाकून देऊन दह्याचें रूप धारण करतें. हा अवस्थांतरविशेषहि अन्याधीन आहे. अन्य पदार्थाचे साहाय्यावांचून जें दुध आपोआप हवेच्या परिणामामुळें दह्यांत परिणत होतें त्यांस दहि विरजलें असें न म्हणतां दुध नासलें असें म्हणतात. आणि त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं.

या प्रकारें कोणताहि परिणाम घेतला तरी आपोआप स्वतःच तो परिणाम होत नसून त्या वस्तूंस परिणत होण्यास दुसऱ्याची अपेक्षा आहेच. मग ब्रह्म जर सर्वज्ञ, सर्व शक्तिमान् आहे तर ब्रह्म जगदाकारानें परिणत होतें म्हणतांना दृष्टांताप्रमाणें तें अन्याधीन होतें असें म्हणणें म्हणजे ब्रह्माला कमीपणा आणणें होय; तें परब्रह्म सर्वज्ञ, सर्व शक्तिमान् नाहीं असें म्हटल्यासारखें होय. म्हणून पिता जसा पुत्रोत्पत्तीला निमित्तकारण आहे तद्वत् या जगदुत्पत्तिला परमात्मा निमित्त कारण आहे. उर्णनाभि ( कोळी ) हा स्वतः जाळयाच्या रुपानें परिणत न होतां त्याच्या तोंडातून जी लाळ पडते त्याचा परिणाम म्हणजे त्याचें सभोवतीं असणारें जाळें होय. तद्वत् परमात्म्याच्या इच्छामात्रें हें जग उत्पन्न होत असल्यामुळें तो परमात्मा जगास निमित्तकारण होय. लोकांतहि आपण पाहतों कीं, कुंभार हा घटास निमित्तकारण होतो. म्हणून तोच पुढें उपादानकारण होऊन घटरुपानें परिणत होत नाहीं. त्याप्रमाणें परमात्मा जगद्रूपानें परिणत होतो हें म्हणणें बरोबर नाहीं. श्रुति, परमात्मा प्राकृतरुपरहित, प्राकृतावयवरहित आहे असें कंठरवानें सांगत असतां त्याला प्राकृत विकारी ठरविणें हा श्रुतिद्रोह होय.

यावर कित्येक असें म्हणतील कीं, परब्रह्म हें साकल्यानें परिणत न होतां एका भागानें परिणत होते. म्हणजे त्यांस वरील दोष येणार नाहींत. पण हें म्हणणेंहि बरोबर नाहीं. ब्रह्माचा एक भाग अपरिणत व दुसरा भाग परिणत असा ब्रह्मस्वरुपांत भेद उत्पन्न होईल. परमात्म्याच्या स्वरूपांत भेद नाहीं असें ‘ नेह नानास्ति किंचन ’ इत्यादि श्रुति सांगतात. वरील प्रमाणें ब्रह्माचा एक भाग अपरिणत व दुसरा भाग परिणत हें मान्य केल्यास श्रुतिविरोध येतो. त्याच्या रूपांत भेद आहे असें अन्यथाज्ञान प्रकट केलें जाईल. म्हणून परमात्मा एका भागानें परिणत होतो हें म्हणणें बरोबर नाहीं.

परब्रह्म हें जगदाकारानें परिणत होतें तर जगद्रूपानें परिणत झालेल्या ब्रह्माचाहि जगताच्या नाशाबरोबर नाश होतो असें मानावें लागेल. त्यामुळें श्रुतिविरोध येईल !

एवंच, कोणत्याहि रीतिनें विचार केला, तरी जगताला उपादानकारण परमात्मा आहे हें म्हणणें प्रमाणाच्या विरुद्ध आहे. तें परब्रह्म कधींहि जगदाकारानें परिणत न होतां जगाच्या उत्पत्तीस निमित्तकारण आहे.

याप्रमाणे सर्व साधक बाधक प्रमाणांचा विचार केल्यानंतर खालील सिद्धान्त निश्चित ठरतो.

जगत् हें परमार्थतः सत्य असून तें प्रवाहतः अनादि आहे. त्यांस निमित्तकारण श्रीहरी-परब्रह्म आहे. व प्रकृति हीच साक्षात् वा परंपरेनें जगदुत्पत्तिस उपादानकारण आहे.



## प्रकरण ४ थें

# जीवेशभेद

गेल्या प्रकरणांत परमात्म्यानें निर्माण केलेलें हें जीवजडात्मक जगत् सत्य आहे असें प्रत्यक्ष, अनुमान व आगम या प्रमाणांनीं सिद्ध केल्या-नंतर जिज्ञासूंच्या मनांत एक प्रश्न उभा राहील. तो असा:—

शंकराचार्य हें जगत् मिथ्या मानीत असल्यामुळें, ब्रह्म सत्य व जगत् मिथ्या त्यामुळें त्यांच्यांत ऐक्य संभवत नसेल. पण तुम्ही द्वैतवादी जगत् सत्य व ब्रह्म सत्य मानतां,त्यामुळें त्या उभयतांत ऐक्य होणें जास्त संभवनीय आहे.या प्रश्नाच्या उत्तराकरितां हें प्रकरण आहे.मूळ श्लोकांत **'तत्त्वतो भेदः'** असें सांगितलें आहे. याचा अर्थ हा कीं, जीवजडात्मक जगत् व परमात्मा हे सत्य असले तरी याच्यांत भेद आहे. तो भेद परमार्थतः सत्य असून मोक्षस्थितींतहि हा भेद कायम राहतो. व हा भेद प्रत्यक्ष, अनु-मान व आगम या तीनहि प्रमाणांनीं सिद्ध होणारा आहे.

वास्तविक पहातां जगांत सर्वत्र भेद आहे हें सिद्ध करण्यासाठीं प्रत्यक्ष प्रमाणाची जरुरी नाहीं. कारण घट हा पटाहून निराळा आहे, यज्ञदत्ता-पेक्षां देवदत्त श्रीमान् आहे, हा जगांतील अनुभव नित्य प्रत्येकांस येत असतो. आंबा, पेरु, केळीं इत्यादि फळें रुचीमुळें भिन्न आहेत. गाय, घोडा, हत्ती, इत्यादि पशू त्यांच्या गुणधर्मांच्या भिन्नतेमुळें परस्परांहून भिन्न आहेत. इतकेंच नव्हे, तर सूक्ष्म धर्मांमुळें आंब्यांतहि, पेरुपेरु-मध्येंहि फरक आहेच. म्हणून नित्य अनुभवास येणारा हा परस्पर भेद प्रत्यक्षप्रमाणानें सिद्ध करण्याची जरूरी नाहीं. घडोघडीं प्रतीत होणारें भेद-ज्ञान सदोष नसल्यामुळें त्यास अप्रामाण्य देतां येत नाहीं. याचे उलट आपण सर्वज्ञ नसतां स्वतःस सर्वज्ञ समजणें, अधिकार नसतां आपण अधिकारसंपन्न आहों असें समजणें, विद्वान् नसतां विद्वान् समजणें या गोष्टीच भ्रमात्मक समजल्या जाऊन अशा तऱ्हेनें स्वतःस मोठा समजला जाणारा उपहासास्पद ठरला जातो, हें आपण नित्यशः पाहतों. म्हणून भेद

हा लोकांत नित्य दृष्टीस पडत असल्यामुळें त्याचें समर्थन करण्यासाठीं प्रत्यक्ष प्रमाणाची जरुरी नाहीं. याप्रमाणें भेद प्रत्यक्षसिद्ध नित्य, अनुभवास येतो असें म्हटल्यावर अशी शंका येईल कीं, लोकांत नित्यशः भेद दृष्टीस पडतो हें ठीक आहे. पण तसा भेद ईश्वर व जीव याच्यांत आहे कशावरून ? कारण आपण जगांत ज्या दोन पदार्थांत भेद अनुभवतो ते दोन पदार्थ आपण समक्ष पाहतो. म्हणून तो भेद अनुभवास येतो. जीव, जड व परमात्मा यांच्यांत भेद आहे असें सांगतांना परमात्मा समक्ष दृष्टीस पडत नसल्यामुळें जीव परमात्म्यांत भेद आहे असें कसें सांगतां येईल ? प्रत्यक्षांत जेथें भेद दाखविला जातो तेथें दोन पदार्थ प्रत्यक्ष असतात. म्हणूनच त्या पदार्थांत भेद दाखविला जातो.

याप्रमाणें शंका आल्यास त्याचें उत्तर देतातः—

भेद दाखविण्यास दोन पदार्थ समक्ष असले पाहिजेत हा कांहीं अबाधित नियम नाहीं. कारण "स्तंभः पिशाचोन—खांब पिशाच नाहीं" असें सांगतांना स्तंभ तेवढा प्रत्यक्ष दिसत असतो, पिशाच समोर नसतें. तरीहि स्तंभ व पिशाच याच्यांत असणारा भेद स्पष्ट होतोच कीं नाहीं ? याप्रमाणें परमात्मा हा जरी प्रत्यक्षांत दिसत नसला तरी इतर प्रमाणांवरून परमात्म्याचें ज्ञान होतेंच त्यामुळें जीव व परमात्मा यांच्यांत भेद आहे हें कळण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं.

याप्रमाणें नित्यशः भेद हा अनुभवास येत असल्यामुळें त्यास स्वतंत्र प्रत्यक्ष प्रमाण सांगून त्याचें समर्थन करण्याची जरुरी नाहीं. आतां हा भेद अनुमानप्रमाणानें सिद्ध करतां येतो कीं नाहीं हे पाहूं.

**"विमतौ भिन्नौ, विरुद्धधर्माधिकरणत्वात् दहनतुहिनवत्"**

[ विवाद्य असणारे जीव व ईश्वर हे भिन्न आहेत. कारण तें परस्परविरुद्ध असणाऱ्या धर्माला आश्रय आहेत. अग्नि व तुहिन—( शीतता ) यामध्यें जसा विरुद्धधर्मामुळें भेद आहे तसा जीव–परमात्म्यांत भेद आहे) जे दोन पदार्थ परस्पर विरुद्ध धर्माला आश्रय असतात त्या ठिकाणीं भेद नित्य असतो हा सार्वत्रिक नियम आहे. ]

या अनुमानाप्रमाणें जीव हा अल्पज्ञ आहे, तर परमात्मा सर्वज्ञ आहे. जीव परतंत्र व परमात्मा स्वतंत्र आहे. जीव हा अल्पगुणी तर परमात्मा गुणपरिपूर्ण आहे. तात्पर्य जीव व परमात्मा यांचे ठिकाणीं वर सांगितल्याप्रमाणें अनेक विरुद्ध धर्म असल्यामुळें त्या उभयतांत असणारा भेद नित्यच आहे.

जीव, परमात्म्यांत भेद आहे याविषयीं अनेक अनुमानें करतां येतील. त्यापैकीं आणखी एक अनुमान उदाहरणार्थ सांगतां येईल.

" विमतौ भिन्नौ सेव्यसेवकत्वात् राजभृत्यवत् "

[जीव व ईश्वर हे अत्यंत भिन्न आहेत. कारण त्यांचेमध्यें सेव्यसेवकत्व आहे. दृष्टांत राजसेवक होय. राजा व त्याचा सेवक त्यांच्यात सेव्यसेवक भावामुळें जसा भेद आहे तसा ज्या ठिकाणीं सेव्यसेवक भाव असेल तेथें नित्य भेद असतो हा नियम आहे. ]

याप्रमाणें परमात्मा हा सेव्य व जीव सेवक असल्यामुळें त्या उभयतांत असणारा भेद नित्य आहे. प्रत्येक सेवकानें आपला उत्कर्ष व्हावा एवढ्यासाठीं आपला जो प्रभु असेल त्याची सेवा करावी व त्या सेवेमुळें तो प्रभु संतुष्ट झाला कीं, नोकरांस श्रेष्ठ पद देतो. पण नोकरानें सेवा न करतां मी मालक अगर मीच राजा आहे असें म्हटल्यास तो राजा त्याचा नाश करतो.

घातयंति हि राजानो राजाहमिति वादिनः ।
ददत्यखिलमिष्टं च स्वगुणोत्कर्षवादिनाम् ।

[ मी राजा आहे असें म्हणणाऱ्या सेवकांस राजा शिक्षा करतो व त्याचे यथार्थगुणवर्णन करणाऱ्या सेवकांस अभीष्ट फल देतो. ]

या ठिकाणीं अशी शंका येण्याचा संभय आहे कीं:—

सेवकानें मी राजा आहे असें म्हटलें तर राजा त्यांस शासन करील हें मान्य ? पण एकादा राजपुत्र मी सेवक आहे अशा भ्रमानें वागूं लागला आणि पुढें तो भ्रम निवृत्त झाला तर तो राजा होऊं शकेल कीं नाहीं ? हा प्रश्न जरी आपाततः बरोबर असला तरी तो योग्य नाहीं. कारण 'सूर्य हा रात्रीच्या निबिड अंधःकारांत मोठ्या कष्टानें

वाट काढीत होता.' हें म्हणणें जितकें हास्यास्पद तितकाच वरील दृष्टांत हास्यास्पद होय. अद्वैतवाद्यांच्या मतानें ब्रह्म अज्ञानानें ग्रस्त होत असेल ! पण वैदिक मतानें केव्हांहिं परब्रह्मास अज्ञानाचा स्पर्शहि होत नाहीं. म्हणून ब्रह्म हें अज्ञानानें ग्रस्त होऊन 'मी सेवक आहे' असें कालत्रयींहि मानणार नाहीं.

याप्रमाणें ज्ञातृज्ञेयभावानेंहि जीवपरमात्म्यांत भेद आहे. वेदव्यासांनीं ब्रह्मसूत्रांत "अथातोब्रह्मजिज्ञासा" या सूत्रानें आपल्या इष्टप्राप्तिकरितां व अनिष्ट परिहार करण्याकरितां जीवानें ब्रह्मजिज्ञासा करावी असें सांगितलें आहे. श्रुतींतहि "तद्विजिज्ञासस्व" असें सांगितलें आहे. यावर जिज्ञास्य व जिज्ञासू हे दोन पदार्थ असल्यावांचून व त्यांत नित्य भेद असल्यावांचून जिज्ञासा संभवेल कशी ? म्हणून जिज्ञास्य व जिज्ञासू या भावानेंहि भेद आहेच.

याप्रमाणें जीवेश्वरभेदाविषयीं अनुमान प्रमाणहि आहे, याचें किंचित् दिग्दर्शन केलें आहे. प्रत्यक्ष व अनुमान प्रमाणाप्रमाणेंच जीव व ईश्वर यामध्यें नित्य असा भेद आहे याविषयीं आगमप्रमाणहि आहेच. खालीं दिलेल्या श्रुति जीवेश्वरभेदाविषयीं प्रमाण आहेत.

१ द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्यनश्नन्नन्योऽभिचाकशीति ।

[नेहमीं मिळून असणारें मित्र (एक उपकारक व दुसरा उपकार करून घेणारा) असे दोन पक्षाच्या रुपानें (ईश्वर व जीव) देहरूप एकाच झाडाला चिकटून आहेत. त्यापैकीं जीवरूप पक्षी अश्वत्थाचें फल देहानें केलेल्या कर्माचें फल गोड नसून गोड म्हणून खातो. दुसरा ईश्वररूप पक्षी. जीवानें संपादन केलेलें कर्मफल न उपभोगितां चोहोकडे प्रकाशतो. ]

या मुंडकोपनिषदांतील श्रुतिवरून जीव व परमेश्वर हें उभयतां भिन्न आहेत असेंच सिद्ध होतें.

२ भिन्नोऽचिन्त्यः परमो जीवसंघात् पूर्णः परो जीवसंघो ह्यपूर्णः ॥

३ सत्य आत्मा, सत्यो जीवः, सत्यं भिदा, सत्यं भिदा ।
४ जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशमस्य महिमानमिति वीतशोकः
( मुंडक ३–१–२ )

[ २ जीवसंघापासून श्रेष्ठ, पूर्ण, अचिन्त्य असा ( परमात्मा ) भिन्न आहे. ३ परमात्मा सत्य आहे. जीव सत्य आहे. भेद सत्य आहे. ४ सर्वांनीं सेवा करण्यास योग्य असा परमेश्वर जीवांहून भिन्न आहे. आणि तो परमात्मा, संपूर्ण कर्मांनीं आराधना करण्यास योग्य व सृष्टिकर्ता असें जेव्हां जीव जाणतो त्यावेळीं तो शोकरहित होतो. ]

सोऽश्नुते सर्वान् कामान् सह ब्रह्मणा विपश्चितेति ( तैत्तिरीय २-१ १ )

[ विपश्चिता ब्रह्मणासह सः सर्वान् कामान् अश्नुते । तो ब्रह्मदेवासह स्वयोग्य सर्व कामाचा अनुभव घेतो. ]

ह्या ऋचा पूर्वी आलेल्या शंकांचें निवारण करण्याकरितां म्हणून सांगितल्या आहेत. ब्रह्माचें लक्षण काय? तर त्याचें उत्तर 'सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म' या ऋचेनें उत्तर दिलें.

२ ब्रह्म कोठें आहे? या प्रश्नाला 'यो वेद निहितं गुहायां' या ऋचेनें उत्तर दिलें. ब्रह्मप्राप्ति नंतर काय होतें? या प्रश्नाचें उत्तर 'सोऽश्नुते कामान्' या ऋचेनें दिलें आहे. या उपनिषदांतील विवेचनावरून ब्रह्म जिज्ञासू व त्याचें स्थान वगैरे सर्व परमात्म्याहून भिन्न आहेत असेंच सिद्ध होतें.

६ आत्मानं परस्मै शंसति । तं ऋतं पिबंतौ सुकृतस्य लोके गुहां प्रविष्टौ परमे परार्धे तदर्धे । छायातपौ ब्रह्मविदो विदंति पंचाग्नयो येच त्रिनाचिकेता: ( कठोपनिषद ३–१ )

[ आपल्या देहांत अन्तर्यामीं असलेल्या परमेश्वराचें ध्यान करावें असें पूर्वी सांगितलें. त्यावर परमात्मा देहांत कोणत्या ठिकाणीं आहे हें सांगण्यासाठीं यम नचिकेतास म्हणतो, 'पुण्य भूमीवर पुण्यानें निर्माण झालेल्या शरीरांतील हृदयरूप गुहेंत, सर्व जीवांत उत्तम व ज्ञानादिकांनीं पूर्ण अशा मुख्यप्राणाच्या ठिकाणीं असलेली व पुण्यफलाचा उपभोग घेणारीं अशीं आत्मा व अंतरात्मा ही दोन ( विष्णुचीं ) रूपें आहेत; असें ब्रह्मज्ञानी व

जे पंचमहायज्ञ करणारे आहेत ते व ज्यांनीं नाचिकेत अग्नीची उपासना केली आहे ते म्हणतात.]

या श्रुतिवरून उपास्य–उपासक–भावानेंहि परमात्मा व जीव यांच्यांत भेद आहे असेंच सिद्ध होतें.

७ य उ त्रिधातु पृथिवीमुतद्यामेको दाधार भुवनानि विश्वा।
(ऋ. १–४–४)

'जो या संपूर्ण ब्रह्मांडाला आधार आहे' असें या वेदवाक्यानें सांगितल्यामुळें 'आधाराधेय' भावानें भेद आहे असेंच सिद्ध होतें. आधार म्हणजे आश्रयदाता व आधेय म्हणजे आश्रित होय. आश्रितपदार्थ व आश्रयदाता पदार्थ यांत नित्य भेदच दृष्टीस पडतो.

ब्रह्मसूत्रांतहि निरनिराळ्या मिषानें भेदच कथन केला आहे.

१ भेद व्यपदेशात् २ भेदव्यपदेशाच्चान्यः ३ कर्मकर्तृव्यपदेशाच्च ४ पृथगुपदेशात् इत्यादि अनेक सूत्रें भेदाचेंच उपपादन करतात.

**भेदव्यपदेशात्** (१–१–१७)

'ते ये शतं प्रजापतेरानंदाः' इत्यादि श्रुतीनें ब्रह्मरुद्रेन्द्रादि देवामध्यें (अमक्यापेक्षां अमक्याचा आनंद शंभरपट आहे असें सांगितल्यामुळें) भेद दाखविणारे धर्म सांगितले असल्यामुळें आनंदपरिपूर्ण परमात्मा ते रुद्रादिक देव नव्हेत.

हें सूत्र ब्रह्मसूत्रांतील आनंदमयाधिकरणांत आहे. 'आनंदमयोभ्यासात्' या सूत्रानें आनंदमय–आनंदपरिपूर्ण परमात्मा हाच जगाचा उत्पत्त्याद्यष्टकर्ता असल्यामुळें तेंच ब्रह्म होय. असा विषय सांगितला असतां त्यावर अशी शंका आली कीं, 'आनंदमय' शब्दानें परब्रह्मच कां घ्यावें? ब्रह्मादि देव कां घेऊं नयेत? याचें उत्तर भेदव्यपदेशात् या सूत्रानें दिलें.

**भेदव्यपदेशात्**–(भेदस्य व्यपदेशः तस्मात् भेदव्यपदेशात्) ते ये शतं प्रजापतेरानंदाः (तैत्तिरीयश्रुति २–८–४) रुद्रदेवाच्या आनंदापेक्षां शंभरपटीचा आनंद झाला असतां ब्रह्मदेवाचा एक आनंद होतो असें श्रुतींत सांगितलें आहे. त्यामुळें परब्रह्माचा आनंद अपरिमित व ब्रह्मरुद्रादिकांचा आनंद परिमित आहे. परिमितापरिमितत्व रूप आनंदभेद परमात्मा व ब्रह्मादि जीव यांच्यांत आहे असें श्रुति प्रतिपादित

असल्यामुळें या उभयतांत नित्य भेदच आहे असें हें सूत्र श्रुतीच्या आधारानें सांगतें. म्हणून सदर सूत्र भेदपरच असें सिद्ध होतें.

यानंतर दुसऱ्या सूत्राचा विचार करूं

**भेदव्यपदेशाच्चान्यः ( १-१-२१ )**

हें सूत्र प्रथमाध्यायांतील प्रथमपादांत अंतस्थत्वाधिकरणांत आहे. हृदयरूप गुहेंत असणारा तो परमात्मा जगाचें उत्पत्याद्यष्टक करतो हें सांगितल्यावर अशी शंका आली कीं, अंतस्थत्व (हृदयरूप गुहेंत असणें या धर्मामुळें) लक्षणामुळें इंद्रादि देवाचेंहि ग्रहण होतें मग इंद्रादि देवानांहि परब्रह्म म्हणावें कीं काय? अशी शंका आली असतां त्याचें उत्तर या सूत्रानें देतात.

इंद्रादिक देव व परमात्मा श्रीहरी यांच्यांत भेद दाखविणाऱ्या अनेक श्रती आहेत. "**इद्रंस्यात्मा निहितः पंच होता, वायोरात्मानं कवयो निचिक्युः**" इंद्राच्या अंतर्यामीं राहणारा, पांच ज्ञानेंद्रियाचें ठिकाणीं विषयाचें हवन करणारा, वायुच्या अंतर्यामीं असा लोक पाहते झाले. या श्रुतींत इंद्र, वायु इत्यादिकाच्या अंतर्यामी राहणारा असा भेदच सांगितला असल्यामुळें या सर्व देवांहून तो परमात्मा निराळाच आहे.

**भेदव्यपदेशात् च अन्यः**—वरीलप्रमाणें श्रतींत भेदच सांगितला असल्यामुळें या (इंद्रादि देवापेक्षां) सर्वांहून **अन्यः च**—तो परमात्मा निराळा आहे.

याप्रमाणें वरील सूत्रानें जीव—परमात्म्यांत भेदच प्रतिपादन केला आहे असेंच सिद्ध होतें. यानंतर तिसऱ्या सूत्राचा विचार करूं.

३ कर्म **कर्तृव्यपदेशात्** ( १-२-४ )

हें सूत्र प्रथमाध्यायांतील द्वितीय पादामध्यें "सर्वगतत्वाधिकरणां" त आहे. श्रीहरी हा सर्व शक्तिमान् व सर्वव्यापी असल्यामुळें तोच परब्रह्म होय असें प्रतिपादन केलें आहे.

"एतदात्मानं परस्मै शंसति" या श्रुतींत जीव हा कर्ता असून ब्रह्म हें कर्म आहे म्हणून यांच्यांत भेद आहे असें म्हटलें आहे.

तात्पर्यः "चैत्र हा गावांस जातो" या वाक्यांत चैत्र हा कर्ता व गांव हें कर्म आहे. नेहमीं कर्ता व कर्म यांच्यांत भेद असतो. चैत्र या

कर्त्यांत व ग्राम या कर्मांत भेदच आहे. त्याप्रमाणें "एतदात्मानं परस्मै शंसति" या वाक्यांत **एतत् आत्मानं**-हा परमात्म्यास **परस्मै** पुरुषास **शंसति**-सांगतो" असा उल्लेख आहे. त्यांत आत्मानं हें कर्म असून शंसति या क्रियापदाचा कर्ता जीव हा आहे. कर्ता व कर्म असें निरनिराळे श्रुतींत सांगितले आहेत. म्हणून सांगणारा जीव व सांगितला जाणारा परमात्मा–यांच्यांत नित्य भेद आहे. याप्रमाणें वरील ऐतरेय श्रुतींत कर्ता व कर्म हे पृथक्त्वानें सांगितल्यामुळें भेद आहे असेंच सिद्ध होतें.

यानंतर चवथ्या सूत्राचा विचार करूं:—

४ **शारीरश्चोभयेपि हि भेदेन एनं अधीयते** (१–२–२०)

हें सूत्र प्रथमाध्यायांतील द्वितीयपादांत अंतर्यामी अधिकरणांत आहे. या अधिकरणांत सर्व परमात्म्यापासून निघालें असल्यामुळें तो परमात्मा सर्वांहून भिन्न आहे असें सांगितलें आहे. **हि**-ज्या अर्थी **शारीरः** जीव हा अंतर्यामीं नाहीं त्या अर्थी परमात्मा **एनं**--जीवाला परमात्म्याशीं **भेदेन**–भेदानेंच **उभये**–काण्व व माध्यंदिन शाखांतील श्रुती **अधीयते**–सांगतात. त्या अर्थी जीव व परमात्मा यांच्यांत भेदच आहे.

तात्पर्य—बृहदारण्यांत काण्व शाखीय श्रुती व माध्यंदिन शाखीय श्रुति आहेत. या दोन्ही श्रुतिवाक्यानें जीव हा अंतर्यामीं असणारा परमात्मा नव्हे, असें सांगितलें आहे. अतएव जीव निराळा व अंतर्यामी असणारा परमात्मा निराळा असेंच या सूत्रांत श्रुतीच्या आधारें सांगितलें आहे.

याप्रमाणें या सूत्रानेंहि जीव व परमात्मा यांच्यांत भेद आहे असेंच सांगितलें आहे. यानंतर पांचव्या सूत्राचा विचार करूं.

५ **पृथगुपदेशात्**–(२–३–२८)

"भिन्नोऽचिन्त्यः परमो जीवसंघात्" या जीवसमुदायाहून तो परमात्मा भिन्न आहे असें श्रुतीनें **पृथक्**—भिन्न आहेत असें **उपदेशात्**–सांगितलें असल्यामुळें जीव व परमात्मा हें परस्पराहून भिन्न आहेत असेंच सिद्ध होतें.

हें सूत्र द्वितीयाध्यायांत तृतीयपादांमध्यें पृथगधिकरणांत आहे. या सर्व अधिकरणांत जीव हा परमात्म्याहून भिन्न आहे असेंच सांगितलें आहे.

याप्रमाणें नमुन्यादाखल म्हणून ब्रह्मसूत्रांतील या फक्त पांच सूत्रांचा विचार केला आहे. ब्रह्मसूत्रांचा उपक्रम व उपसंहार पाहिल्यास ब्रह्मसूत्रें भेदबोधकच आहेत यांत शंका नाहीं.

याप्रमाणें श्रुति, ब्रह्मसूत्रें ही भेदबोधक आहेत हें दाखविल्यावर गीताहि भेदप्रतिपादक आहे हें दाखवीत आहे.

१ अव्यक्त असणारा, उत्पत्तिमान् असणाऱ्या सर्व प्राणिमात्रांहून भिन्न व सर्वश्रेष्ठ आहे. स्वतंत्र आहे. महाप्रलयांत सर्व प्राणि नष्ट झाले तरी त्याचा नाश होत नाहीं. ( गी. ८–२० )

२ भगवंताच्या अधीन असणाऱ्या प्रपंचांत क्षर व अक्षर असें चेतन-प्रकार आहेत. या दोहोंपेक्षांहि श्रेष्ठ असा आहे त्यांस पुरुषोत्तम म्हणतात.

या वरील गीतोक्त वाक्यानें सर्व जीवसमुदायाहून परमात्मा निराळा आहे हेंच सिद्ध होतें.

३ ज्यांनीं कामक्रोधादिकांचा त्याग केला आहे असे जीव, ज्ञानरूपी तपानें पवित्र होत्साते माझ्या स्थानाप्रत येतात. ( गी. अ. ४–१० )

४ माझ्या प्रसादानें भक्तजन माझ्या अव्यय पदास येतात.

( गी. १७–५४ )

इत्यादि गीतावाक्यांनीं परमात्मा व जीव यांत भेदच दाखविला आहे. इतकेंच नव्हें तर पुढील वाक्यानें अभेदवादाची निंदा केलेली आहे.

५ मी ईश्वर, भोगी, बलवान् असें अज्ञानानें मोहित होऊन ( मूढ लोक ) बोलतात. ( गी. १६–१४. )

६ अशा तऱ्हेचे ( 'मी ईश्वर आहे' असें म्हणणारे ) लोक आसुर-योनीस प्राप्त होऊन जन्मजन्मांतरीं मला प्राप्त होत नाहींत. इतकेंच नव्हें तर ते अंधतमास जातात. ( गी. १६–२० )

याप्रमाणें गीतावचनेंहि निरनिराळ्या विषयप्रतिपादनाचे वेळीं जीव व परमात्मा यांच्यांत भेद आहे असेंच प्रतिपादन करतात.

मी ईश्वर आहे असें म्हणणाऱ्यांस श्रीकृष्णानें शिक्षा केल्याचें उदाहरण श्रीमद्भागवतांत आहे.

पौंड्रकासुरानें भगवान् श्रीकृष्णासारखें स्वतःला चार हात, शंख, चक्र, गदा, पद्म वगैरे सर्व चिन्हें कृत्रिमरीत्या तयार करून तीं लावून घेतलीं होतीं. स्वतःस तो वासुदेव असें म्हणवीत असे. पुढें यानें खरा परमेश्वराचा अवतार आपणच आहों असें म्हणण्यास सुरवात केली. शेवटीं याची मजल इतकी गेली कीं त्यानें श्रीकृष्णांस निरोप पाठविला कीं "खरा परमेश्वराचा अवतार असणारा वासुदेव म्हणजे मी आहे तरी चक्रादि आयुधांचा त्याग करुन मला शरण ये" हा निरोप ऐकून श्रीकृष्णानीं त्याच्या समवेत युद्ध करून त्याचा शिरच्छेद केला. मी ईश्वर आहे "मदन्यो कोस्ति ईश्वरः" असें बडबडणाऱ्या हिरण्यकशिपु आदि दैत्यांचा श्रीहरीनें नाश केल्याचीं अनेक उदाहरणें पुराणांतरीं आहेत. यावरून जीवानें "मी ब्रह्म आहे" असें म्हणणें श्रीकृष्णास पसंत नव्हतें असेंच सिद्ध होतें.

याप्रमाणें जीवेशभेदाला प्रत्यक्ष, अनुमान, आगम हीं प्रमाण दाखविलीं आहेत. रामानुजाचार्य, निंबार्क, वल्लभाचार्य हे आचार्य जीव संसारांत असल्यावेळीं तो परब्रह्माहून भिन्न आहे असेंच मानतात. व तो उभयतांत असणारा भेदहि सत्यच आहे, असेंच मानतात.

शंकराचार्य मात्र जीवेशामध्यें असणारा भेद औपाधिक असून उपाधि नष्ट झाला कीं भेदहि नष्ट होतो. म्हणून तो भेद मिथ्या—खोटा होय असें मानतात. तरी हें म्हणणें कितपत सयुक्तिक आहे याचा विचार करूं.

निर्गुण, निराकार परब्रह्मांस मायेची उपाधि लागली कीं, ईश्वर चैतन्य निर्माण होतें याविषयींचीं शंकराचार्यांचीं वाक्यें विष्णुसर्वोत्तम या प्रकरणांत दिलीं आहेत. त्याच निर्गुण परब्रह्माला ज्यावेळीं अविद्यारूप उपाधि लागतो, त्यावेळीं ब्रह्मच जीवभावांस प्राप्त होतें. त्यामुळें अविद्यारूप उपाधीचे अज्ञानादि दोष त्या जीवभावांस प्राप्त झालेल्या परब्रह्मांस प्राप्त होतात. म्हणून ब्रह्माशीं जीवाचा भेद आहे असें वाटतें. पण तो भेद अविद्येनें निर्माण झाला असल्यामुळें तो भेद कल्पित अत एव मिथ्या आहे. व हें मिथ्याज्ञान 'अहं ब्रह्मास्मि' या ज्ञानानें निवृत्त होतें.

" अत्रोच्यते । अविद्याप्रत्युपस्थापितकार्यकारणोपाधिनिमित्तोयं शारीरान्तर्यामिणोर्भेदव्यपदेशो न पारमार्थिकः । एकस्यैव तु भेद-व्यवहारः उपाधिकृतः ( ब्र. शां. भा. १–२–२० )

[ अविद्येनें प्रस्थापित केलेल्या कार्योपाधि व कारणोपाधि निमित्तानें परमात्मा व जीव असा उत्पन्न झालेला भेद पारमार्थिक नव्हे. एका वस्तूंत झालेला भेदव्यवहार उपाधिकृत असतो, म्हणून तो मिथ्या होय. ]

आतां हें तत्व कितपत सयुक्तिक आहे याचा विचार करूं. अगदीं पहिला प्रश्न येतो कीं,

हा अविद्या, माया रूप उपाधि आला कोठून ? कोणी उत्पन्न केला ? तो सत्य कीं असत्य ?

कारण निर्गुण, निरंजन, निर्धर्मिक, निराकार असणाऱ्या परब्रह्माशीं या उपाधीचा संबंध केव्हां आला ? कसा आला ? परब्रह्मानें हा उपाधि निर्माण केला असें म्हटलें तर ब्रह्म हें निर्गुण, निराकार आहे या अद्वैत-वाद्यांच्या सिद्धान्तास बाध येईल. उपाधि सत्य आहे असें म्हटलें तर अद्वैत सिद्धान्ताची हानी होईल. कारण अद्वैतमताप्रमाणें ब्रह्म हें एकच सत्य आहे. म्हणून उपाधि सत्य मानल्यास ब्रह्माबरोबरच उपाधि सत्य होऊन एकसत्यत्वाची हानी होईल व द्वैतापत्ति येईल. उपाधि हा मिथ्या आहे असें मानलें तर नित्यज्ञानरुप, स्वयंप्रकाश असणाऱ्या ब्रह्मास अविद्या-रूप अपाधि लागला असें म्हणणें म्हणजे सूर्यास रात्रीनें ग्रासलें असें म्हटल्याप्रमाणें अपहासास्पद होईल. शिवाय हा उपाधि कोणी उत्पन्न केला व केव्हां उत्पन्न झाला हा प्रश्न शिल्लक राहातोच. निर्गुण, निरंजन परब्रह्मांस अविद्या, अज्ञानरुप उपाधि लागल्यामुळें तें परब्रह्म जीवभावां-स प्राप्त झालें त्यामुळें भेद निर्माण झाला. भेदामुळें जीवभावांस प्राप्त झालेल्या ब्रह्मांस अज्ञानानें पछाडलें. सारांश, अज्ञानरुप उपाधिमुळें भेद उत्पन्न झाला; त्यामुळें अज्ञान आलें. अज्ञान ब्रह्माला लागल्यामुळें तें जीव-भावास प्राप्त झालें. तात्पर्य, अज्ञानामुळें उपाधि व उपाधिमुळें भेद व भेदानें अज्ञान असा चक्रकापत्ति नांवाचा दोष येतो. शिवाय उपाधिला

कारण अज्ञान व अज्ञानाला कारण उपाधि यामुळें अन्योन्याश्रयदोष पण येतो. याचा विचार करून मध्वाचार्य म्हणतातः—

ऐक्ये ईश्वरस्य स्वज्ञानमस्तीति न तद्रूपस्य जीवस्याज्ञानादिकं युज्यते। औपाधिकभेदांगीकारेपि उपाधिरुभयोरैक्यात् उभयोरप्यज्ञत्वं कुर्यात्। उपाधिनिमित्तदोषाश्चोभयोरपि स्युः। उपाधिसंबंधस्य समत्वात्। उपाधिसंबंधस्यास्मिन्यथा तस्मिन्नन्यथा इति विशेषार्थमयमसाविति भेदस्योपाधिं विना स्वत एवापेक्षितत्वात्। अतःस्वतो भिन्नस्यैव उपाधिना विशेषो भवति।

उपाधिरप्यभिन्नस्य भेदं साधयितुं क्वचित्।
न क्षमः सिद्धभेदस्य ज्ञापकः स्यादबुद्धिनां ।।

[ जीव ब्रह्माचें ऐक्य मानल्यावर स्वप्रकाश असणारें ब्रह्म तेवढें ज्ञानी तद्रुप जीव मात्र अज्ञानी हें कसें जुळेल ? उपाधिमुळें हा भेद उत्पन्न होतो म्हणून ब्रह्म हें ज्ञानी व जीव अज्ञानी असें म्हणाल तर तेंहि बरोबर नाहीं. कारण उपाधि हा दोहीकडे सारखाच असतो. त्यामुळें एक दोघेहि ज्ञानी तरी पाहिजेत अगर दोघेहि अज्ञानी पाहिजेत. उपाधिमुळें एका ठिकाणीं एक भाव, दुसरें ठिकाणीं दुसरा भाव हें जुळत नाहीं. अशा तऱ्हेचें वैशिष्ट्य उपाधिशिवाय असतें. मूलतः भिन्न असलेल्या पदार्थाचें वैशिष्ट्य उपाधिमुळें जास्त स्पष्ट होतें.

याप्रमाणें उपाधिमुळें नसलेला भेद स्पष्ट होत नसून असलेला भेदच स्पष्ट होतो. याशिवाय मायारुप उपाधिमुळें ईश्वर चैतन्य होते. व अविद्यारुप उपाधिमुळें ब्रह्म जीवभावांस प्राप्त होते हा शंकराचार्यांचा सिद्धान्त आहे. या मताप्रमाणें निरवयव असणाऱ्या ब्रह्माच्या कोणत्या भागांस मायोपाधि लागतो व कोणत्या भागास अविद्योपाधि लागतो हा प्रश्नहि अनिर्णीत राहतो. या तऱ्हेनें कोणत्याहि तऱ्हेनें या उपाधीची चिकित्सा केली तरी तो उपाधि सयुक्तिक वाटत नाहीं. शिवाय उपाधिमुळें नसलेला भेद निर्माण होतो हें म्हणणें योग्य नाहीं. तर उपाधिमुळें असलेला भेद स्पष्टतया प्रतीत होतो. म्हणून हा भेद औपाधिक असून तो मिथ्या आहे या म्हणण्याला कोणतेंहि प्रमाण नाहीं.

सर्वत्र जिकडे तिकडे भेद दिसत असतां तो भेद व्यावहारिक (मिथ्या) आहे असें म्हणणें कितपत सयुक्तिक आहे ? प्रत्यक्ष दिसत असणाऱ्या गोष्टीस भ्रम म्हणावयाचा व दिसत नसलेल्या गोष्टी सत्य मानावयाच्या ही विचाराची एक और तऱ्हा आहे. याविषयीं श्रीमध्वाचार्य म्हणतातः—

दृष्टस्य भ्रांतिता चेत्स्याददृष्टेन भ्रमः कुतः ।
गवामशृंगिभावेन नहि स्याच्छशशृंगिता ।। ( अनु० २–२ )

यावरील टीका–न हि दृष्टस्य विषयस्य भ्रांतिविषयस्य निवृत्तेरदृष्टस्य अभ्रांतिविषयत्वमिति संभवति । तथात्वे दृष्टविषाणादीनां गवादीनां अशृंगित्वं अदृष्टविषाणानां शशानां शृंगित्वं स्यात् (सन्न्याय रत्नावलि २–२) तात्पर्यार्थः – प्रत्यक्ष दृष्ट असणाऱ्या वस्तूस भ्रम म्हणावयाचा, नसलेल्या गोष्टीस यथार्थ ज्ञान म्हणावयाचें हें तत्व मान्य केल्यांस प्रत्यक्ष दिसत असलेल्या गाईच्या शिंगांना पाहून तीं भ्रमात्मक असें समजावें लागून नसलेल्या शशविषाणांस सत्य मानावें लागेल ! तद्वत् असलेला भेद खोटा, भ्रमात्मक मानावयाचा व नसलेला अभेद खरा मानावयाचा ! म्हणजे आचार्य म्हणतात तसा दोष येईल. एवढ्याकरितां प्रत्यक्ष असणारा भेदच खरा कां मानूं नये ?

येणेंप्रमाणें प्रत्यक्ष दृष्ट भेद हा मिथ्या आहे या म्हणण्यास प्रत्यक्ष प्रमाण मुळींच नाहीं. तो भेद व्यावहारिक आहे हें म्हणणेंहि बरोबर नाहीं. याविषयीं अनुमान प्रमाण अद्वैतवादी देतात त्याचा विचार करूं.

“ विमतं मिथ्या भेदत्वात् चंद्रभेदवत् ”

विवादविषय असणारा भेद मिथ्या आहे, भेदत्वामुळें, चंद्रभेदाप्रमाणें. म्हणजे एका पापणीवर बोट ठेवून पापणी दाबली असतां जसा एकच असणारा चंद्र त्यांत भेद दिसतो. चंद्राचे ठिकाणीं भेद नाहीं, पण उपाधिमुळें भासतो. अत एव तो चंद्रभेद जसा मिथ्या आहे तद्वत् ईश्वर व जीव यांच्यांत दिसणारा भेद मिथ्या आहे.

याप्रमाणें भेदमिथ्यात्त्व सिद्ध करण्याकरितां या अनुमानाचा आश्रय अद्वैतवादी करतात. सदर अनुमान कितपत निर्दोष आहे याचा विचार करूं. या ठिकाणीं दृष्टांत जो दिला आहे तो प्रातिभासिक भेदाचा. तो

दृष्टांत या ठिकाणीं निरुपयोगी आहे. ईश्वर व जीव याच्यांत जो भेद आहे तो व्यावहारिक होय. व्यावहारिक भेद सिद्ध करण्यासाठीं प्रातिभासिक भेदाचा दृष्टांत देऊन काय उपयोग ?

**व्यावहारिक भेदः**— अर्थक्रियाकारित्वं व्यावहारिकत्वं—व्यवहारांत अर्थसिद्धिकरितां स्वीकारलेला भेद.

**प्रातिभासिक भेदः**— क्षणमात्र प्रतीत होणारा भेद. त्याचें ठिकाणीं व्यवहारोपयोगित्व नसतें.

शिवाय मिथ्यात्व म्हणजे अनिर्वचनीयत्व-सदसद्विलक्षणत्व असा अर्थ अद्वैतवाद्यांनीं केलेला असल्यामुळें दृष्टांतभूत असलेल्या चंद्रभेदाचें ठिकाणीं अनिर्वचनीयत्व अगर सदसद्विलक्षणत्व कांहीं नसल्यामुळें दृष्टांतास साध्यवैकल्य हा दोष येईल. [साध्यवैकल्य म्हणजे जी गोष्ट आपणांस सिद्ध करावयाची आहे ती सिद्ध करण्यास दृष्टांत असमर्थ असणें यांस साध्यवैकल्य म्हणतात. प्रकृतस्थळीं जीव व ईश्वर यांच्यांत असणारा भेद मिथ्या ठरविण्यासाठीं दृष्टांतभूत चंद्रभेद असमर्थ आहे.]

याविषयीं आचार्य म्हणतातः—

**मिथ्यैव भेदो विमतो भेदत्वाच्चंद्रभेदवत् ।**
**इति चेत्साध्यधर्मोयं सन्नसन्वा नवोभयं ॥**
**यदि सन्नपसिद्धान्तः स एवासन्निती‌रिते ।**
**नोभयं चेन्न सिद्धं तदिति मानस्य दूषणं ॥**

(तात्पर्यार्थः— वरील भेदमिथ्यात्वविषयक अनुमान हे सत् आहे कीं असत् आहे उत सदसत् आहे. त्यापैकीं सत् आहे असें म्हटलें तर ब्रह्म एक सत्य व अनुमान एक सत्य म्हणून अपसिद्धान्त येतो. असत् आहे असें म्हटलें तर भेदमिथ्यात्व सिद्ध न होतां भेदसत्यत्वच सिद्ध होतें. सदसत् आहे म्हणाल तर सदसतत्व हें दृष्टांताचें ठिकाणीं नाहीं. म्हणून साध्यवैकल्य दोष येतो. एकूण या अनुमानांस वरीलप्रमाणें दोष येत असल्यामुळें अशा तऱ्हेचें दोषयुक्त अनुमान प्रमाण म्हणून मानतां येत नाहीं.)

हा भासमान होणारा चंद्रभेद मिथ्या आहे हें सिद्ध करण्यासाठीं दुसरें अनुमान केलें तर त्या दुसऱ्या अनुमानाच्या सिद्धिसाठीं तिसरें अनुमान असा अनवस्थाप्रसंग येईल.

**नच मानांतरेणैतच्छक्यं साधयितुं कचित्।**
**अनुमानेन चेत्सैव ह्यनवस्था भविष्यति॥** २–३ अनुव्याख्यान

[तात्पर्यः–वरील अनुमान सिद्ध होण्याकरितां दुसरें अनुमान करावें तर अनवस्था दोष येईल.]

याप्रमाणें अनुमान प्रमाणाला अनेक दोष असल्यामुळें सदर अनुमान भेदमिथ्यात्वास साधक होत नाहीं. आतां शंकराचार्य भेदमिथ्यात्वाला प्रमाण म्हणून ज्या श्रुति घेतात त्यांचा विचार करूं.

भेद मिथ्या आहे हें सिद्ध करण्यासाठीं शंकराचार्य "**तत्त्वमसि, अहं ब्रह्मास्मि, सर्वं खलु इदं ब्रह्म, एकमेवाद्वितीयं ब्रह्म, नेहनानास्ति किंचन**" इत्यादि श्रुति प्रमाण म्हणून स्वीकारतात. खरोखरीच या श्रुतींचा अर्थ मिथ्यापर आहे काय? याचा विचार करूं.

प्रथमतः '**तत्त्वमसि**' या श्रुतीचा विचार करूं.

ही श्रुति छांदोग्य उपनिषदांत सहाव्या अध्यायांत असून आठव्या खंडापासून सोळाव्या खंडापर्यंत एकूण नऊ वेळां ही श्रुति आलेली आहे व प्रत्येक वेळीं निरनिराळे दृष्टांत श्रुतिवाक्यानें दिले आहेत. आतां शंकराचार्य या श्रुतीचा अर्थ कसा करतात तें पाहूं.

'तत्त्वमसि' या वाक्यांत 'तत् त्वम् असि" असे तीन शब्द आहेत. या वाक्यांचा वाच्यार्थ असा होईल. तत्–तें, त्वम्–तूं असि–आहेस. याप्रमाणें अर्थ केल्यास ब्रह्म व जीव यांचें विरुद्ध धर्मांमुळें असें ऐक्य कसें संभवेल! म्हणून वाच्यार्थ सोडून दिला व लक्ष्यार्थ स्वीकारला. लक्षणासुद्धां अशी विलक्षण मानली कीं, कोणाहि दर्शनकारांनीं अशी लक्षणा मानली नाहीं. त्या लक्षणेचें नांव जहदजहल्लक्षणा हें होय. जहदजहल्लक्षणा याचा अर्थ थोडक्यांत असा सांगतां येईलः–दोन पदार्थांवरील भिन्नत्वदर्शक धर्मांचा त्याग करून अमुख्यार्थ स्वीकारणें.

सामान्यतः लक्षणा हा शब्द पारिभाषिक आहे. सरळ होणारा अर्थ व्यवहारांत जुळत नसेल तर त्या ठिकाणीं लक्षणेनें अर्थ करावा लागतो. सरळ होणाऱ्या अर्थास वाच्यार्थ म्हणतात. लक्षणेनें केलेल्या अर्थास लक्ष्यार्थ म्हणतात. या लक्ष्यार्थाचें उदाहरण 'गंगायां घोषः' हें प्रसिद्ध आहे. 'गंगानदींत गौळवाडा' असा याचा अर्थ आहे. तेव्हां गंगाप्रवाहांत गौळवाडा असणें असंभवनीय आहे. म्हणून गंगानदींत गौळवाडा हा मुख्यार्थ सोडून 'गंगातीरावर गौळवाडा' असा अर्थ करावा लागतो. यालाच लक्षणा म्हणतात. प्रकृतस्थलीं 'सः आत्मा–तो परमात्मा, त्वं असि–तूं आहेस असा या वाक्याचा वाच्यार्थ आहे. या वाक्यार्थावर अशी शंका येईल कीं, परमात्मा हा सर्वज्ञत्वादि गुणांनीं युक्त आहे व जीव हा अल्पज्ञत्वादि गुणांनीं युक्त आहे. सारांश, परमात्मा व जीव या उभयतांत विरुद्ध धर्म असल्यामुळें तो सर्वज्ञत्वादि गुणविशिष्ट परमात्मा तूं आहेस हें म्हणणें कसें योग्य दिसेल ? म्हणून हा वाच्यार्थ जुळत नसल्यामुळें 'स आत्मा तत्त्वमसि' या वाक्याचा लक्षणेनें अर्थ केला पाहिजे. शास्त्रांत जहल्लक्षणा व अजहल्लक्षणाही मानली आहे. पण जहदजहल्लक्षणा फक्त शंकराचार्यांनींच मानली आहे व त्या लक्षणेच्या आधारें वरील वाक्याचा अर्थ केला आहे.

ब्रह्मचैतन्यावर सर्वज्ञत्वादि गुणधर्म आहेत.

जीवचैतन्यावर अल्पज्ञत्वादि धर्म आहेत.

हे दोन्ही धर्म उपाधिनिर्मित आहेत. म्हणून त्या दोन्ही धर्मांचा त्याग करावयाचा. आणि मग वरील धर्मरहित असें शुद्ध चैतन्य म्हणजे तूं आहेस असा अर्थ करावयाचा. उपाधिमुळें धर्म उत्पन्न होण्यापूर्वीं शुद्ध चैतन्याचें ऐक्य असा त्याचा अर्थ करावयाचा. हा या खटाटोपाचा मतितार्थ होय.

इतका द्राविडी प्राणायामाचा मार्ग पत्करून केलेला अर्थ अनेक श्रुतींच्या विरूद्ध आहे.

या श्रुतीचा अर्थ करण्याकरितां ही नवीन लक्षणा मानावी यांस प्रमाण काय ? श्रुतीचा आपणांस अभिप्रेत अर्थ करण्यासाठीं वाटेल तसा प्रयत्न करणें झाल्यांस अनेक अनर्थ ओढवतील. अगोदर श्रुति ऐक्यप्रतिपादन

करतें असें मानावयाचें त्या मानलेल्या अर्थाच्या सिद्धिसाठीं श्रुतीचा आपणांस अभिमत अर्थ करावयाचा असा अन्योन्याश्रय आहे. श्रीमध्वाचार्यांनीं प्रत्येक श्रुतीचा अर्थ पुराणाच्या आधारें केला आहे. त्यामुळें वरील अन्योन्याश्रय दोष श्रीमध्वाचार्यांच्या अर्थास येत नाहीं. श्रुतींत हें वाक्य नऊ वेळां आलें असल्यानें व प्रत्येक वेळीं निरनिराळा दृष्टांत दिला असल्यानें त्या दृष्टांतास अनुसरून अर्थ करणें श्रेयस्कर होय.

श्रीमध्वाचार्यांनीं 'तत्वमसि' या वाक्याचा अर्थ कसा करावा याचें विशेष स्पष्टीकरण भाष्यांत केलें आहे. आचार्य छांदोग्यभाष्यांत म्हणतात:—

**नवकृत्वो भिन्नस्य वस्तुनः भेदापरिज्ञानात् अनर्थं, सूक्ष्मत्वात् भेदस्य दुर्ज्ञेयत्वं सदृष्टांतं तात्पर्येणाह। नचाभेदे कश्चिद् दृष्टांतः उक्तः। नहि शकुनिसूत्रयोः नानावृक्षरसानां, नदीसमुद्रयोः, वृक्षपरमात्मनोः, धानापरमात्मनोः, लवणोदकयोः, पुरुषगांधारयोः, नियतज्ञानानियतज्ञानयोः, चोरापंन्हियमाणयोश्चाभेदोस्ति।**

तात्पर्यार्थ—स्वभावत: भिन्न असणाऱ्या वस्तूमध्यें असणाऱ्या भेदाचें ज्ञान न झाल्यामुळें व भेद हा अति सूक्ष्म असल्यामुळें सर्वांस अज्ञेय असला तरी नऊ तऱ्हेचें दृष्टांत देऊन उद्दालकानें श्वेतकेतूस जीवब्रह्मांत भेद आहे हें सांगितलें. याठिकाणीं अभेदाविषयीं कोणताहि दृष्टांत सांगितला नाहीं.

१ पक्षी व जाळें २ नानावृक्षरस ३ नदीसमुद्र ४ वृक्षपरमात्मा ५ धान व परमात्मा ६ पाणी व मीठ ७ पुरुष व गांधार देश ८ ज्ञानाज्ञान ९ चोर–मनुष्य अशा तऱ्हेच्या नऊ दृष्टांतांनीं जीव ब्रह्मांत परस्पर अभेद नाहीं हें सिद्ध केलें आहे.

या उपनिषदांतील नऊ दृष्टांतांचें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. पण या नऊ तऱ्हेनें त्या दृष्टान्ताचें विवरण करणें झाल्यास बृहदारण्यकोपनिषदाच्या त्या सर्व खंडाचाच अनुवाद करावा लागेल व त्यामुळें ग्रंथ विस्तार होईल म्हणून येथेंच विराम घेतों.

श्रीमध्वाचार्यांनीं 'तत्वमसि' या वाक्याचा अर्थ पुढीलप्रमाणें केला आहे. 'तत्वमसि' याच्या अगोदर 'स आत्मा' असें वाक्य आहे.

' स आत्मा तत्वमसि, सः आत्मा अतत् त्वं असि ' त्या परमात्म्याहून विरुद्ध धर्मांमुळें तूं भिन्न आहेस म्हणून ' तो परमात्मा तूं नव्हेस ' असा अर्थ श्रीमध्वाचार्यांनीं केला आहे. हा अर्थ मध्वाचार्यांचा स्वकपोलकल्पित नसून त्यांस त्यांनीं पुराणांतील प्रमाणं दिलीं आहेत. त्यापैकीं सामसंहितेतील प्रमाण येथें उद्धृत केलें आहे.

अतत्वमसि पुत्रेति य उक्तो गौतमेन तु ।
नवकृत्वः सदृष्टांतः सर्वं भेदेन केशवः ॥

[ हे पुत्रा, गौतमानें ' अतत्त्वमसि ' म्हणून नऊ तऱ्हेनें दृष्टान्तानें सर्वांशीं भेद आहे असें सांगितलें आहे. ] हा तात्पर्यार्थ आहे.

येणें प्रमाणें श्रीमध्वाचार्यांनीं केलेल्या अर्थास वेदव्यासरचित पुराणांचा आधार आहे.

आतां तत्वमसि या वाक्याचा ' अतत् त्वं असि ' असा पदच्छेद न करतां तत्पुरुष समास करूनहि सहा तऱ्हेनें त्या वाक्याचा भेदपर अर्थ करतां येतो.

१ **तत् त्वं असि**—त्याला तूं शरण जाणारा आहेस.
२ **तेन त्वं असि**—त्या परमात्म्यासह राहणारा आहेस.
३ **तस्मै त्वं असि**—त्याच्या ( सेवे ) करितां तूं आहेस.
४ **तस्मात् त्वं असि**—त्याच्यापासून तूं झाला आहेस.
५ **तस्य त्वं असि**—त्याचा तूं दास आहेस.
६ **तस्मिन् त्वं असि**—त्या परमात्म्यावर तूं अवलंबून आहेस.

याप्रमाणें कसाहि अर्थ केला तरी त्याचा अर्थ भेदपरच होतो. द्वैतवादी ' सः आत्मा अतत् त्वं असि ' असा पदच्छेद करून या वाक्याचा अर्थ करतात त्यांस कांहीं अद्वैतीवर्ग आत्मा व अतत् अशीं पदें पाडल्याबद्दल टीका करतो पण याठिकाणीं असा पदच्छेद करणें व्याकरणशास्त्राच्या विरुद्ध नाहीं. ' आत्मा+अतत् ' या ठिकाणीं ' अकः सवर्णे दीर्घः ' या पाणिनीसूत्रानें दीर्घ झाला. शंकराचार्यांनीं ' संभूतिंच विनाशंच ' या ठिकाणीं वाक्याच्या प्रारंभीं नियत नसलेला ' अ ' घेऊन अर्थ केला तरी चालतो. पण येथें मात्र व्याकरणदृष्ट्या असा पदच्छेद होत असतानांहि

तो पदच्छेद अद्वैतवाद्यांना चालत नाहीं! याप्रमाणें तत्वमसि या वाक्याचा कसाहि अर्थ केला तरी तो भेदपरच होतो. जीवेश्वरऐक्यपर अर्थ केल्यास "द्वा सुपर्णा सयुजा, एतस्य अक्षरस्य प्रशासने गार्गि, सत्यंभिदा" इत्यादि श्रुतिवाक्यांशीं विरोध येईल. हा विरोध परिहार करण्यासांसाठीं हीं भेदप्रतिपादक श्रुतिवाक्यें व्यावहारिक भेदाचें कथन करितात अशी स्वकपोल कल्पना करून विरोधपरिहार कां करावा? कारण श्रुतींतील भेदप्रतिपादक वाक्यें व्यावहारिक भेद सांगतात हें अन्य प्रबल प्रमाणावांचून सांगण्यास आपणाला काय अधिकार पोंहोचतो?

यानंतर आतां दुसऱ्या श्रुतीचा विचार करूं.

अहं ब्रह्मास्मि (बृह० १–४–१०)

निर्गुण ब्रह्म अविद्योपाधीच्या योगानें जीवभावास प्राप्त झाल्यावर नाना तऱ्हेचीं दुःखें भोगून पुन्हां ज्यावेळीं "मी ब्रह्म आहे" हें ज्ञान त्यांस होईल त्यावेळीं तें उपाधीपासून मुक्त होतें.

प्रत्येक जीव अविद्योपाधिपासून मुक्त झालां कीं तों ब्रह्म होतो. म्हणून जीव व ब्रह्म यांचें ऐक्यच आहे.

अशा तऱ्हेची विचारसरणी आहे. ही विचारसरणी युक्त नाहीं. कारण अहं ब्रह्मास्मि या वाक्याच्या अगोदरच्या वाक्यांचा विचार केल्यास शंकराचार्यांचा अभिमत अर्थ यांतून निघत नाहीं. अहं ब्रह्मास्मि याच्या अगोदरचें वाक्य पुढीलप्रमाणें आहे.

**१ ब्रह्म वा इदमग्र आसीत् तदात्मानमेवावेत् अहं ब्रह्मास्मीति तस्मात्तत्सर्वमभवत २ तद्यो देवानां प्रत्यबुध्यत स एव तदभवत् तथर्षीणां तथा मनुष्याणां ॥**

तात्पर्यार्थः—ब्रह्मज्ञानानें आपण पूर्णत्वास प्राप्त होऊं असें मानणारे मानव विचार करतात. ब्रह्म हें पूर्ण आहे. ते ब्रह्म कांहीहि न जाणतां पूर्ण झालें तर तसेंच दुसरेंहि पूर्ण कां होऊं नयेत? अशा अभिप्रायानें 'ब्रह्मानें काय जाणलें कीं, ज्याच्या योगानें तें पूर्ण झालें.' असें विचारलें असतां त्याचें उत्तर दिलें गेलें:—

सृष्टीच्या पूर्वी ब्रह्म होतें. तेंच ब्रह्म "स्वतःलाच" "अहं ब्रह्मास्मि" मी पूर्ण आहे" असें समजतें. म्हणून ब्रह्मज्ञानानेंच ते पूर्ण आहे. अशा तऱ्हेचें उत्तर दिलें.

देवांच्या मध्ये जो कोणी ब्रह्म हें पूर्ण आहे असें जाणतो तोहि स्वयोग्यतेप्रमाणें पूर्ण होतो. ऋषींच्या मध्यें "ब्रह्म हें पूर्ण आहे" असें जो जाणतो तोहि पूर्ण होतो. तात्पर्य, मी पूर्ण आहे. सर्व देव, ऋषि आदि हेंहि आपआपल्या योग्यतेप्रमाणें पूर्ण आहेत" हा याचा अर्थ आहे. अहं ब्रह्मास्मि या वाक्यानें ब्रह्माचें आत्मज्ञानित्व श्रुतीनें प्रकट केलें आहे. हें वाक्य "जीव हा ब्रह्म आहे" हें सांगण्यासाठीं नव्हें. म्हणून श्रीमध्वाचार्यांनीं या वाक्याचा अर्थ खालींलप्रमाणें केला आहे.

> हं नाम हन्यमानत्वात् जीवस्य समुदाहृतम् ।
> जीवादन्यो यतो विष्णुरहं नामा ततः स्मृतः ॥
> पूर्णत्वादस्मि नामासौ पूर्णपूर्णत्वहेतुतः ।
> ब्रह्मास्मीत्युच्यते विष्णुर्बृहत्पूर्णो यतः सदा ॥ ( छांदोग्यभाष्य )

हं म्हणजे नष्ट होतो म्हणून जीवास हं असें नांव आहे. हं म्हणजे जीव नव्हे तो अहं—म्हणजे परमात्मा—जींवाहून निराळा आहे. म्हणून "अहं" हें नांव विष्णुस आहे. स्मि—याचा अर्थ जीव. कारण सुतरां मितत्वात्-अल्पत्वात् अतिशय अल्पत्वामुळें स्मि म्हणजे जीव. अल्प नव्हे तो अस्मि म्हणजे पूर्ण—ब्रह्म. याचा अर्थ पूर्ण म्हणजे निरवधिक पूर्ण, एकुण "मी निरवधिक पूर्ण आहे" असा "अहं ब्रह्मास्मि" या वाक्याचा अर्थ आहे. यावरून अहं ब्रह्मास्मि या वाक्याचा अर्थ कसा करावा हें कळून येईल. यावरून हें वाक्य ऐक्यबोधक नाहीं असेंच सिद्ध होतें. इतकेंच नव्हे तर 'अहं ब्रह्मास्मि" या वाक्याच्या पूर्ववाक्यांत "देवानां, ऋषीणां, मनुष्याणां" असा निरनिराळा उल्लेख केल्यामुळें या सर्वांत भेद आहे हेंच श्रुतीला अभिप्रेत आहे असें सिद्ध होते.

यानंतर पुन्हां दुसऱ्या श्रुतीचा विचार करूं.

**नेह नानास्ति किंचन**—( काठक ).

**"इह जगति नानात्वं नास्ति"** या जगांत नानात्व नाहीं.

"असंति नानात्वे नानात्वं अध्यारोपयति अविद्यया" (नानात्व नसतांनाहि अविद्येच्या योगानें नानात्व आरोपित केलें जातें.)

याप्रमाणें कोठेंहि नानात्व नसून एक सद्वस्तु ब्रह्म आहे. याप्रमाणें अर्थ करून हें जीवब्रह्मैक्यपर वाक्य आहे असें शंकराचार्य म्हणतात. पण हेंहि बरोबर नाहीं. हें वाक्य "जीवाजीवांत जसा भेद आहे तद्वत् परमात्म्याचे अनंतानंत अवतार आहेत त्यांतहि भेद आहे कीं काय? अशी शंका आल्यास त्याचें उत्तर या वाक्यानें देतात. इह—परमात्म्याच्या रूपांत नानात्व—भिन्नपणा नाहीं. हें सांगण्यासाठीं हें वाक्य प्रवृत्त झालें आहे. जीव ब्रह्मांत भेद नाहीं हें सांगण्यासाठीं नाहीं. यानंतर अन्य श्रुतीचा विचार करूं.

**परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति**

हें वाक्यहि जीवपरमात्म्याचें ऐक्य सांगत नाहीं.

अद्वैतवादी "जो परब्रह्माला जाणतो तो ब्रह्मच होतो" असा अर्थ करतात. पण असा अर्थ केल्यास इतर भेदप्रतिपादक श्रुतिवाक्यांशीं विरोध येतो. म्हणून द्वैतवादी करतात तसाच अर्थ करणें योग्य होय.

"जो अधिकारी परब्रह्मांस जाणतो तो ब्रह्मांस प्राप्त होतो." याप्रमाणें परब्रह्मज्ञानी मानवास परब्रह्माची प्राप्ती होते हें सांगून प्राप्यप्राप्तृभावानें भेद आहे असें सिद्ध होतें.

**एकमेवाद्वितीयं ब्रह्म**

हें वाक्यहि अभेदप्रतिपादक नाहीं. अद्वैतवादी म्हणतात कीं, "या श्रुतिवाक्यानें जगांत एकच अद्वितीय—द्वितीयवस्तुरहित—वस्तु आहे. दोन पदार्थ असल्यास त्यांत भेद असेल. पण सर्वत्र द्वितीयवस्तुच नाहीं असें श्रुति सांगते. त्यामुळें अभेद आहे"

याप्रमाणें अर्थ करणें बरोबर नाहीं. सरळ अर्थ सोडून वांकडा अर्थ कां करावा?

"महात्मा गांधी जगांत अद्वितीय होते' या वाक्यानें द्वितीयमानव-राहित्य असा अर्थ सिद्ध होईल काय? अद्वितीय म्हणजे तत्समान द्वितीय-वस्तुराहित्य असा अर्थ करणेंच उचित होय. श्रीमध्वाचार्य म्हणतातः—

**एकमेव–स्वगतभेदविवर्जितं, अद्वितीयं समानवर्जितं च भेदाभेदनिवृत्यर्थे एव शद्बो अवधारकः। समाधिकनिवृत्यर्थे अद्वितीय पदं ॥** ( छांदोग्यभाष्य )

" एकमेवाद्वितीयं " या वाक्यातील ' एकं ' या पदाचा अर्थ स्वगतभेदरहित–परमात्म्याच्या रूपांत अभेद म्हणून एक, अद्वितीयं–याचा अर्थ तत्सदृशवस्तुरहित असा करावा, त्याच्यासारखा अगर त्याच्यापेक्षां गुणांनीं श्रेष्ठ कोणी नाहीं हें दर्शविण्यासाठीं अद्वितीय पद आहे.

याप्रमाणें श्रुतींत असें एकहि वाक्य नाहीं कीं, जें वाक्य अभेद प्रतिपादन करून भेदवादाची निंदा करतें.

ज्या ज्या ठिकाणीं भेदप्रतिपादक वाक्यें असतील त्या त्या ठिकाणीं शंकराचार्य "व्यावहारिक भेदप्रतिपादक हीं वाक्यें आहेत" असें म्हणतात. व हा भेद उपाधिनिर्मित असल्यामुळें तो मिथ्या होय. पण हा उपाधिसुद्धां प्रत्येकाचा निराळा आहे. सगुण ब्रह्मासाठीं " माया " नांवाचा उपाधि आहे. ' अविद्या ' नामक उपाधिनें जीवभावांस ब्रह्म प्राप्त होतें. जडासाठीं " अज्ञान " उपाधि आहे. हें उपाधि निरवयव असणाऱ्या ब्रह्माच्या कोणच्या भागांस चिकटतात हा प्रश्न सुटत नाहीं. कोणीं उत्पन्न केला याची उपपत्ति लागत नाहीं. बरें, जीवभावांस प्राप्त झालेलें ब्रह्म अविद्योपाधीपासून मुक्त होऊन ब्रह्म झाल्यावर " अज्ञानरूप उपाधीनें जडभावांस प्राप्त झालेलें ब्रह्म तसेंच राहतें काय ? मायारुप उपाधिच्या योगानें सगुण ब्रह्म झालेले निर्गुण ब्रह्म सगुणत्वापासून केव्हां मुक्त होतें ? व्यवहार दशेंत कां होईना, जीवांस सगुणब्रह्माची वा निर्गुण ब्रह्माची उपासना करून अविद्योपाधितून मुक्त होतां येतें. पण सगुणब्रह्मानें मायोपाधींतून मुक्त होण्यासाठीं कोणाची उपासना करावी ? ब्रह्मास जडत्व प्राप्त होण्यास कारण काय ? व त्या जडभावांस प्राप्त झालेल्या ब्रह्मानें आपली जडत्वापासून कशी मुक्तता करून घ्यावयाची !

इत्यादि अनेक प्रश्न उपस्थित होतात. या प्रश्नांचीं उत्तरें सप्रमाण देतां येत नाहींत. पण युक्तीनेंहि सिद्ध करतां येत नाहीं हेंहि अद्वैतवादी भूषणच समजतात.

**अविद्यायाः दुर्घटत्वं भूषणं न तु दूषणं**

काांहीं अद्वैतवाद्यांनीं कांहीं ठिकाणीं विलक्षण मत प्रतिपादन केलें आहे.

" तदनन्यत्वमारंभण शब्दादिभ्यः " या सूत्रव्याख्यानाचें वेळीं "जगत्" हें पद बाहेरचें घेऊन " तत् " या पदाचा अर्थ " ब्रह्म " असा केला तरी जड जगताचें चेतन ब्रह्माशीं कसा अभेद आहे असा प्रश्न उपस्थित झाला असतां भामतीकारांनीं या प्रश्नाचें उत्तर दिलें:—

**" न खलु अनन्यत्वमिति अभेदं ब्रूमः। किंतु भेदं व्यासेधामः। ततश्च नाभेदाश्रयदोषप्रसंगः** ( भामती २–१–१४ )

[ ' अनन्यत्वं " पदानें जगाचा ब्रह्माशीं अभेद आहे असें म्हणत नाहीं तर जगाचा ब्रह्माशीं भेद आहे असें म्हणणाऱ्याचें निराकरण करतों. त्यामुळें अभेदाचा आश्रय करणाऱ्या आमच्यावर दोष येत नाही. ]

यावर पुन्हां प्रश्न विचारला गेला कीं,

" जगाचा ब्रह्माशीं अभेद नाहीं• असें म्हणणाऱ्यांचे तुम्ही निराकरण करतां कीं नाहीं "

यावर भामतीकारांनीं याचें उत्तर दिलें कीं:—

**किंतु अभेदं व्यासेदद्भिः वैशेषकादिभिः अस्मासु साहाय्यमेव आचरितं भवति॥**

[ अभेदाचें निराकरण करणाऱ्या वैशेषिकादिकांचें आम्हांस साहाय्यच होतें. ]

अशा रीतिनें शंकराचार्य हें सूत्र जगन्मिथ्यात्वप्रतिपादक आहे असें म्हणतात तर त्यांचे अनुयायी असें म्हणतात.

याप्रमाणें जीव व ब्रह्म यामध्यें अभेद आहे हें कोणत्याहि रीतिनें सांगतां येत नाहीं. श्रुतिमध्यें जेथें ' ऐक्य ' असे शब्द असतील त्या ठिकाणीं प्रकरणानुसंधानानें खालींल प्रमाणें अर्थ करावा.

१ स्थानैक्य, २ मतैक्य, ३ सामीप्य, ४ तद्गुणसारित्व, ५ तदधीनत्व, ६ तज्जन्यत्व, ७ अंतर्यामित्व, ८ तत्सदृशत्व, ९ तद्व्याप्यत्व अशी विवक्षा ठेवून या प्रकारानें अर्थ करावा.

"परे अव्यये एकीभवंति" ही श्रुति स्थानैक्य दाखवितें. सभेच्या वेळीं फार मोठा समुदाय एक झाला. याचा अर्थ एकत्र जमा झाले असा करतात.

भांडणाऱ्यांत ऐक्य झाले असें आपण म्हणतों याचा अर्थ एकमेंकांत मिळून गेले असा नसून त्यांचेमध्यें मतैक्य झालें हा त्याचा अर्थ होय.

येणें प्रमाणें आपाततः ऐक्यपर भासणाऱ्या श्रुतीचा भेदपर अर्थ करावा.

याप्रमाणें जीव व ब्रह्म याचेमध्येंच भेद आहे असें नव्हें, तर हा भेद पांच प्रकारचा आहे. तो असाः— १ जीवाजीवांत भेद आहे २ जीव व परमात्मा यांच्यांत भेद आहे ३ जीव व जड यांचेमध्यें भेद आहे. ४ जड व ईश्वर याच्यांत भेद आहे. ५ जडजडांत भेद आहे.

ज्या ज्या ठिकाणीं श्रुतिमध्यें भेदप्रतिपादक वाक्यें आहेत तीं सर्व व्यावहारिक भेद प्रतिपादक आहेत असें शंकराचार्य म्हणतात. त्याविषयीं मध्वाचार्य म्हणतात.

**न च व्यावहारिकभेदो अस्तीत्यत्र किंचिन्मानम्। भ्रांतिभेदत्वे श्रुतिसिद्धत्वमेव न स्यात्। नहि निर्दोषश्रुतिवाक्यसिद्धं भ्रान्तमिति वाच्यम्। उन्मत्तवाक्यवत्। सर्ववेदस्य अप्रामाण्यप्रसक्तेः। "सत्यः सः अस्य महिमा, त एते सत्यकामाः" इत्यादि श्रुतिभिः भगवद्गुणानां सत्यत्वमेव ज्ञायने। तदा कथं जीवभेदस्य असत्यता।**

[ हीं वाक्यें व्यावहारिक भेद प्रतिपादन करतात या म्हणण्यास कांहीं प्रमाण नाहीं. भ्रांतिमुळें भेद हा श्रुतिसिद्ध नाहींच. त्यांचें श्रुतिसिद्धत्व आहे असें मानल्यास उन्मत्ताच्या वाक्याप्रमाणें श्रुतीस अप्रामाण्य येईल. निर्दोष अशा श्रुतिवाक्यांनीं भ्रान्त ज्ञान होईल हें म्हणणें बरोबर नाहीं. "त्याचा महिमा खरा आहे" अशा तऱ्हेचीं वाक्यें भगवद्गुणांचें सत्यत्व प्रतिपादन करतात. अशा स्थितींत ब्रह्माशीं जीवाचा भेद आहे यांस असत्यत्व कसें म्हणतां येईल. ]

या रीतीनें पांच प्रकारचा भेद नित्य आहे.

**प्रपंचो यदि विद्येत निवर्तेत न संशय:**

**प्रपंच**:--हा पांच प्रकारचा भेद- **यदि विद्येत**-जर उत्पन्न होत असेल **तर्हि निवर्तेत**-तर नष्ट होईल यांत संशय नाहीं. पण तो प्रपंच उत्पन्न होत नाहीं. म्हणून त्याचा नाश नाहीं, अत एव तो नित्य आहे.

अशा तऱ्हेचा हा जो नित्य असणारा पंचविध भेद आहे त्यांचें ज्ञानानें जीव हा परमात्म्याच्या अनुग्रहास पात्र होतो.



## प्रकरण ५ वें

# हरेरनुचराः

गेल्या प्रकरणांत श्रीहरी व जीव आणि जड यांच्यामध्यें नित्य असा भेद आहे व तो मोक्षावस्थेंत राहतो हे अनेक प्रमाणांनीं दाखविलें आहे. जगत्‌हि सत्य आहे, परमात्माहि सत्य आहे व या उभयतांत असणारा भेद सत्य आहे. यांचे ऐक्य कदापि होत नाहीं तर या उभयतांचा–जगत्-घटक जीव व परमात्मा यांचा–संबंध काय ? असा प्रश्न उपस्थित झाल्यास सांगतात कीं " जीव हे श्रीहरीचे अनुचर आहेत. व त्यांनीं त्याच्या आज्ञे-प्रमाणें वागून स्वतःस नित्यसुखाची प्राप्ति करून घेतली पाहिजे." अनुचर या शब्दांत अनु,चर असे शब्द आहेत. अनु म्हणजे मागून चर् म्हणजे जाणारा. अनुयायी, सेवक असा त्याचा अर्थ आहे. म्हणजे परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें, इच्छेप्रमाणें वागणारा, त्याच्या स्वाधीन असणारा असा त्याचा स्पष्टार्थ होय. प्रजेचा अधिपति राजा असतो. व राजाच्या आज्ञेप्रमाणें सर्व प्रजाजन वागतात. याप्रमाणें श्रीहरीच्या आज्ञेप्रमाणें जीव वागतील तर त्यांस शाश्वत सुखाची प्राप्ती होते. हरेरनुचराः असें बहुवचन असल्या-मुळें जीव असंख्यात आहेत. आचार्य म्हणतातः—

> अनागता अतीताश्च यावंतः सहिताःक्षणाः ।
> अतीतानागताश्चैव यावंतःपरमाणवः ॥
> ततोप्यनंतगुणिता जीवानां राशयःपृथक् ।
> परमाणुप्रदेशेपि ह्यनंता जीवराशयः ॥

( मागें झालेले व पुढें होणारे जितके क्षण आहेत, अगर जितके झालेले व होणारे परमाणु आहेत यापेक्षां अनंतपटीनें जास्त जीवराशी आहेत. एका परमाणुच्या जागेंतहि अनंत जीवराशी आहेत. )

यावरून अनंतानंत जीवराशी आहेत. आतां जीवाचें लक्षण काय याविषयीं कांहीं द्वैती महानुभावांनीं सांगितलें आहे.

१ अज्ञानादिदोषयुक्तत्वं जीवस्य लक्षणम्
२ संसारित्वं अपरं लक्षणम्

( १ अज्ञानादि दोषयुक्तत्व हें जीवाचें लक्षण होय. २ संसारी असणें हें दुसरें लक्षण होय. )

या तऱ्हेनें जीवाचें लक्षण केल्यास ब्रह्मादिकांचें ठिकाणीं अज्ञान नाहीं, संसारित्व नाहीं. म्हणून ब्रह्मादिकांना जीवत्व नाहीं काय ? अशी शंका आल्यास त्याचें उत्तर देतात. ब्रह्मदेवांनाहि भय, अज्ञान किंचित् आहेच. आचार्य म्हणतातः--

अज्ञानं च चतुर्वारं द्विवारं भयमेव च ।
शोकोपि तावान्नान्यत्र कदाचिद्ब्रह्मणो भवेत् ॥
यत्र वायूदपद्मादिरूपेण प्रकृतिः स्थिता ।
एकस्तत्राबिभेद्ब्रह्मा विचार्य भयमत्यगात् ॥
कालोन्तकः प्रधानं च मृत्युरव्यक्तमित्यपि ।
उच्यते प्रकृतिःसूक्ष्मा श्रीभूर्दुर्गेति नामभिः ।
सैव ब्रह्मादि भयदा विष्णोश्च वशवर्तिनी ॥

( भागवत षष्ठस्कंध तात्पर्य )

[ ब्रह्मदेवांस चार वेळां अज्ञान व दोन वेळां भय, शोक एका क्षणार्धांत झालें. ]

ज्यावेळीं वायु, पाणी कमलरूपानें प्रकृति होती त्यावेळीं ब्रह्मदेव एकटे होते. त्यावेळीं त्यांना क्षणमात्र भीति वाटली व नंतर भयापासून ते मुक्त झाले.

काल, अंतक, प्रधान, मृत्यु अव्यक्त इत्यादि नावांनीं व श्री, भू, दुर्गा आदि नांवांनीं प्रसिद्ध असणारी सूक्ष्म प्रकृति या नांवानें जाणली जाते. तीच श्रीहरीच्या स्वाधीन असणारी ब्रह्मादि देवांना भय दाखविणारी आहे.

याशिवाय ऐतरेयभाष्य व बृहदारण्यभाष्य यांत ब्रह्मदेवालाहि किंचित् भय व अज्ञान दुःख आहे असेंच सांगितलें आहे.

आचार्यांनीं तत्वसंख्यानांत याविषयीं स्पष्ट निर्णय दिला आहे.

**दुःखस्पृष्टं तदस्पृष्टं इति द्वेधैव चेतनम्।**

**नित्यादुखा रमान्ये तु दुःखस्पृष्टा समस्तशः।**

दुःख स्पृष्ट व दुःखाचा स्पर्श नसलेले असे दोन प्रकारचे चेतन आहेत. त्यांत ज्यांस कधींहि दुःख नाहीं असें चेतन फक्त रमादेवी (लक्ष्मी) होय. व तिच्यावांचून बाकीचे सर्व चेतन दुःखस्पृष्ट होत.

जीवाचें स्वरूप अणुमात्र आहे. याविषयीं रामानुजाचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य व निंबार्काचार्य या सर्वांची एकवाक्यता आहे.

**बालाग्रशतभागस्य शतधा कल्पितस्य च।**

**भागो जीव : स विज्ञेय : स चानंत्याय कल्पते ॥** श्वेताश्वतर

याविषयीं श्रीमध्वाचार्य म्हणतातः—

**अणुमात्रोप्ययं जीवः स्वदेहं व्याप्य तिष्ठति।**

**यथा व्याप्यशरीराणि हरिचंदनविप्रुषः॥**

(ब्रह्मसूत्र भाष्य २-३-२५)

अशा तऱ्हेनें या जीवानें परमात्म्याची आज्ञा पालन करून त्याची प्रीति संपादन करणें हेंच त्याचें मुख्य ध्येय होय. श्रीहरीनें श्रुति-स्मृति-द्वारां जे वर्णाश्रमधर्म कथन केले आहेत त्याचें यथायोग्य पालन करणें, त्याच्या भक्ताविषयीं प्रेम बाळगणें, त्याच्या द्वेष्टयाविषयीं तिरस्कार करणें म्हणजे धर्म होत.

**श्रुतिस्मृति ममैवाज्ञा यस्तामुल्लंघ्य वर्तते।**

**आज्ञाच्छेदी मम द्रोहि न मद्भक्तो नच वैष्णवः॥**

[श्रुति आणि स्मृति यामध्यें कथन केलेलीं कर्में हीच माझी आज्ञा होय. ही आज्ञा जे उलंघन करतील ते माझ्या आज्ञेचा भंग करणारे होत; ते माझे भक्त नव्हेत तर ते माझे द्रोहि होत.]

इत्यादि अनेक प्रमाणांवरून त्याची आज्ञा पालन करणें म्हणजे श्रुति-स्मृत्युक्त धर्माचें पालन करणें होय.

यावरहि कित्येक अशी शंका घेतील कीं:—

जीव हा परतंत्र आहे असें तुम्हीच अगोदर सांगितलें आहे. स्वतंत्र आणि परतंत्र अशीं दोन तत्वें आहेत त्यांपैकीं स्वतंत्र तत्व परमात्मा व अस्वतंत्र तत्व तद्व्यतिरिक्त सर्व पदार्थ जर आहेत, म्हणजे जीव हा कोणत्याहि रीतीनें स्वतंत्रतया कार्य करूं शकत नाहीं तर, जीवाचा कर्ता-करविता जर परमात्मा आहे, त्याच्या प्रेरणेनें जर सर्व कार्य जीव करतो, तर वाईट कार्य अगर चांगलें कार्य याविषयीं जीवांस जबाबदार धरणें कितपत योग्य आहे? जर जीवांस स्वातंत्र्य असतें तर तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें त्यांस जबाबदार धरणें योग्य होईल. अशी शंका आल्यास आचार्य या प्रश्नाचें उत्तर निरनिराळ्या ठिकाणीं देतात. आचार्य म्हणतातः—

जीवाला किंचित्हि स्वातंत्र्य नाहीं असें मानलें तर विधिनिषेधरूप शास्त्राला वैयर्थ्य येईल. म्हणून श्रीहरीनें जीवास किंचित् स्वातंत्र्य दिलें आहे. त्यांस भगवद्दत्त स्वातंत्र्य असें म्हणावें. व ते स्वातंत्र्य सर्वकालीं आहे. जीव हा संसारांत असतांनाहि मोक्षप्राप्तिसाठीं प्रयत्न करीत असतो. तो काल्पनिक कर्ता नाहीं. मोक्षस्थितींतहि तो नानातऱ्हेनें आनंदानें क्रीडा करीत असतो, हें 'जक्षन् क्रीडन्' इत्यादि श्रुति सांगतात. म्हणून मोक्षांतहि त्यांस किंचित् भगवद्दत्त स्वातंत्र्य असावें असेंच सिद्ध होतें. आचार्यांनीं हा सर्व विषय 'कर्ता शास्त्रार्थवत्त्वात्' ब्र. सू. २–३–३४–३५–३६ या तीन सूत्रभाष्यांत सांगितला आहे. तें भगवद्दत्त स्वातंत्र्य कसें असतें हें 'यथाचतक्षोभयथा' २–३–४१ ते ४२ या सूत्रानें सांगितलें आहे. आचार्य आपल्या भाष्यांत म्हणतातः—

**यथा तक्षगः कारयितृनियंतृत्वं कर्तृत्वं च विद्यते एवं जीवस्यापि ॥**

ज्याप्रमाणें सुतार वाड्याच्या मालकानें सांगितल्याप्रमाणें घरांतील काम करीत असतो त्याप्रमाणेंच जीवाला किंचित् स्वातंत्र्य आहे. विष्णुरहस्य पुराणांतील वचन याविषयीं फारच स्पष्ट आहे.

**मयैव दत्तस्वातंत्र्यं केवलेष्वपि कर्मसु ।**
**तावन्मात्रेण संमुग्धा स्वतंत्रं मन्यते निजम् ॥**

[नुसत्या कर्माचरणाविषयीं मी (विष्णुनें) जीवांस किंचित् स्वातंत्र्य दिलें आहे. पण तेवढ्यानेंच जीव मोहित होऊन स्वतःस सर्वतंत्रस्वतंत्र समजतो ]

भारततात्पर्यनिर्णयांत आचार्यांनीं असेंच एके ठिकाणीं सांगितलें आहे. " प्रत्यक्षैषा कर्तृता जीवसंस्था तथागमादनुमानाच्च सर्वम् "

परमात्म्याचें जे अमर्याद स्वातंत्र्य आहे त्याचा अगदीं किंचित् भाग स्वातंत्र्य त्यानें जीवास दिलें आहे. व त्या स्वातंत्र्यांत त्यानें आपल्या स्वतःच्या उद्धारासाठीं, शाश्वत सुखासाठीं प्रयत्न केला पाहिजे.

अशा या परतंत्र जीवांनीं नेहमीं श्रीहरीची उपासना करावी. ती उपासना कोणत्या भावनेनें करावी हें आचार्यांनीं अनुव्याख्यानांत सांगितलें आहे.

तस्मादुपास्यो विष्णुर्हि ज्ञातव्यः सज्जनैः सदा ।
तथैवोपासते संतस्तथैवोपदिशंति च ।
मम स्वामी हरिर्नित्यं सर्वस्य पतिरेव च ।
इति ध्येयः सर्वदैव भगवान्विष्णुरव्ययः ॥

[ याप्रमाणें विष्णुची उपासना करावी. त्याप्रमाणेंच त्यांस जाणण्याचा प्रयत्न करावा. याप्रमाणें सज्जन उपासना करतात. श्रीहरी हाच माझा स्वामी; सर्वांचा अधिपति आहे. आणि याच तऱ्हेनें त्याचें ध्यान करावें.]

( अनुव्याख्यान अ. ४–१ )

प्रकरण ६ वें

# तारतम्य

भगवान् श्रीहरी उपास्य व जीव उपासक अत एव उपास्य–उपासक भावानें त्या उभयतांत नित्य भेद आहे, हें विस्तरशः सांगितल्यानंतर या उपासक जीवांतहि त्यांच्या योग्यतेप्रमाणें उच्चत्व नीचत्व आहे हें या प्रकरणांत दाखवावयाचें आहे. सर्वांत श्रेष्ठ श्रीहरी आहेत, हें विष्णु· सर्वोत्तम या प्रकरणांत विस्तरशः दाखविलें आहे. आतां त्यांचेंपेक्षां कनिष्ठ कोण ? यांचे विवेचन केलें पाहिजें.

## १ महालक्ष्मी

सर्व अस्वतंत्र चेतनांत रमादेवी सर्वश्रेष्ठ आहे. परमात्म्यापेक्षां अनंतानंत गुणांनीं कनिष्ठ असून ब्रह्मदेवापेक्षां कोटिगुणांनीं श्रेष्ठ आहे. परमात्म्याच्या अनुग्रहानें सर्व कार्य करण्यास समर्थ आहे. अष्टधा जड प्रकृतिला अभिमानी असून परमात्म्याच्या अधीन आहे, रमादेवी परमात्म्याशीं नित्यावियोगिनी आहे. ती समासम आहे. म्हणजे देशकालाच्या योगानें परमात्मसम असून गुणांनीं परमात्म्याशीं असम आहे. परमात्मा हा जसा देशकाल व्यापून आहे तद्वत् लक्ष्मीदेवीहि हरीबरोबर देशकाल व्यापून आहे व नित्यमुक्त आहे.

श्रीहरीनें अवतार धारण केल्याबरोबर लक्ष्मीदेवी नित्यावियोगिनी असल्यामुळें श्रीहरीच्या सेवेसाठीं अवतार घेतें. जया, श्री, भू, दुर्गा, अंभ्रणी, ऱ्ही, दक्षिणा, जयंती (ऋषभभार्या), जानकी, रुक्मिणी, सत्यभामा इत्यादि तिचे अनेक अवतार आहेत.

लक्ष्मीदेवी नित्यमुक्त असल्यामुळें व सकलइच्छापरिपूर्ण असल्यामुळ लक्ष्मीदेवीचे सर्म कर्म लीलात्मक असतें. व परमात्म्यामाणें प्रादुर्भावाकरितां शुक्रशोणित गर्भवासादि संबंध नाहीं.

## श्रीरमात्मक प्रकृतीचीं तीन रूपें आहेत

१ अव्यक्त—हें पहिलें रूप–याच रूपापासून झालेलें दुसरें–
२ व्यक्ताव्यक्त—या रूपापासून झालेलें तिसरें रुप–
३ व्यक्त—

अव्यक्तरूप ब्रह्मदेवाच्या दुसऱ्या द्विपरार्धकालीं (ब्रह्मप्रलय) परमात्मा उपचरित अव्यक्तरूपी म्हणवितो. त्या कालीं चित् प्रकृती नामक रमादेवी आपल्या अभिमन्यमान प्रकृतींत सर्व भूतांचा लय करून घेऊन स्वतः अव्यक्त प्रकृतीची मानिनी होते.व परमात्म्याच्या अव्यक्त स्वरूपाचे टायीं अत्यंत सामीप्यानें राहते. याच स्वरूपाला अव्यक्त म्हणावें.

याच रूपापासून सृष्टिसर्जन काळ येतांच सृष्टि करण्याविषयीं दुर्गारूपी रमादेवी अभिमानित्वानें इच्छा करते. त्या इच्छेनुसार परमात्मेच्छेनें महत्तत्वाख्य सूक्ष्म सृष्टि उत्पन्न करण्याकरितां जडप्रकृतीचे अभिमानित्वा-विकारानें रमादेवी जड प्रकृतीला प्रेरणा करिते. तेव्हां जड प्रकृती उपादान कारण होते. त्यावेळचें रूप व्यक्ताव्यक्त असतें. इच्छा धारण करणें ही व्यक्तता; स्थूल क्रिया नाहीं म्हणून अव्यक्तता. म्हणून श्रीरमात्मक प्रकृती-च्या दुसऱ्या रूपास व्यक्ताव्यक्त असें नांव आहे.

या दुसऱ्यापासून व्यक्तरूप उत्पन्न झालें. इच्छारूपानें सूक्ष्मसृष्टि महत्तत्व उत्पन्न झालें. नंतर अहंकारात्मक स्थूल सृष्टीस सुरवात करतांना व्यक्त-रूप म्हणजे सृष्टरूप धारण करून स्थूलसृष्टीस उपादान कारण झालें. हें तिसरें व्यक्तरूप होय. या तिसऱ्या रूपानें अहंकारिक स्थूलसृष्टी उत्पन्न होते. याप्रमाणें श्रीरमात्मक प्रकृतीचीं तीन रुपें संक्षेपानें सांगितलीं आहेत.

अष्टधा प्रकृतिरूपानें श्रीरमादेवी, जगदुत्पत्ति व स्थिति लयादि कार्यास परमात्म्याला अनुकूल राहून परमात्म्याच्या आज्ञेनुसार जड प्रकृतिकडून जगद्व्यापार चालविते. म्हणून ती आपणांस परमात्म्याची मुख्य प्रधान म्हणविते. जगत्कार्य कर्तृत्वानुरोधानें तिला जीं जीं नांवें प्राप्त झालीं आहेत तीं खालीं दर्शविल्याप्रमाणें आहेत.

प्रधान......असदात्मिका......अव्यक्ता
प्रकृति......सदसदात्मिका......व्यक्ताव्यक्ता
सदात्मिका......व्यक्ता

रमादेवी मूलमाया पराप्रकृति आहे. पंचमहाभूतें व सत्वादि त्रिगुण ( सत्व, रज, तम ) यांची अभिमानी असून पंचमहाभूतांच्या व त्रिगुणांच्या ठिकाणीं व्याप्त राहते व परमात्मप्रेरणेनुसार जगदुत्पत्यादि कार्य करते. म्हणून जडप्रकृति जगाला उपादान कारण झाली आहे.

पंचमहाभूतें व तीन गुण मिळून आठ तत्वें हे सृष्टीचें बीज आहेत. या आठ तत्वानांच अष्टधा जडप्रकृति म्हणतात. या प्रकृतीला अभिमानी असणारी मूल माया रमादेवी हिलाच चित्प्रकृति म्हणतात. या चित् प्रकृतीकडून वरील आठ तत्वांचा संयोग परमात्मा करवतो. या संयोगावस्थेलाच जडप्रकृति म्हणतात. म्हणून ती जडप्रकृति ही जगाचे उपादान कारण असून परमात्मा हा निमित्तकारण होय. वर दाखविलेल्या आठ तत्वांचा संयोग म्हणजे अनादि नित्यस्वरूप व पृथगावस्थारूप याचे पृथक् पृथक् तत्त्वावयव हे सूक्ष्मरुपी प्रकृतीच्या पृथक् अवयवांचा आरंभ संयोग होय. त्या संयोग विशेषांच्या योगानें अवस्थांतर होत होत सूक्ष्मच स्थूलत्वाला येतें. या अवस्थांतरालाच परमात्म्याची विचित्र सृष्टि म्हणतात. जो आरंभसंयोग परमात्मेच्छेनें होतो त्या संयोगांत मिळणारा व मिळविला जाणारा जो पदार्थ त्यालाच कारण असें नांव आहे. त्या संयोगाचा आदि आणि त्याचा वियोग याचा अंत होऊं शकत नाहीं.

संयोगानंतर एकरूप बनते व वियोगानंतर त्याची एकरूपता राहात नाहीं. यालाच कार्य हें नांव आहे. सारांश, जें उत्पन्न होतें तें कार्य व ज्या पासून तें उत्पन्न होतें तें कारण. कारणाकडून कार्य जो करवितो तो त्याचा कर्ता होय. तात्पर्य जगाचा कर्ता परमात्मा, कारण चित्प्रकृति रमादेवी, व जग हें कार्य होय. चित्प्रकृति ही उपादान कारण, परमात्मा निमित्त कारण व जग हें कार्य. अशा प्रकारची ही सृष्टि आहे.

**नित्या सत्वरजस्तमसां साम्यावस्थायाः प्रकृतेरुत्पन्नानां परमसूक्ष्माणां पृथक् पृथक् वर्तमानानां तत्वपरमाणूना प्रथमः संयोगारंभः संयोगविशेषादवस्थांतरस्य स्थूलाकाराप्राप्तिः सृष्टिरुच्यते ।**

उपादानकारण जडप्रकृतिचें अभिमानित्व श्रीरमादेवीकडे आहे. हा अधिकार कांहीं सामान्य नाहीं. जरी ही रमादेवी परमात्म्यापेक्षां अनंतानंत पटीनें अवर आहे, तरी या देवीला परमात्म्यानें दिलेल्या दत्तस्वातंत्र्य-अधिकारांत ब्रह्मदेवास सत्यलोकाधिपत्य, रुद्रदेवास रुद्रपद व इतर देवतांस त्यांचीं पदस्थानें देण्याचें सामर्थ्य आहे. रमादेवीपेक्षां ब्रह्मा, वायु वगैरे कोटीपटीनें अवर म्हणजे कनिष्ठ आहेत. तात्विक देवता अभिमानी रमादेवी आहे आणि ही देवी सदा सत्य व नित्य आहे. इतकेंच नव्हे, तर ती नित्यमुक्तहि आहे.

**सत्वं समवेतौ प्रकृतिश्च परमश्च नित्यौ सर्वगतौ नित्यमुक्ताविति सौपणी श्रुति ह. स. १९।२.**

जड प्रकृतीची अभिमानी चित्प्रकृति या नांवानें प्रसिद्ध असणारी श्री-रमादेवी प्रलयकालीं अव्यक्त रूपानें उपचारित अव्यक्त तत्वाख्य परमात्म्याच्या सन्निध अत्यंत सामीप्यानें लय पावून जगदुपादानकारण जगत्-कार्याविषयीं उदासीन राहते. तेव्हां ती अव्यक्ता अथवा असदात्मिका म्हणविते. हें पहिलें रूप होय.

सृष्टिकारण समीप येतांच परमात्मप्रेरणेनें जगदुपादानकारण जडप्रकृतीचें अभिमानित्व अंगिकारून सृष्टि सर्जन करण्याविषयीं इच्छा करते तेव्हां ती व्यक्ताव्यक्त अथवा सदसदात्मिका म्हणविते. हें दुसरें रूप होय.

सृष्टि करण्यास जेव्हां आरंभ करते तेव्हां ती व्यक्ता अथवा सदात्मिका म्हणविते. हें तिसरें रूप होय.

याप्रमाणें त्रिगुणाभिमानित्वानें तीन रूपें व तीन नांवें तिनें धारण केलीं आहेत. तीं खालीं दर्शविलीं आहेत.

सत्वात्मक......श्रीदेवी......अव्यक्ता
रजात्मक......भूदेवी......व्यक्ताव्यक्ता
तमात्मक......दुर्गादेवी......व्यक्ता

वरील त्रिविधरूपें चेतन प्रकृतीचीं दुःखास्पृष्ट असून जीवास भगवत्प्राप्तिविषयक ज्ञान देणारीं आहेत आणि जड प्रकृतीचीं अभिमानी आहेत. याचप्रमाणें जडप्रकृतीचीं तीन रुपें आहेत. हीं रूपें दुःखस्पृष्ट

असून जीवास अज्ञान देणारीं आहेत. हीं तीनही रूपें महत्तत्त्वास आरंभ करून, परिणामरूपानें अंगिकार करून स्पष्टतेस आणतात. म्हणून चेतन व अचेतन प्रकृती अस्वतंत्र परमात्माधीन आहे.

(श्रीभगवान् विष्णु हा निर्गुण ब्रह्म आहे परमात्मा श्रीहरी प्रकृतिजन्य गुणांनीं व आकारानें रहित म्हणून तो निर्गुण ब्रह्म झाल्यावर सगुण ब्रह्म कोण हा प्रश्न साहजिक वाचकापुढें येईल त्याचें उत्तर पुढीलप्रमाणें आहे.)

## सगुण ब्रह्म

श्रुतिस्मृत्यादि प्रमाणानें एका अर्थानें सगुण ब्रह्म म्हणजे श्रीरमादेवी होय. कारण रमादेवी त्रिगुणांची अभिमानी असून त्रिगुणयुक्त जडप्रकृत्य-भिमानित्वाचा अंगिकार करते. व जगदुत्पत्यादि कार्य करते. म्हणून जगदुत्पादानकारण अभिमानित्व तिच्याकडे आहे. परमात्मा निमित्त-कारण आहे. म्हणून श्रीरमादेवी सगुण ब्रह्म होय. चोवीस तत्त्वें जरी तिचीं प्रत्यक्ष अंगें नाहींत तरी अभिमानित्वामुळें व तिच्या लक्ष्मीतत्वानें उत्पन्न झाल्यामुळें तिच्या अंगासारखींच समजलीं जातात. म्हणून रमा-देवीला सगुण ब्रह्म म्हणतात.

श्रीरमादेवी स्त्री आहे. तिला ब्रह्म हें पुरुष नांव कसें शोभतें ? अशी शंका कदाचित् येण्याचा संभव आहे. त्याचें उत्तर पुढीलप्रमाणें आहे.

श्रीरमादेवीस परमात्मकृपेनें पुरुषशक्ति आहे. म्हणूनच ती जगदुत्प-त्यादि कार्य करीत आहे. ती परमात्म्याची मुख्य प्रधान आहे. तिला ब्रह्मा-दिकांचें नियमन करण्याचें सामर्थ्य व स्वातंत्र्य परमात्म्यानें दिलें आहे. व म्हणून पुरुष नांव दिलें आहे.

पुल्लिंगेन उच्यते स्त्री च पुंवच्छक्तिमती यतः ।
यावरून श्रीरमादेवी म्हणजेच सगुण ब्रह्म होय.

श्रीरमादेवीच्या अव्यक्तरूपालाच अव्यक्त तत्त्व म्हणतात.

येणेप्रमाणें रमादेवीविषयीं शास्त्रग्रंथांत विवेचन केलें आहे. रमादेवी-सुद्धां अस्वतंत्र चेतनांत अंतर्भूत होते. यानंतर ब्रह्मादि जीवांचें तारतम्य आहे.

२ विधि–ब्रह्मदेव, वायुदेव

लक्ष्मीदेवीपेक्षां कोटिगुणांनीं कनिष्ठ, सकलजीवोत्तम होत.

३ ब्रह्माणी–ब्रह्मदेवाची भार्या, दुसरे नांव सरस्वती.

भारती–वायुदेवाची भार्या, ऋजुगणापेक्षां शंभर गुणांनीं कनिष्ठ होय.

४ गरुड, शेष, रुद्र

सरस्वती भारतीदेवीपेक्षां शंभर गुणांनीं कनिष्ठ आहेत.

५ जांबवती, नीला, भद्रा, मित्रविंदा, कालिंदी, लक्षणा.

जांबवतीचे ठिकाणी लक्ष्मीदेवीचा आवेश असल्यावेळीं जांबवती शेषदेवा समान समजावी. इतर स्त्रियांचे ठिकाणीं लक्ष्मीदेवीचा आवेश असल्यावेळीं शेषदेवापेक्षां पांच गुणांनीं कनिष्ठ समजाव्यात. यांचेंठिकाणीं लक्ष्मीचा आवेश नसतो त्यावेळीं कामदेवापेक्षां वीस गुणांनीं श्रेष्ठ होत.

६ सौपर्णी, वारुणी, पार्वती

शेषदेवापेक्षां १०० गुणांनीं कनिष्ठ होत. ह्या परस्पर समान होत. पार्वतीपदीं असतां सौपर्णी वारुणीपेक्षां किंचित् न्यून होय.

७ इंद्र, काम

पार्वतीपेक्षां दहा गुणांनीं कनिष्ठ होत. काम हा इंद्रापेक्षां किंचित् न्यून होय.

८ अहंकारिक प्राण

इंद्रापेक्षां शंभर गुणांनीं कनिष्ठ होय.

९ अनिरुद्ध, रति, मनु, गुरु, दक्ष, शची

इंद्रापेक्षां शंभर गुणांनीं कनिष्ठ होत.

१० प्रवहवायु

अनिरुद्धादिकापेक्षां पांच गुणांनीं कनिष्ठ होय.

११ यम, सूर्य, चंद्र, शतरूपा

प्रवहवायुपेक्षां दोन गुणांनीं अधम होत.

१२ वरुण

चंद्रसूर्यापेक्षां $\frac{3}{2}$ गुणांनीं कनिष्ठ होय.

१३ नारद

वरुणापेक्षां कनिष्ठ होय.

१४ भृगु, अनल, प्रसूति, प्रल्हाद
नवव्या विभागांत असलेल्या दक्षप्रजापतिपेक्षां शंभर गुणांनीं कनिष्ठ होत.

१५ विश्वामित्र, मरीचि, अत्रि, अंगिरस, पुलस्त्य,
पुलहक्रतु, वसिष्ठ, वैवस्वत, मनु
अग्निपेक्षां दोन गुणांनीं कनिष्ठ. मित्रनामक सूर्यापेक्षां किंचित् गुणांनीं अधिक होत. परस्पर समान योग्यतेचे होत.

१६ मित्र, तारा, निऋति, प्रावहि
मरीच्यादि ऋषीपेक्षां किंचित् कनिष्ठ व पर्जन्यदेवतेपेक्षां दोन गुणांनीं अधिक होत.

१७ विष्वक्सेन, अश्विनीदेवता, गणपति, कुबेर, शतस्थ ( शंभर देवतांचा समुदाय )
या शंभर देवतापैकीं,सात वसु,'दहा रुद्र, सहा आदित्य, ४८ मरुद्गण, १० विश्वेदेव, १ ऋभु, २ द्यावा. पृथ्वी यांचे अभिमानी, ३ पितर असें ८६ या विभागांत येतात.

सोळाव्या विभागांतील मित्रादिकापेक्षां किंचित् न्यून होत. मुख्य वायु दुसऱ्या विभागांत येतात. मुख्य रुद्रदेव ४ थ्या विभागांत येतात अग्नि १५ व्या विभागांत येतो. अहंकारिक प्राण, प्रवह वायु ९ व ११ या विभागांत येतात.

देवतामध्यें तात्विक, कर्मज, आजानज असे तीन भेद आहेत. श्रीहरीच्या आदिसृष्टींत देवत्वास आलेल्यांना तात्विक देवता असें नांव आहे. ब्रह्माण्डांत शुभ कर्म करून देवकोटीस प्राप्त झालेल्यांस कर्मज देवता म्हणतात. अप्रसिद्ध आणि देवकुलांत उत्पन्न झालेल्यास आजानज देवता म्हणतात. आतांपर्यंत तात्विक देवतांतील तारतम्य सांगितलें आहे. आतां कर्मज देवतांतील तारतम्य सांगतात.

१८ सनकादिक, या ऋषींपैकीं कामावतार सनत्कुमार यांचा समावेश सातव्या विभागांत होतो. इंद्र चौदा आहेत. त्यापैकीं बली नामक इंद्रापासून पुढील सात या विभागांत येतात.

प्रधान अग्नीचा पुत्र पावक, इंद्राचा पुत्र जयंत, देवयानमार्गस्थ अर्चिरादिदेवता, पितृयानमार्गस्थ धूमादिदेवता, नवग्रहापैकीं मंगळ, शुक्र, राहू, केतु, जयविजयादि हरिपार्षद, आठ गंधर्व, अप्सरा स्त्रिया, पितृगण, ७ अभिमानी देवता. काल, दिक्, अंतरिक्ष, भूतवायु, पर्वत, नदी, सिकता, सरोवर, कूप, औषधी, पारिजातादि वृक्ष, हवि, कपाल, यूपादिक यज्ञद्रव्यें यांच्या अभिमानी देवता. तापस, स्वायंभुव, वैवस्वत यांचेशिवाय अकरा मनु, उत्तथ्य, च्यवन, भूतभविष्यज्ञानी ऋषि, वैन्य, कार्तवीर्य, शशबिंदु, प्रियव्रत, पृथु, दुष्यंतपुत्र भरत, ध्रुव, मांधाता, गय, भरत, हरिश्चंद्र, परीक्षित्, या सर्वांचा या अठराव्या विभागांत समावेश होतो. एकादश मनु अग्नीपेक्षां शंभर गुणांनीं कनिष्ठ व आजानज देवतापेक्षां शंभर गुणांनीं श्रेष्ठ होत.

१९ गंगा, पर्जन्य, संज्ञा, रोहिणी, शामला, विराट्.
मित्रापेक्षां गुणांनीं किंचित् न्यून.

२० अप्रसिद्ध देवता
एकोणीसाव्या विभागांतील देवापेक्षां किंचित् कनिष्ठ.

२१ स्वाहा—अग्निभार्या
गंगादि देवस्त्रियापेक्षां दोन गुणानें कनिष्ठ असून २३ व्या विभागांतील उषादेवीपेक्षां दहा गुणांनीं श्रेष्ठ होय.

२२ बुध ( कालाख्य कलाभिमानी )
स्वाहा देवीपेक्षां किंचित् न्यून होय.

२३ उषा (नामाख्य कलाभिमानी)
बुधापेक्षां किंचित् कनिष्ठ, स्वाहापेक्षां १० गुणांनीं कनिष्ठ

२४ शनि—(भूमाख्य कलाभिमानी)
उषादेवीपेक्षां किंचित् कनिष्ठ होय.

२५ पुष्कर (कर्माख्य कलाभिमानी)
शनिपेक्षां किंचित् अधम, असून उषेपेक्षां दहा गुणांनीं कनिष्ठ होय.

२६ आजानज देवता. अग्निची स्त्री संतान, कृष्णपत्नी १६१००. या समुदायांत तात्विक, कर्मज देवतांवाचून बाकीचे सर्व देव, १०० पितर, ३० असुर देवांचें सेवक, १०० गंधर्व, १०० अप्सरा, १०० सिद्ध, ७०

यक्ष, ३० चारण, ७० भूत, ७० प्रेत, ७० पिशाच, ५० विद्याधर, ७० किन्नर, ७० गुह्यक, ७० नाग, ७० किंपुरुष यांचा समावेश होतो. अग्निच्या १६१०० मुलींनीं आपणांस श्रीकृष्णच पति मिळावा म्हणून तपश्चर्या केली होती. त्याचें फळ म्हणून त्यांना श्रीकृष्णपत्नीत्व मिळालें. या स्वरूपतः आजानज देवतासमान होत. पण यांचे ठिकाणीं लक्ष्मीदेवीचा आवेश असल्यामुळें आजानज देवतापेक्षां किंचित् श्रेष्ठ होत.

२७ अंतर्दर्शी ऋषि

हे ऋषि आजानज देवापेक्षां शंभर गुणांनीं कनिष्ठ होत.

२८ चिर पितृगण

विसाव्या विभागांतील देवापेक्षां शंभर गुणांनीं कनिष्ठ होत.

२९ देव गंधर्व

अठ्ठाविसाव्या विभागांत सांगितलेल्यापेक्षां शंभर गुणांनीं कनिष्ठ होत.

३० मनुष्य गंधर्व

देव गंधर्वापेक्षां शंभर गुणांनीं कनिष्ठ.

३१ अंतर्दर्शी राजे

एकोणिसाव्या विभागांत सांगितलेल्या राजे लोकांना सोडून बाकीचें या विभागांत येतात.

३२ मनुष्योत्तम

वरील विभागांपेक्षां शंभर गुणांनीं अधम होत. याप्रमाणें देवता तारतम्य सांगितलें आहे. श्रीवेदव्यासांना अभिमत असणाऱ्या या द्वैतसिद्धान्तांत तारतम्यज्ञान याला महत्वाचें स्थान आहे. म्हणून या तारतम्य ज्ञानाशिवाय मुक्ति नाहीं. अत एव हें तारतम्यज्ञान अवश्य पाहिजे.

हें तारतम्य विवेचन आचार्यांनीं आपल्या सदतीस ग्रंथांत अनेक ठिकाणीं केलें आहे तें या प्रकरणांत दिलेलें आहे. विशेष ज्ञानेच्छूंनीं तारतम्यस्तोत्र वगैरे ग्रंथ पाहावेंत.

# मोक्ष

गेल्या प्रकरणांत सांगितलेलें तारतम्य हें जसें संसारांत अबाधित असतें तसेंच तें मुक्तींतहि आहेच. तर मोक्ष व संसार यांत फरक काय राहिला ? आणि मग जीवानें संसारत्याग करून मुक्तीसाटीं काय म्हणून प्रयत्न करावा ? अशी शंका आल्यास "मुक्तिर्नैजसुखानुभूतिः" असें उत्तर देतात व हा स्वरूपसुखाचा अनुभव जीवावर जें प्राकृतिक आवरण असतें तें दूर झाल्यावांचून येत नाहीं.

सामान्यतः सात्विक, राजस व तामस असे तीन प्रकार जीवांत आहेत. सत्वगुणी जीवांस मोक्षाची प्राप्ति होते; रजोगुणी जीव नित्यसंसारी होत व तमोगुणी जीव अंधतमाधिकारी होत.

जीव व देह या दोन वस्तु भिन्न आहेत. जीव ज्यावेळीं स्वरूपाच्छादक अविद्येनें व्याप्त होतो त्यावेळीं तो अहंकारानें ग्रस्त होऊन संसारांत येतो. नंतर त्यास त्याच्या कर्माप्रमाणें ऐहिक सुखदुःख प्राप्त होतें. सुखदुःख भोगण्यास हा प्राकृतिक देह साधन आहे. सामान्यतः प्रत्येक जीवास स्थूल, सूक्ष्म, लिंग, असे स्वरूप चार देह आहेत. त्यापैकीं पहिल्या तीन प्राकृतिक देहत्यागानंतर स्वरूपदेह प्रकट होतो. व या देहद्वारां स्वयोग्य सुखाचा अनुभव प्राप्त होणें यालाच मोक्ष प्राप्त होणें असें म्हणतात. प्राकृत देहामुळें भोगल्या जाणाऱ्या सुखदुःखापेक्षां स्वरूपभूत सुख हें निराळें आहे. तें सुख नित्य निर्दोष आहे.

हें मुक्तींतील नित्य व निर्दोष असणारे सुख प्रत्येक जीवास मिळत नाहीं. कारण हा मोक्ष त्रिविध जीवांना तीन प्रकारचा मिळतो. नित्यसुखरूप मुक्ति फक्त सात्विक जीवासच मिळते. या मुक्तियोग्य जीवांत ब्रह्मादि देव, ऋषि, पितृगण, चक्रवर्ती, मनुष्योत्तम इत्यादिकांचा समावेश होतो.

रजोगुणी जीवांस नित्यसंसाररूप मोक्ष प्राप्त होत असतो. त्यांत कांहीं जीव स्वर्गप्रचुर, कांहीं भूप्रचुर तर कांहीं नरकप्रचुर आहेत.

तमोगुणी जीवांत दैत्य, राक्षस, पिशाच व मनुष्याधम यांचा समावेश होतो. या जीवांना नित्य दुःख प्राप्त होतें.

सात्विक जीवांना प्राप्त होणारा मोक्ष चार प्रकारचा आहे.

**कर्मक्षयस्तथोत्क्रान्तिर्मार्गो भोगश्चतुष्टयम् । ( अनु० ३-४ )**

१ कर्मक्षय, २ उत्क्रमण, ३ मार्ग, ४ भोग असा चार प्रकारचा मोक्ष आहे.

## कर्मक्षय

साधकास बिंबापरोक्ष होतांच साधकाच्या संचितकर्माचा नाश होतो. विनाश म्हणजे अनिष्ट पुण्याचें सुहृदांस दान व पापाचें द्वेष्ट्यांस दान होय. व कांहीं पुण्याचा स्वरूपतः नाश होतो. प्रारब्धकर्माचा भोगानेंच नाश होतो. ब्रह्मादि जीव आपआपल्या अधिकाराचा अनुभवरूप भोग घेतात. त्यामुळें त्यांच्या प्रारब्धाचा नाश होतो.

प्रारब्धकर्माचा क्षय होण्यास सर्व मुमुक्षुनां सारखाच काल लागत नाहीं. तर प्रत्येकाच्या योग्यतेप्रमाणें कमी अधिक काल लागतो.

ब्रह्मदेवांस आपल्या प्रारब्धकर्माचा उपभोग घेण्याकरितां शंभर ब्रह्मकल्प सत्यलोकाचें आधिपत्य स्वीकारावें लागतें. गरुडशेषरुद्रांना पन्नास ब्रह्मकल्पांत प्रारब्धकर्माचा उपभोग घ्यावा लागतो. इंद्र, काम यांना वीस ब्रह्मकल्पापर्यंत प्रारब्धकर्म भोगावें लागतें. सूर्य, चंद्र आदि देवांना दहा ब्रह्मकल्पापर्यंत प्रारब्धकर्म भोगावें लागतें. मनुष्योत्तमांस एक ब्रह्मकल्पांत प्रारब्धकर्माचा उपभोग घ्यावा लागतो.

प्रारब्धकर्म भोगण्याच्या कालावधींत जें पापपुण्यात्मक कर्म घडतें त्यापैकीं इष्टपुण्य सोडून बाकी सर्वकर्माचा परमात्मा नाश करतो. इष्टपुण्य मात्र साधकांस मुक्तींत उपयोगी पडावें म्हणून कायम ठेवतो.

## उत्क्रमण

**याप्रमाणें प्रारब्धकर्माचा भोगानें नाश झाल्यावर श्रीहरीच्या प्रसादानें शेवटच्या देहांतून ब्रह्मनाडीच्या द्वारां उत्क्रमण होतें.**

हृदिस्थेनैव हरिणा तस्यैवानुग्रहेण तु।
उत्क्रांतिर्ब्रह्मरंध्रेण तमेवोपासतो भवेत्॥

[ आपल्या हृदयस्थ हरीच्या अनुग्रहानेंच ब्रह्मरंध्राच्या मार्गानें उत्क्रमण होतें. ]

ब्रह्मरंध्र म्हणजेच ब्रह्मनाडी व या ब्रह्मनाडीला सुषुम्ना नाडी असें म्हणतात. याविषयीं आचार्य आपल्या तंत्रसार नामक ग्रंथांत म्हणतातः—

मध्ये सुषुम्ना विज्ञेया वज्रिकार्याप्रकाशिनी।
वैद्युता ब्रह्मनाडीति सैव पंचप्रभेदिनी॥ [ तंत्रसार ]

सुषुम्ना नाडी देहांत मूलाधारापासून आपल्या मस्तकापर्यंत सरळ रेषेंत लांब शलाकेप्रमाणें असतें.

मूलाधारं समारभ्यत्वामूर्धानमृजुस्थिता।
मध्ये सुषुम्ना विज्ञेया......[ तंत्रसार ]

[ मूलाधारापासून मस्तकापर्यंत सरळरेषेंत गेलेली नाडी हिला सुषुम्ना म्हणतात. ]

या सुषुम्ना नाडीचे इडा, पिंगला, वज्रिका, धारिणी असे चार प्रकार आहेत. या सुषुम्ना नाडीच्या द्वारां ज्यांचे उत्क्रमण होतें त्या सर्वांस एकच फल मिळतें असें नाहीं. कारण अपरोक्षज्ञानी प्रतीकालंबन व अप्रतीकालंबन असे दोन प्रकारचे आहेत.

**प्रतीकालंबनः**—आपल्या हृदयस्थ बिंबाची उपासना करणारे यांस प्रतीकालंबन म्हणतात.

**अप्रतीकालंबनः**—आपल्या हृदयस्थ श्रीहरीशिवाय इतरत्र असणाऱ्या परमात्म्याचे उपासक यांस अप्रतीकालंबन असें नांव आहे. यांनाच व्याप्तोपासक असें म्हणतात.

अप्रतीकालंबनानें अपरोक्ष झालेल्या कांहीं देवाशिवाय कांहीं जणांचें उत्क्रमण सुषुम्ना नाडीच्या द्वारें होतें. त्यावेळीं त्यांच्या हृदयाचें अग्र प्रकाशित होतें. त्यामुळें त्या ज्ञान्यांस बाहेर पडण्याचें द्वार दिसतें, त्यावेळीं ते ज्ञानी प्राज्ञनामक परमात्म्यासह बाहेर पडतात. त्या परमात्म्याच्या पुढें

वायुदेव जातात. अर्चिरादि मार्गानें जात असतां वाटेंत ठिकठिकाणीं त्यांची पूजा होते. त्यानंतर क्रमानें त्याना वैकुंठलोकाची प्राप्ति होते. त्यांत त्यांना तुरीयनामक परमात्म्याची प्राप्ति होते.

प्रतीकालंबन जे ज्ञानी आहेत त्यांना अंतकालीं नियमेंकरून भगवंताचें स्मरण होतें. ते सुषुम्ना नाडीजवळच्या नाडीनें प्रकाशित भगवत्प्रकाशयुक्त द्वारानें गमन करितात. आर्चिरादि मार्गानें जातांना अर्चि, अहर्लोक, शुक्लपक्ष इत्यादि क्रमानें वायुलोकाची प्राप्ति होते. वायुलोकांत आल्यावर वायुच त्यांना चतुर्मुख ब्रह्मदेवाच्या जवळ नेऊन पोंचवितात. त्यानंतर ब्रह्मदेवहि स्वशरीरलयानंतर त्यांना वैकुंठास नेतो.

एका गुणाची उपासना करणारे जे अपरोक्षज्ञानी आहेत त्यांना वरील तऱ्हेचें उत्क्रमण नाहीं. पण त्यांच्या शरीरालाच श्वेतत्व ( श्वेतभाव ) प्राप्त होतें. नंतर क्रमानें त्यांच्या शरीराचा नाश होतो व ते या पृथ्वी आदि लोकांतच राहातात.

सर्व मुमुक्षुंना उपदेश करणारे ब्रह्मदेव असून अपरोक्षज्ञानी यांस सत्य-लोकांत ब्रह्मज्ञानाचा उपदेश करतात. उपदेशानंतर श्वेतद्वीपास जाऊन वायुदेवाचें दर्शन होतें. ध्रुवलोकांत शिंशुमाराचें दर्शन नियमानें होतें.

स्वर्गास गेलेल्यास पुनः पुनरावृत्ति आहेच. पण महर्लोकांत गेलेल्या कांहींना पुनरावृत्ति आहे व कांहींना नाहीं. पण जनलोक, तपोलोक व सत्यलोक येथें गेलेल्यांना मात्र पुनरावृत्ति नाहीं. देवादिकांना देहोत्क्रमणहि नाहीं व अर्चिरादि लोकप्राप्तीहि नाहीं. या देवादिकांना अपरोक्ष होण्या-बरोबर मुक्ती नाहीं. तर यांना आपल्यापेक्षां उत्तम देहांत लय झाल्यानंतर त्यांना मुक्ती मिळते.

## लयमार्ग

ज्या देवादिकांना उत्क्रमण नाहीं अशा देवादिकांचा स्वोत्तम देहांत लय होतो. पण ज्या देवतांनीं मानुष योनींत अवतार घेतला आहे अशा देवांना उत्क्रमण व आर्चिरादि मार्ग आहे व त्यानंतरच त्यांना मुक्ति आहे. हा लयमार्ग " गरुडमार्ग व शेषमार्ग " असा दोन प्रकारचा आहे.

| १ गरुडमार्ग | २ शेषमार्ग | |
|---|---|---|
| १ अग्नि | १ वरुण | कित्येक देवतांचा गरुड मार्गानें लय आहे तर कित्येकांचा शेषमार्गानें लय आहे. |
| \| | \| | |
| २ सूर्य | २ सोम | |
| \| | \| | |
| ३ गुरु | ३ अनिरुद्ध | |
| \| | \| | |
| ४ इंद्र | ४ काम | |
| \| | \| | |
| ५ सौपर्णी | ५ वारुणी | |
| \| | \| | |
| ६ गरुड | ६ शेष | |

## गरुडमार्गांत लय पावणाऱ्या देवता

१ भृगु आदि मुनींचा लय दक्षांत होतो व दक्षाचा लय इंद्रांत होतो. याप्रमाणें यांचा गरुड मार्गांत लय होतो.

२ आकाशाभिमानी गणेश, पृथ्वीची अभिमानी धरा, यांचा गुरुमध्यें लय होतो. पुढें गरुडमार्गांत लय होतो.

३ कर्मज देव, प्रियव्रत व गय यांचा स्वायंभुव मनुमध्यें लय होतो. स्वायंभुव मनुचा इंद्रांमध्यें लय होतो व पुढें गरुडमार्गांत लय होतो.

४ जयादि मरुद्गणांचा इंद्रामध्यें लय होतो. पुढें ते गरुडमार्गांत लय पावतात.

५ निऋतीचा व पितरांचा यमांत लय व यमाचा मनुमध्यें लय होतो. मनुचा इंद्रामध्यें लय होतो व इंद्राचा गरुडमार्गांत लय होतो.

६ आजानज देव, अग्निपुत्र व बाकीचे देव यांचा अग्नींत लय होतो. शेवटीं गरुडमार्गांत लय होतो.

## शेषमार्ग

१ गंधर्वांचा कुबेरांत लय, कुबेराचा सोमांत लय होऊन ते शेषमार्गांत लय पावतात.

२ सनकादिकांचा कामांत लय होऊन शेषमार्गांत ते लय पावतात.

३ विष्वक्सेनाचा अनिरुद्धांत लय होतो. पुढें शेषमार्गांत लय होतो.

गरुडापर्यंत अवर जीवांचा स्वोत्तमदेहांत लय झाल्यावर गरुड व शेष यांचा लय सरस्वतींमध्यें होतो. सरस्वतीचा लय चतुर्मुख ब्रह्मदेवांत होतो. ब्रह्मदेवाचा लय लक्ष्मीद्वारां परमात्म्यांत होतो.

उमा म्हणजे पार्वती. तिचा लय रुद्रांत होतो. रुद्रदेवांचा भारतीमध्यें लय होतो, भारतीचा वायुदेवामध्यें लय होतो, व वायुदेवांचा लक्ष्मीद्वारा परमात्म्यांत लय होतो.

वायुदेवांना व वायुदेवांत लय पावणाऱ्यांना तात्काल मुक्ति नाहीं. तर वायु हें ब्रह्मपदवीस आल्यानंतर त्यांचेसह सर्वांना मुक्ति आहे.

याप्रमाणें लय झाल्यावर या ब्रह्मकल्पांत लिंगभंग होण्यास योग्य असणाऱ्या जीवांसह (प्रारब्ध कर्माचा क्षय होण्याबरोबर) ब्रह्मदेव सत्यलोकाचे वर असलेल्या विरजा नदींत स्नान करण्याकरितां येतात. विरजा नदीचें दर्शनानें सर्वजण आनंदित होतात. स्वतः ब्रह्मदेव विरजानदींतील जलाचें मार्जन करितात. त्यांना स्नान करावें लागत नसून नुसत्या मार्जनानें त्यांच्या लिंगदेहाचा भंग होतो. स्वतः मार्जन करतांना आपल्याबरोबर असणाऱ्या जीवांना स्नान करण्याची ते अनुज्ञा देतात. त्या अनुज्ञेप्रमाणें भगवन्नामोच्चारण करीत त्या विरजा नदींत सर्वजण स्नान करतात. त्या स्नानामुळें त्यांचा लिंगदेह भंग होतो. जीवांस जीवाच्छादिका प्रकृतिचें अनादि कालापासून जें आवरण असतें तें दूर होतें. त्यानंतर जीवांस स्वरूप देह प्राप्त होतो.

लिंगदेह भंग झाल्यावर प्रलयकालीं ते सर्व मुक्त जीव व ब्रह्मदेव हे भगवंताच्या उदरांत प्रवेश करतात, सृष्टिकाळ येईपर्यंत श्रीहरीच्या उदरांतच राहतात. नंतर सृष्टिकाल येण्याबरोबर भगवंताच्या उदराबाहेर येतात.

लिंगदेह हा सूक्ष्मरूप असलेलीं दहा इंद्रियें, सूक्ष्मरूप पांच प्राण व सूक्ष्मरूप मन अशा सोळा कलांनीं युक्त आहे. लिंगदेहभंग म्हणजे जीवाचा जो देहाशीं संबंध असतो त्याच्या नाश होय.

भगवंताच्या उदरांत प्रलयकालीं प्रवेश केल्यानंतर त्यांना कोणत्याहि प्रकारचा भोग नाहीं. पुनः ज्या वेळीं सृष्टि उत्पन्न होते त्यावेळीं त्यांना भोग आहे.

स्वरूपदेह हा षोडशकलांनीं युक्त आहे. दहा इंद्रियें, पांच प्राण व मन अशा सोळा कलांनीं युक्त आहे.

**स्वरूपं जायते तेषां षोडश्या कलयैव तु-( गीताभाष्य )**

[ त्यांचा स्वरूपदेह सोळा कलांनीं युक्त असतो. ]

स्वर्णकारो यथास्वर्णमलमग्नौ निहत्य च।
शुद्धेन तेन चाभीष्टं कुरुते रूपमंजसा॥
एवं तु भगवान्विष्णुजीवस्वर्णस्य यन्मलं।
अविद्याकामकर्माद्यमात्माग्नौ नाश्य सर्वकृत्॥
स्वेच्छया कुरुते रूपं तद्योग्यं तस्य मुक्तिगम्।
अल्पतेजस्तथा चाल्पं जीवरूपं हि संसृतौ।
तथैव सुमहत्तेजः करोति भगवान्महत् ( बृहद्भाष्य )

[ सोनार जसा सुवर्ण अग्नींत तापवितो व त्यांस शुद्ध करून आपणांस अपेक्षित रूप देतो, तद्वत् अविद्याकामकर्मांना भगवान् आत्माग्नींत टाकून त्यांचा नाश करतो व मुक्तियोग्य असें रूप मुक्तदशेंत करतो. संसारांत जीव ज्यावेळीं असतो तेव्हां त्याची शक्ति व तेज अल्परूप असते. तसेंच त्या जीवाचें तेज, शक्ति मुक्तींत मोठें करतो. ]

याप्रमाणें जीवांच्या स्वरूपदेहाचें वर्णन श्रीमध्वाचार्यांनीं केलें आहे.

## भोग

ज्यावेळीं सृष्टिकाल येतो तेव्हां ते लिंगदेहभंग झालेले जीव पुनः उदराबाहेर येऊन भगवंताच्या आज्ञेनें श्वेतद्वीपांस जातात. व त्याठिकाणीं श्वेतद्वीपाधिपती श्रीविष्णुच्या दर्शनानें आनंदित होऊन पृथिवीपासून

श्वेतद्वीप व वैकुंठ आणि याच्या मधील प्रदेशांत वास्तव्य करतात. या ठिकाणीं त्यांना सालोक्य, सामीप्य, सारुप्य, सायुज्य असे चार प्रकारचे भोग त्यांच्या अधिकारानुसार प्राप्त होतात.

## सालोक्य मुक्ति

केचिदेव वसंत्यत्र ह्यंतरिक्षे च केचन।
केचित्स्वर्गे महर्लोके जने तपसि चापरे॥
केचित्सत्ये महाज्ञाना गच्छंति क्षीरसागरं।

कित्येक जण अंतरिक्षांत, स्वर्गात, महर्लोकांत, जनलोकांत, तपोलोकांत व सत्यलोकांत राहून भगवद्दर्शन घेतात व स्वरूपानंद भोगतात. यालाच सालोक्य मुक्ति म्हणतात.

## सामीप्य मुक्ति

१ श्वेतदीपंच वैकुंठमनंतासनमच्युत।
तत्रापि क्रमयोगेन ज्ञानाधिक्यात्समीपगाः॥ अनुव्या०

२ उपासनाबलान्मुक्तो भोगान कर्मफलान् सदा।
भुंक्ते विष्णोः समीपस्थः सर्वदोषविवार्जितः ॥ (बृहद्भाष्य)

१ श्वेतदीप, क्षीरसागर, वैकुंठ, अनंतासन इत्यादि ठिकाणीं अधिकोत्तर ज्ञानी श्रीहरीच्या समीप राहतात.

२ उपासनासामर्थ्यांनें (अधिक उपासनेनें) जीव आपल्या कर्मफलांचा भोग श्रीहरीच्या समीप राहून सर्वदोषरहित असा भोगतो. यालाच सामीप्य मुक्ति म्हणतात.

## सारुप्य मुक्ति

सारुप्य मुक्ति म्हणजे परमात्म्यासारखें शरीर प्राप्त होणें.

सर्वे चतुर्बाहव उन्मिषन्मणिप्रवेकनिष्काभरणाः सुपेशसः॥
(भागवत २ स्कंध)

## सायुज्य मुक्ति

आदत्ते हरिहस्तेन हरिदृष्ट्यैव पश्यति
गच्छेच्च हरिपादेन मुक्तस्यैषा स्थितिर्भवेत् (ब्रह्मसूत्र भाष्य)

श्रीहरीच्या हातानें ग्रहण करतो. हरिदृष्टीनें पाहतो. हरिच्या पादानें चालतो. अशी सायुज्य मुक्तिला प्राप्त झालेल्यांची स्थिति असते.

यावर अशी शंका येईल कीं, परमात्मशरीरांत प्रविष्ट होऊन जर ते मुक्त आनंदाचा उपभोग घेतात तर या मुक्त जीवांना परमात्म्याचा आनंद मिळतो काय? अशी शंका आल्यास त्याचें उत्तर देतात.

परमात्म्याच्या देहांत प्रविष्ट होऊन जरी त्यानें आनंदाचा अनुभव घेतला तरी परमात्म्याचा आनंद त्यास प्राप्त होत नाहीं. तर स्वयोग्य स्वरूपानंदाचाच तो उपभोग घेतो. आचार्य म्हणतात,

मुक्ताः प्राप्य परं विष्णुं तद्भोगान् लेशतः क्वचित् ।
बहिष्ठान् भुंजते नित्यं नानंदादीन् कथंचन ॥ (ब्रह्मसूत्र भाष्य)

या प्रमाणांवरून सायुज्यमुक्तीस प्राप्त झालेल्यांना कोणत्याहि रीतीनें श्रीहरीचा आनंद प्राप्त होणार नाहीं, हें सिद्ध होतें. याविषयीं समुद्राच्या उदरांतील जलचरांचें उदाहरण आहे. समुद्रांतील जलचर समुद्रांत संचार करीत असतांना आपल्या योग्यतेप्रमाणेंच सर्व भोगतात. त्यांना समुद्राचें विशालत्व प्राप्त होत नाहीं तद्वत् सायुज्य मुक्तीस प्राप्त झालेल्या जीवांचे होय.

## मुक्तांचे क्रीडाप्रकार

कित्येक चतुर्भुज, शंखचक्रादि आयुधें धारण करून आपल्या इच्छे-प्रमाणें नानाप्रकारें सुखोपभोग घेतात. कांहींजण क्षीरसमुद्रांत राहून क्रीडा करतात. कित्येक अश्वत्थवनांत जाऊन आनंदोपभोग घेतात. कित्येक जण वैकुंठांत राहून आनंद उपभोगितात, मोठमोठे स्फटिकेंद्र नीलमणि इत्यादि रत्नखचित् वाड्यांत वास्तव्य करून अप्सरा स्त्रियां-सहवर्तमान क्रीडा करतात. कित्येक परमात्म्याची ध्यानधारणारूपानें

उपासना करतात. कित्येक त्या भगवंताची स्तुति करतात. सारांश, जगांत जितक्या तऱ्हेचे आनंद आहेत त्या सर्व तऱ्हेचे आनंद नित्यतया उपभोगतात. या मुक्तींतहि आपल्या श्रेष्ठकनिष्ठत्वाचा त्याग करीत नाहींत. म्हणजे सर्वजण तारतम्यानें युक्त असतात. एकाला कमी आनंद व एकाला जास्त आनंद म्हणून कोणीहि एकमेकाविषयीं ईर्ष्या, असूया, द्वेष बाळगीत नाहींत. तर प्रत्येकजण आपआपल्या योग्यतेप्रमाणें प्राप्त झालेला आनंद भोगतात. अपरोक्ष ज्ञानानंतर केलें जाणारें सत्कर्म हें आनंदाभिवृद्धीला कारण होतें. अकर्म मुक्तिला प्रतिबंधक नसून मुक्तींत प्राप्त होणाऱ्या आनंदाच्या ऱ्हासाला कारण आहे. अपरोक्षज्ञानानंतर केलेल्या उपासनेनें आनंदाभिवृद्धि होते. तसें नसतें तर अनुष्ठानास वैयर्थ्य आलें असतें. कोणीहि अपरोक्ष ज्ञानानंतर अनुष्ठानच केलें नसतें. लवणसमुद्रांत दहा कल्पापर्यंत रुद्रदेवानें उपासना केली आहे. इंद्रानें एक कोटि वर्षें धूम्रपान करून उपासना केली. सूर्यानें दहा हजार वर्षें खालीं डोकें करून उपासना केली. याप्रमाणें अनेकांनीं अपरोक्षानंतर उपासना केल्यामुळें त्यांना आनंदातिशय आहे.

मुक्त ब्रह्मादिकांना जगत्सृष्ट्यादिव्यापार नाहींत. पण मुक्तांना आपल्यापेक्षां कनिष्ठ असणाऱ्याचें नियामकत्व आहे. पण कोणीहि मुक्त परत या संसारांत प्राप्त होत नाहीं.

येणेंप्रमाणें केलेल्या विवेचनावरून सात्विक जीवांना प्राप्त होणाऱ्या मुक्तिचें स्वरूप वाचकांच्या लक्ष्यांत आलें असेलच.

## नित्यसंसारी

नित्यसंसारी जीवांत स्वर्गप्रचुर, भूप्रचुर, नरकप्रचुर असे तीन भेद आहेत. या नित्यसंसारी जीवांना त्यांच्या मिश्रज्ञानानें त्यांचें साधन पूर्ण होतांच त्यांचा लिंगदेह भंग होतो. लिंगदेहभंगानंतर सुखदुःखाचा अनुभव एककालीं येत असतो.

## तमोयोग्य जीव

तमोयोग्य जीवांत १ अंधतामिस्त्र प्रचुर, २ अंधंतम प्रचुर, ३ रौरव-नरकप्रचुर, ४ नरकप्रचुर असे चार भेद आहेत.

अंधतामिस्त्रांत कलि, विप्रचित्ति, कालनेमि, जरासंध इत्यादिकांचा समावेश होतो.

अंधंततमप्रचुरांत राक्षसांचा समावेश होतो.

रौरवनरकप्रचुरांत पिशाचांचा अंतर्भाव होतो.

नरकप्रचुरांत मनुष्याधमांचा समावेश होतो.

यांचा, श्रीहरी व त्यांचे भक्त यांच्या विषयींचा द्वेष परिपक्व झाला कीं वायुदेवाच्या गदाप्रहारानें यांचा लिंगदेह भंग होऊन यांना नित्यदुःख-स्वरूपी नरकाची प्राप्ति होते. हाच तमोयोग्य जीवांचा मोक्ष होय. यांतून त्यांना पुनरावृत्ति नाहीं.

याप्रमाणें द्वैतसिद्धान्तरीत्या त्रिविध जीवांना प्राप्त होणाऱ्या मोक्षाचें अंशतः निरुपण केलें आहे.



## प्रकरण ८ वें

# निर्मल भक्ति

श्रीहरीचें अनुचर असणाऱ्या प्रत्येक जीवानें स्वत: नित्य सुखाची प्राप्ति करून घेतली पाहिजे. हें नित्य सुख मोक्षांत मिळतें. तेव्हां मोक्ष मिळविण्यास साधन कोणतें? हा प्रश्न उपस्थित झाला असतां त्याचें उत्तर "अमला भक्तिः" या वाक्यानें दिलें आहे. म्हणजे शाश्वतसुखरूप मोक्ष प्राप्त करून घेण्यास परमात्म्याची निर्मल भक्ती ही साधन आहे.

परमात्माच या भवपाशानें जीवांस बांधतो, म्हणून तोच भवपाशांतून सोडविणारा आहे. ज्या राजाच्या अवकृपेनें कारागारांत मनुष्य जाऊन पडतो, त्याच्याच कृपेनें तो मुक्तहि होतो. म्हणूनच शास्त्रकार "बंधको भवपाशेन भवपाशाच्च मोचकः" असें म्हणतात.

लोकांत आपण पाहतो कीं, एखादें अगदीं क्षुल्लक कार्य सिद्ध करणें असल्यास कितीतरी अडचणी येतात. त्यासाठीं श्रम करावे लागून कालावधिहि तसाच लागतो. क्षुल्लक कार्याची ही जर स्थिति आहे, तर मोक्षासारखें महत्वाचें ध्येय सिद्ध करावयाचें असल्यास कितीतरी कालावधि लागेल! "अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम्" असें भगवद्वचन आहे. त्याप्रमाणें हजारो जन्म आपणांस साधन करणें जरूर आहे. हा कालावधि सर्वांना सारखाच लागतो असें नाहीं. प्रत्येकाच्या योग्यतेप्रमाणें प्रत्येकांस कालावधि लागतो. साधनेंहि तशींच लागतील! एकाचें साधन दुसऱ्यांस उपयोगी पडेलच असें नाहीं.

साक्षात् रमादेवी ज्यारीतीनें परमात्म्याची उपासना करते तशी उपासना ब्रह्मादि देवांना करतां येणार नाहीं. ब्रह्मादि देवांना ज्याप्रमाणें श्रीहरीची उपासना करतां येते तशी उपासना मानवांस कशी करतां येईल? म्हणून प्रत्येक जीवानें आपआपल्या योग्यतेप्रमाणें उपासना करावी. जीवांत जसें तारतम्य आहे तसें त्यांच्या उपासनेंतहि तारतम्य आहे.

उपासनातारतम्य जसें आहे तसें उपासकांना मिळणाऱ्या फलांतहिं तारतम्य आहे.

योग्योपासां विना नैव मुक्तिः कस्यापि सेत्स्यति ।
अयोग्योपासनाकर्तुरनर्थश्च भविष्यति ।
तस्मात्तु योग्यतां ज्ञात्वा हरेः कार्यमुपासनं । (अनु०)

तात्पर्यार्थः—आपल्या योग्यतेप्रमाणें उपासना केल्याशिवाय मुक्ति नाहीं. अयोग्य उपासना करणाऱ्यांस अनर्थ प्राप्त होईल. म्हणून आपल्या योग्यतेप्रमाणें उपासना करावी.

परमात्म्यानें निर्माण केलेल्या सात्विक, राजस, तामस या त्रिविध जीवांपैकीं सात्विक जीवांच्या हातून परमात्म्याची उपासना घडते. इतरांच्या हातून उपासना घडत नाही. या त्रिविध जीवांना मोक्षाची प्राप्ति कशी होते हें मोक्ष प्रकरणांत दाखविलें आहे. या प्रकरणांत त्रिविध जीवांचें मोक्षसाधन कोणतें आहे याचें विवेचन करावयाचें आहे.

निरनिराळे दर्शनकार व आचार्य यांनीं मोक्षप्राप्तीसाठीं निरनिराळ्या साधनांचा उल्लेख केला आहे. पण त्या सर्व साधनांत भक्ति हें साधन सर्वांत श्रेष्ठ आहे.

१ यमैवेष वृणुते तेन लभ्यः तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वां ।
२ तमेवं विद्वान् अमृत इह भवति नान्यः पंथा अयनाय विद्यते।

(१) यं—ज्याला एषः विष्णु (माझी उपासना करतो म्हणून तो माझा आहे) वृणुते— अंगीकारतो त्याला तो लभ्य आहे. त्याला आपला अप्राकृत देह दाखवितो. (किंवा—स्वीकृत भक्ताची चिदानंदात्मक तनू—देह हा परमात्मा प्रकटवितो.)

२ तो परमात्मा सर्वगुणपरिपूर्ण आहे असें जो जाणतो तो मुक्त होतो. त्यावांचून मुक्तिसाठीं दुसरा उपाय नाहीं.

भगवद्गीतेंतहि भगवान् श्रीकृष्ण असेंच म्हणतातः—

"सर्वधारकशक्तींचा त्याग करून् तूं मला शरण ये. मी तुला सर्व अनिष्टापासून मुक्त करतों."

"दृश्यते त्वग्र्यया बुद्धया, आत्मा वारे द्रष्टव्यः" इत्यादि श्रुति, स्मृति भक्तीनें परमात्मा दृश्य आहे असें प्रतिपादन करतात. आचार्यांनीं या सर्व प्रमाणांचा विचार करून एक निश्चित साधन कोणतें हें श्लोकरूपानें कथन केलें आहे.

साधनेभ्योऽधिका भक्तिर्नैवान्यत्तादृशं कचित् ।
भक्तिश्चैव हरावेव मुख्यान्यत्र यथाक्रमम् ॥ अनु० ३।३।२८

[सर्वसाधनापेक्षां भक्ति हीच श्रेष्ठ आहे. त्या साधनासमान अन्यसाधन नाहीं. मुख्यतया श्रीहरीच ठिकाणीं भक्ति करून तारतम्यानें इतरत्र करावी.]

याप्रमाणें मोक्षासाटीं भक्ति हें सर्वांत श्रेष्ठ साधन आहे हें प्रतिपादन केल्यावर भक्ति म्हणजे काय ? हा प्रश्न उपस्थित होतो. आचार्यांनीं आपल्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं भक्तीचें लक्षण सांगितलें आहे. तें असें:-

माहात्म्यज्ञानपूर्वस्तु सुदृढस्सर्वतोधिकः ।
स्नेहो भक्तिरिति प्रोक्तः तया मुक्तिर्न चान्यथा [ भारत तात्पर्य

[ माहात्म्यज्ञानपूर्वक सर्वापेक्षां जास्त व उत्कट असा जो स्नेह, त्यांस भक्ति असें म्हणतात. व या भक्तीनेंच मोक्षप्राप्ति होते.]

जयतीर्थ उर्फ टीकाचार्य यांनीं आपल्या 'न्यायसुधा' नामक ग्रंथांत खालीलप्रमाणें भक्तीची व्याख्या केली आहे.

**निरवधिकानंतानवद्य कल्याणगुणत्वज्ञानपूर्वकः स्वात्मात्मीय समस्तवस्तुभ्यः अनेकगुणाधिकः अंतरायसहस्त्रेणापि अप्रतिबद्धः निरंतरप्रेमप्रवाहः।**

[अमर्याद, अनंत, निर्दोष व मंगलमयगुणपरिपूर्ण परमात्मा आहे या ज्ञानानें युक्त, आपणांस अत्यंत आवडणाऱ्या वस्तुपेक्षां अधिक, सर्व वस्तुपेक्षां अनंत गुणांनीं श्रेष्ठ असणारा व श्रीहरीचे ठिकाणीं अखंड वाहणारा असा जो प्रेमप्रवाह यास भक्ति असें म्हणतात. ]

याप्रमाणें भक्तीचें लक्षण आहे. ही भक्ति साधनभक्ति व साध्यभक्ति अशी द्विविध आहे. अनुव्याख्यानांत आचार्य म्हणतातः—

भक्त्या ज्ञानं ततो भक्तिस्ततो दृष्टिस्ततश्च सा ।
ततो मुक्तिस्ततो भक्तिस्सैव स्यात्सुखरूपिणी ॥

तात्पर्यः—भक्तीनें परोक्षज्ञान, त्या परोक्षज्ञानानें निश्चल भक्ति. निश्चल भक्तीनें श्रीहरीचें दर्शन, श्रीहरीच्या दर्शनानें अपरोक्ष व अपरोक्षानें परिपक्क भक्ति व परिपक्क भक्तीच्या योगानें मोक्ष प्राप्त होतो. व मोक्षस्थितींत केली जाणारी भक्ति ही केवल सुखरूप होय.

भक्तीनें ज्ञान याचा अर्थ असा कीं, आपण अध्ययन करतांना आपल्या गुरुचें ठिकाणीं भक्ती केली पाहिजे. व तशी भक्ती नसेल तर गुरु-मुखांतून श्रवण केलेलें वेदादिकांचें ज्ञान निष्फळ होईल. गुरुचें ठिकाणीं भक्ती करावयाची ती तारतम्यानें करावयाची असतें. ही भक्तीरूप उपासना ब्रह्मादि देव आपआपल्या योग्यतेप्रमाणें करतात. लक्ष्मीदेवी नित्यमुक्त असली तरी तीहि अनंत गुणांनीं परमात्म्याची उपासना करते. पण मान-वांना मात्र " सत्, चित्, आनंद, आत्मा " अशा चार गुणांनीं उपासना सांगितली आहे. चतुर्गुणाची उपासना करावी याचा अर्थ चार गुणांनीं युक्त असणाऱ्या परमात्म्याची उपासना असा समजावा. या उपासनेनेंच अपरोक्ष होतें.

सच्चिदानंद आत्मेति मानुषैस्तु सुरेश्वरैः
यथाक्रमं बहुगुणैः ब्रह्मणात्वखिलैर्गुणैः ॥ अणुभाष्य ॥

[ मानवांनीं सत्, चित्, आनंद, आत्मा या चार गुणांनीं, देवांनीं यथाक्रम अधिकाधिक गुणांनीं व ब्रह्मदेवांनीं वेदोक्त सर्व गुणांनीं उपासना करावी. ]

सर्व सात्विक मुक्तियोग्य उपासकांत भक्तियोगी, ज्ञानयोगी, कर्मयोगी असे तीन प्रकार आहेत. यांत तात्विक देवता भक्तियोगी आहेत. सनका-दिक अतात्विक देवता ज्ञानयोगी होत. मानव मात्र कर्मयोगी होत. कर्म-योग्यांतहि एक गुणोपासक व दुसरें चतुर्गुणोपासक असे दोन प्रकार आहेत. स्वरूपतः तृण, कीट, पशु, पक्षि आदि असणारे एक गुणोपासक होत. हे सर्व चित् या गुणाची उपासना करतात. मानव मात्र चार गुणांची उपा-सना करतात. ही उपासना शास्त्राभ्यासरूपी व ध्यानरूपी अशी दोन प्रकारची आहे.

मोक्षप्राप्ती भगवत्प्रसादाशिवाय होत नाहीं. भगवत्प्रसाद होण्यासाठीं विषयवैराग्य, भगवद्भक्ति, त्याची उपासना व त्याचें शब्दज्ञान हे पाहिजेत. प्रथमतः वैराग्य बाणलें पाहिजे. त्याशिवाय दृढतर भक्ति उत्पन्न होणार नाहीं. त्याज्य संसारांत ज्याची आसक्तता आहे त्याची दृढभक्ति श्रीहरीचे ठिकाणीं होणार नाहीं. म्हणून सर्व संसाराविषयीं विरक्तता पाहिजे. त्या वैराग्यानें दृढतर भक्ति निर्माण झाली म्हणजे उपासना घडेल. आणि ही भक्तिविशिष्ट उपासना दृढपणें घडली म्हणजे भगवदपरोक्ष होईल. पण प्रथमतः वैराग्य उत्पन्न होण्यासाठीं शास्त्राभ्यासरूप उपासना पाहिजे. शास्त्राभ्यासरूप उपासना म्हणजे जें कांहीं आपण आपल्या गुरुमुखांतून श्रवण केलें असेल त्याचें मनन व निदिध्यासन होय. गुरुमुखांतून श्रवण केलेल्याचें मनन निदिध्यासन इतक्या रीतिनें झालें पाहिजे कीं, शेकडों शंकाकुशंकारूप अशनिपात झाला तरी आपण निश्चल राहिलें पाहिजे. संशय, अन्यथाज्ञान, आदिविकार, उत्पन्न होतां कामा नयेत. आतां शिष्याची योग्यता ओळखणाऱ्या नियत गुरुकडून प्राप्त झालेल्या सत्शास्त्राचें श्रवणादि झालें पाहिजे. गुरुचें लक्षण पुढीलप्रमाणें केलें आहे.

सर्वलक्षणसंपन्नः सर्वज्ञो विष्णुतत्परः ।

[ विष्णुभक्त श्रीहरीस जाणणारा, सर्व ( अर्थज्ञ, संशयच्छेता, वैराग्यसंपन्न, आचारांनीं युक्त आदि ) लक्षणांनीं संपन्न असणारा गुरु होय. ]

याप्रमाणें गुरुचा लाभ न झाल्यास जिज्ञासूनें काय करावें ? असा प्रश्न येणें साहाजिक आहे. त्यावेळीं शास्त्रकार म्हणतात:—

शास्त्र हे " निर्णीत व निर्णेतव्य " असें दोन प्रकारचें आहे. निर्णीतशास्त्रांत ब्रह्मसूत्रादिकांचा समावेश होतो. निर्णेतव्य शास्त्रांत वेदादिकांचा समावेश होतो. जिज्ञासूनें निर्णीतशास्त्राचें श्रवण करावें. सर्वज्ञप्रणीत द्वैतशास्त्र हेंहि निर्णीतशास्त्रांतच अंतर्भूत होतें. योग्य नियत गुरु आपणांस प्राप्त झाले नाहींत तरी आपण आपलें अमुख्य, अनियत, अशा गुरुमुखांतून निर्णीत शास्त्रांचें श्रवण करावें. मुख्य गुरुचें वेदादिकांचे व्याख्यान करण्याचें स्वतंत्रतया जें सामर्थ्य असतें तसें सामर्थ्य अमुख्य गुरुचे ठिकाणीं नसलें

तरी त्याचें मुखांतून निर्णीत शास्त्राचें श्रवण करण्यास हरकत नाहीं. शब्द-ज्ञानसंपन्न असणाऱ्या अनियत गुरुस सर्वज्ञप्रणीत शास्त्रांचा अभिप्राय समजणें अशक्य नाहीं. म्हणून अमुख्य गुरुपासून निर्णीत शास्त्राचें श्रवण करावें. कालांतरानें आपलें साधन पूर्ण होतांच नियत गुरुचें दर्शन होतें. या दोन्हीं गुरुंचा लाभ न झाल्यास ज्याचें ठिकाणीं आपल्यापेक्षां विष्णु-भक्त्यादि गुण श्रेष्ठ आहेत अशाकडून आपण सच्छास्त्रश्रवण करावें. पण जिज्ञासूनें स्तब्ध बसूं नये. मात्र केव्हांहि श्रवण करावयाचें तें सत्सिद्धान्ताचेंच श्रवण करावें. तारतम्यांत श्रेष्ठ असणारे ते नेहमीं कनिष्ठांचें गुरु होत. व सर्वांचे गुरु ब्रह्मदेव होत.

## सत् सिद्धान्त कोणता ?

विष्णुसर्वोत्तमत्व, जगत्सत्यत्व, जीवेशभेद, सर्व जीवांत, सर्व जडांत, जीवजडांत, जडजडांत, जड ईश यांत भेद व तारतम्य, मुक्तींतहि तारतम्य इत्यादि सिद्धांत ज्यांत प्रथन केलेले आहेत तो सत्‌सिद्धान्त होय. हा सत् सिद्धान्त, अखिल श्रुति, पंचरात्र, ब्रह्मसूत्रें, भारत, मूल रामायण, वैष्णवपुराण, सांख्य, योग, ब्रह्मतर्क, त्रिविध मीमांसा आदि वरील सत्-सिद्धान्ताचें कथन करतात. वैराग्यसंपन्न जिज्ञासूनें यापैकीं कांहीं ग्रंथांचें अगर सर्वांचें, अगर भागशः श्रवण करावें. त्यांचें मनन, निदिध्यासन करावें. याप्रमाणें शास्त्राभ्यासरूपिणी उपासना करावी. या उपासनेच्या योगानें ध्यानरूप उपासना सुलभतया करतां येते. ध्यान म्हणजे "भगवद्विषयक अखंड स्मृति होय. धारणा म्हणजे खंडित असणारी भगद्विषयक स्मृति होय. या ध्यानालाच निदिध्यासनहि म्हणतात. या निदिध्यासनाच्या योगानें अज्ञान, संशय, मिथ्याज्ञान वगैरे सर्व नष्ट होतात. याप्रमाणें वैराग्यसंपन्न होऊन सच्छास्त्राच्या या श्रवणमनननिदिध्यासनानें श्रीहरीचें ठिकाणीं दृढतर भक्ति उत्पन्न होते. ही भक्ती नवविधा आहे.

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं ।**
**अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ (भागवत)**

याप्रमाणें दीर्घकाल नवविधात्मक भक्तीचें अनुष्ठान झाल्यावर भगवान् श्रीहरी आपणांवर प्रसन्न होतात. नंतर अपरोक्षज्ञान होतें व त्यामुळें भगवत्प्रसाद होतो. याप्रमाणें भगवत्प्रसाद झाला कीं मोक्षप्राप्ती होते. मोक्षांतहि सर्व मुक्त जीव श्रीहरीची उपासनारूप भक्ति करतात. ती भक्ति सुखरूप असते. सारांश, साधनरूप भक्तीनेंच परंपरया अपरोक्ष झालें कीं, मोक्ष प्राप्त होतो व तेथें साध्यभक्ती असते.

याप्रमाणें आचार्यांनीं भक्ति मोक्षसाधनांत श्रेष्ठ मानिली आहे.

साधनानि तु सर्वाणि भक्तिज्ञानप्रवृद्धये ।
नैवान्यसाधना भक्तिः फलरूपाहि सा यतः ॥

[सर्व साधनें भक्ति व ज्ञानवृद्धि करितांच आहेत. भक्ति ही दुसऱ्याचें साधन नाहीं. कारण भक्ति हीच फलरूप आहे.]

गीता, श्रुति व सूत्रें हीं भक्तीचेंच श्रेष्ठत्व प्रतिपादन करतात. श्रीमद्भागवताच्या प्रारंभींच व्यासांनीं सांगितलें कीं,

वासुदेवपरा वेदा वासुदेवपरा मखाः ।
वासुदेवपरा योगा वासुदेवपराः क्रियाः ॥
वासुदेवपरं ज्ञानं वासुदेवपरं तपः ।
वासुदेवपरो धर्मो वासुदेवपरा गतिः ॥
भा. १-२-२८।२९

याप्रमाणें सर्वत्र भक्तिच पाहिजे हें निक्षून सांगितलें. इतकेंच नव्हे, तर भक्ति नसेल तर धर्माचरणाचाहि उपयोग नाहीं असें स्पष्टतया वेदव्यासांनीं सांगितलें आहे.

धर्मःस्वनुष्ठितःपुंसां विष्वक्सेनकथासु च ।
नोत्पादयेद्यदि रतिं श्रम एव हि केवलं ॥ भाग० १-२-८

[मानवानें आचारलेला धर्म श्रीहरीचे ठिकाणीं भक्ति उत्पन्न करीत नसेल तर तें धर्माचरण केवल श्रमकारक होय.]

येणंप्रमाणें भगवत्प्रसादानें मोक्षप्राप्ती होते. भगवत्प्रसाद हा तद्विषयक ज्ञानानें, व ते ज्ञान भक्तिनें प्राप्त होतें. मोक्षप्राप्तिनंतर परमश्रेष्ठ सुखरूप भक्ति प्राप्त होते. या सिद्धान्ताला आगम व प्रत्यक्ष मूलक अनुमान प्रमाण-हि दिलें आहे.

**१ संसारबंधहानिः समर्थपुरुषांतरप्रीतिनिबंधना बंधहानि-त्वात् राजप्रसादाधीनभृत्यनिगडबंधहानिवत् यश्चासौ पुरुषः स एव ईश्वरः ।**

**२ ईश्वरविषयं गुणोत्कर्षादिज्ञानं तत्प्रीतिजनकं गुणोत्कर्षादि-ज्ञानत्वात् उभयसंमतवत् ।**

**३ विष्णुभक्त्यभावाद्याः विषयसंसर्गाद्या दोषाः मुमुक्षादिमता त्याज्याः यथा आरोग्यविरोध्यपथ्यं तदर्थिना ।**

या अनुमानाचें तात्पर्य—:१ संसाररूपी बंधनाश, समर्थ पुरुषाच्या स्वाधीन आहे; तो बंधनाश करण्याचें सामर्थ्य समर्थाजवळ असते. राजाची प्रीति झाल्यावर ज्याप्रमाणें त्याच्या नोकराची कारागारांतून मुक्तता होते. तद्वत् जो अशा तऱ्हेचा पुरुष असतो तोच ईश्वर होय.

याला पूरक दुसरें अनुमान आहे.

२ ईश्वरविषयक गुणोत्कर्षादिज्ञान हें ईश्वराची प्रीति उत्पन्न करणारें आहे. गुणोत्कर्षज्ञानत्वामुळे, ज्याचें गुणोत्कर्षादि ज्ञान होतें त्याची प्रीति होते.

३ विष्णुभक्ति उत्पन्न न करणारे विषयसंसर्गादिदोष मोक्षेच्छुंनीं सोडा-वेत. ज्याप्रमाणें आरोग्यविघातक असें कुपथ्य रोगी सोडतो तसें.

याप्रमाणें हीं तीन अनुमानें केलीं आहेत. पहिल्या अनुमानानें ईश्वर-प्रसादच मोक्षाला कारणीभूत आहे हें दर्शविलें.

दुसऱ्या अनुमानानें ईश्वरप्रसाद हा त्याच्या गुणोत्कर्षादि दृढज्ञानानें होतो हें दर्शविलें व तिसऱ्या अनुमानानें ईश्वर प्रसादास प्रतिबंधक गोष्टीचा त्याग करावा हें सांगितलें आहे.

याप्रमाणें शास्त्रांत अनेक प्रकारचीं साधनें कथन केलीं असलीं तरी त्या सर्वसाधनांत भक्ति हीच श्रेष्ठ आहे. ज्ञान व कर्म ही आनुषंगिक साधनें आहेत.

याप्रमाणें मोक्ष प्राप्त होण्यास सात्विक जीवांना परमात्म्यानें कोणतें साधन निर्माण केलें याचें विवेचन आतापर्यंत केलें आहे. नित्यसंसारी जीव हें मिश्रज्ञानानें मुक्तिला प्राप्त होतात व त्यांनाहि लिंगदेहभंग आहे. मिश्रज्ञानाविषयीं उदाहरण देतां येईल.

"आम्हांला काय हो शिव चालतो, विष्णु चालतो, दुर्गा चालते, सूर्य नारायण चालतो." असें म्हणून सर्व तऱ्हेनें सर्वोत्तमत्वानें सर्वांची उपासना करणारे उपासक, अगर

"अहो द्वैत काय, अद्वैत काय, द्वैताद्वैत काय, सगळे सारखेंच" असें म्हणणारे हे मिश्रज्ञानी होत. याचेंविषयीं वाटेल तितका गुरुनें प्रयत्न केला तरी निश्चितपणें सत् ज्ञानाकडे यांची बुद्धि वळणार नाहीं आणि या मिश्रज्ञानानें शेवटीं साधन परिपूर्ण होऊन यांना नित्य संसाररूप मुक्ति प्राप्त होते.

भगवद्भक्तीनें जसा सात्विक जीवांना नित्य आनंदरूप मोक्ष प्राप्त होतो तद्वत् भगवद्वेषानें, त्रिविध गुरूद्वेषानें, अधर्माचरणानें तमोगुणी जीवांना नित्य दुःखरूप मोक्ष प्राप्त होत असतो. भक्ति ही जशी नवविध आहे, तद्वत् भगवद्वेषहि नवविध आहे. तो भगवद्वेष असाः—

जीवाभेदो निर्गुणत्वं अपूर्णगुणता तथा।
साम्याधिक्ये तदन्येषां भेदस्तद्गत एव च॥
प्रादुर्भाव विपर्यासस्तद्भक्तद्वेष एव च।
तत्प्रमाणस्य निंदा च द्वेषा एतेखिला मताः

१ जीवब्रह्मांत अभेद, २ ब्रह्म हें निर्गुण ३ तें गुणपरिपूर्ण नाहीं असें म्हणणें ४ त्याच्या समान अगर त्याच्यापेक्षां अधिक आपण आहोंत असें समजणें ५ परमात्म्याच्या अवतारांत भेद आहे असें समजणें ६ त्याला जन्म, मृत्यु आहे असें समजणें ७ त्याच्या भक्तांचा द्वेष करणें ८ त्यांच्या प्रमाणाची निंदा करणें असें नवविध द्वेष आहेत. त्याच्या नवविध

द्वेषानें त्यांचें साधन पूर्ण होतें. साधन पूर्ण झाल्यावर वायुदेवांच्या गदाप्रहारानें या दैत्यांचा लिंगदेह भंग होऊन त्यांना नित्यदुःखरुप मुक्ति प्राप्त होत असते. त्यांतून पुन्हां प्रत्यावर्तन नाहीं.

भगवद्द्वेषानें सुखरूप मुक्ति नाहीं. याविषयीं श्रुतीचीं, गीतेचीं पुष्कळ प्रमाणें आहेत. पण तीं सर्वच न देतां नमुन्यासाठीं एक दोनच प्रमाणें देणार आहे. श्रुति म्हणतेः—

**मानस्तेनेभ्यो ये अभिद्रुहस्पदे निरामिणो रिपवोन्नेषु जागृधुः ।**

**निरामिणः** रामपराङ्मुख **अत एव तस्य रिपवः** त्याचें द्वेष्टे. **अभिद्रुहस्पदे** अंधतम नरकांत **अन्नेषु** भोगाविषयीं **जागृधुः** आकांक्षा करणारे **अतः** म्हणून **तेनेभ्यः मा बोचः**

या वाक्यानें द्वेष करणाऱ्यास नित्यदुःख मुक्ति रूप प्राप्त होते हेंच सिद्ध होते. गीतावाक्यहि असेंच म्हणतेः—

१ तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान् ।
क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥

पुराणांतरीं म्हटलें आहे.

२ यो द्विष्यात् विबुधश्रेष्ठं देवं नारायणं प्रभुं ।
कथं स न भवेद्द्वेष्यः आलोकान्तस्य कस्यचित् ।
मज्जंति पितरस्तस्य नरके शाश्वतीः समाः ॥

१ माझा द्वेष करणाऱ्या नराधमांना निरंतर आसुर योनींत टाकतो.

२ देवांत श्रेष्ठ, सर्वसमर्थ अशा नारायणाचा जे द्वेष करतात त्यांचा तिरस्कार कोण करणार नाहीं ? त्यांचे पितृगण नरकांत शाश्वत पडतात. परमात्म्याचे द्वेष्टे असणाऱ्या दैत्यांचें, द्वेषानें अंधतमसाधन पूर्ण होतांच संचित पुण्याचा व अनिष्ट पुण्याचा नाश होतो. अनिष्ट पाप मात्र अंधतमांत दुःख भोगण्याकरितां शिल्लक राहते. अंधतमाचें साधन पूर्ण झाल्यावर जो नवविध द्वेष त्या जीवाकडून घडतो तो अंधतमांत दुःख वाढविण्यास कारण होतो.

याप्रमाणें त्रिविध जीवांचीं साधनें कोणतीं याचा विचार श्रुति, स्मृति यांच्या आधारें केला आहे.

श्रीमध्वाचार्यांच्या सिद्धान्ताप्रमाणेंच रामानुजाचार्य, निंबार्क, वल्लभ, चैतन्य यांचेंहि मत आहे. हे सर्व भक्तिलाच प्राधान्य देणारे आहेत. शंकराचार्य हे व्यावहारिकत्वानें ज्ञान-कर्म-भक्ति यांच्या समुच्चयांस प्राधान्य देतात. रामानुज, निंबार्क, मध्व, वल्लभ, चैतन्य हे आचार्य भक्तिमार्गीय म्हणून प्रसिद्ध आहेत. इतकेंच नव्हे तर "भगवद्द्वेष्ट्याला मुक्तींतील आनंद प्राप्त होत नसून ते अंधतमाधिकारी आहेत" असेंच यापैकीं कांहीं जणाचें मत आहे. केवल निष्काम कर्माचरणानें मोक्ष मिळतो हें श्रीमध्वाचार्यांना मान्य नाहीं. आचार्य म्हणतातः—

**विष्ण्वर्पितत्वादियोगरूपत्वं विना केवलकर्मत्यागः नरकफल एव–** ( गीतातात्पर्य )

[ श्रीहरीला सर्व कर्म समर्पणरूप योगाशिवाय केवल कर्मत्याग हा नरकालाच कारण आहे. ]

येणेंप्रमाणें आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत आले असेलच कीं, मोक्षसाधनांत भक्ति हेंच साधन सर्वश्रेष्ठ आहे. म्हणून आचार्य कृष्णामृतमहार्णव नामक ग्रंथांत म्हणतात.

**ये मानवा विगतरागपरावरज्ञा नारायणं सुरगुरुं सततं स्मरंति**
**ध्यानेन तेन हतकिल्बिषचेतनास्ते मातुः पयोधररसं न पुनः पिबंति ॥**

## प्रकरण ९ वें

# प्रमाण–त्रय

कोणत्याहि तत्त्वाच्या सिद्धिकरितां प्रमाणांची जरूरी असते. प्रमाणें म्हणून कोणतीं स्वीकार्य व कोणतीं अस्वीकार्य हें निश्चितपणें ठरलें पाहिजे. प्रत्येक तत्त्ववेत्त्यानें आपण मांडलेल्या प्रमेयाच्या सिद्धिसाठीं कोणतीं प्रमाणें स्वीकारलीं आहेत हें स्पष्टतया सांगितलें आहे. त्याप्रमाणें "विष्णुसर्वोत्तमत्वादि सिद्धान्त आतापर्यंत प्रतिपादन केले आहेत त्यांस प्रमाण काय ?" असा प्रश्न उपस्थित झाल्यास त्याचें उत्तर "**अक्षादित्रितयं प्रमाणं**" या वाक्यानें दिलें आहे. म्हणजे आतांपर्यंत कथन केलेल्या तत्त्वाच्या सिद्धिकरितां प्रत्यक्ष, अनुमान, आगम ही तीन प्रमाणें आम्ही स्वीकारलीं, असा अर्थ आहे. म्हणून प्रमाण या शब्दाची व्याख्या काय आहे, त्यांत भेद किती आहेत, हें कळणें जरुर आहे. शास्त्रकारांनीं 'प्रमाण' शब्दाची व्याख्या खालीलप्रमाणें केली आहे.

पदार्थांचें वास्तवीक स्वरूप ज्याच्या योगानें कळतें तें प्रमाण होय.

हीं पदार्थांचें वास्तविक स्वरूप कळवून देणारीं प्रमाणें प्रत्यक्ष, अनुमान, आगम अशीं त्रिविध आहेत. (पदार्थांचें स्वरुप जसें असतें तसें कळवून न देतां विपरीत स्वरुपाचें ज्ञान ज्याच्या योगानें होतें त्या साधनांस प्रमाण म्हणून मानतां येत नाहीं.) मनु म्हणतोः—

**प्रत्यक्षं चानुमानं च शास्त्रं च विविधागमम् ।**
**त्रयं सुविदितं कार्यं धर्मसिद्धिमभीप्सता ॥**

(श्रीहरीचें ज्ञान व्हावें अशी इच्छा करणाऱ्यांनीं प्रत्यक्ष, अनुमान, आगम यांचें उत्तम रीतीनें ज्ञान करुन घ्यावें.) आतां त्रिविध प्रमाणांत अनुमानाला स्वतंत्र प्रमाण म्हणून मानलें नाहीं. आचार्य म्हणतातः—

**१ आगमानुग्रहाभावे न तर्कः स्यात्प्रतिष्ठितः ।**
**अक्षजागममूलस्य स्यादेवास्य प्रतिष्ठितिः ॥ अनु० २-१**

२ प्रत्यक्षागममूला तु युक्तिस्तत्र बलीयसी ॥ अनु०

३ प्रत्यक्षमागमो वापि भवेद्यत्र नियामकः ।

सैव व्याप्तिर्भवेन्मानं नान्या संदिग्धमूलतः ॥ अनु० २–२

[ १ आगमाचें जर अनुमानांस साहाय्य नसेल तर तो तर्क प्रमाण नव्हे. प्रत्यक्ष अगर आगम हे जर साहाय्यक असतील जर अनुमानांस प्रामाण्य आहे.

२ प्रत्यक्ष व आगममूलक युक्ति ही बलवान् होय.

३ प्रत्यक्ष अगर आगम ज्या अनुमानांस नियामक असेल तेंच अनुमान प्रमाण होय. अन्य अनुमान प्रमाण नाहीं. ]

या त्रिविध प्रमाणांचीं लक्षणें शास्त्रकारांनीं कोणतीं केलीं आहेत तें पाहूं. म्हणून प्रमाणांच्या मालिकेंत प्रथमानुक्रमानें असलेल्या ‘प्रत्यक्षांचे’ लक्षण काय आहे याचा विचार करुं.

**निर्दोषार्थेन्द्रियसंनिकर्षः प्रत्यक्षं** (प्रमाणलक्षण)–दोषरहित इंद्रियांचे विषय व दोषरहित इंद्रियें या उभयतांचा जो संबंध त्यांस प्रत्यक्ष असें म्हणतात.

[ “ निर्दोषे च ते अर्थेन्द्रिये च तयोः संनिकर्षः ’ असा यांत समास आहे. ]

**निर्दोषाक्षोद्भवं ह्यत्र प्रत्यक्षमिति गीयते** ( अनु० )

निर्दोष अशा इंद्रियद्वारा झालेलें ज्ञान त्यांस प्रत्यक्ष म्हणतात.

या ठिकाणीं इंद्रिय शब्दानें ज्ञानेन्द्रियें समजावींत. पांच ज्ञानेन्द्रियें व मन अशीं सहा हीं यथार्थ ज्ञानाला कारण समजावींत.

१ घ्राणेन्द्रियाच्या योगानें गंध व गंधविशेषाचें ज्ञान होतें.

२ रसनेंद्रियानें रस व रसविशेषाचें ज्ञान होतें.

३ चक्षुरिन्द्रियद्वारा रूप व रूपविशेषाचें ज्ञान होतें.

४ त्वगिन्द्रियानें स्पर्श व स्पर्शविशेषाचें ज्ञान होते.

५ श्रोत्रेंद्रियानें शब्द व शब्दविशेषाचें ज्ञान होतें.

६ बाह्येन्द्रियांच्या साहाय्याशिवाय स्वतंत्रतया शास्त्रकारांनीं संसारद्वारा मनहि स्मरण-साधन असल्यामुळें तेंहि प्रमाण मानलें आहे.

या तऱ्हेचे प्रत्यक्ष हे सहा प्रकारांनीं ज्ञानसाधन आहे. दोषांचे साहचर्य असल्यास हीं इंद्रियें यथार्थ ज्ञानाला साधन होऊं शकत नाहींत. हे दोष खालीलप्रमाणें आहेत. १ अतिदूरत्व २ अतिसामीप्य ३ सूक्ष्मपणा ४ इंद्रियें व त्यांचे विषय यांचेमध्यें असणारा पडदा अगर आडकाठी ५ इंद्रियविषयाचें त्याच्यापेक्षां बलवान् पदार्थाशीं मेलन ६ अप्राकट्य ७ दोन पदार्थांतील सादृश्य

हे दोष विषयांचे सहकारी असतील तर यथार्थज्ञान प्राप्त होणार नाहीं.

मनाचे सहकारी दोष कामक्रोधादिक व इंद्रियांचे काचकामलादि होत.

याप्रमाणें निर्दोष अशा इंद्रियांचा व विषयांचा संनिकर्ष झाला असतां यथार्थ ज्ञान प्राप्त होतें. म्हणून प्रत्यक्ष हें प्रमाण मानलें आहे.

यानंतर अनुमान प्रमाणांचा विचार करूं.

**'निर्दोषोपपत्तिः अनुमानं'** निर्दोष असणाऱ्या युक्तीस अनुमान असें म्हणतात.

अनुमानाच्या लक्षणांत उपपत्ति या शब्दांस 'निर्दोष' असें विशेषण दिलें आहे. तर उपपत्तीस कोणते दोष येतात हें समजलें पाहिजे. कांहीं जणांनीं "बाधादि दोषरहित अशा उपपत्ति" असें सांगितलें. कांहीं टीकाकारांनीं म्हटलें:—

**के ते उपपत्तिदोषाः । यत्सद्भावे लिंगाभिमतं ज्ञानमेव न जनयति संशयविपर्ययौ वा ते दोषाः**

[ ते उपपत्ति दोष कोणते? जे असतां लिंगाभिमत ज्ञान उत्पन्न होत नाहीं. संशय, अन्यथाज्ञान उत्पन्न होतात ते दोष होत. ]

या निर्दोष असणाऱ्या उपपत्ति यथार्थज्ञानास कारणीभूत असतात म्हणून त्यांस प्रामाण्य आहे.

श्रीमध्वाचार्य अनुमानांस फक्त व्याप्तीची जरूरी आहे असें म्हणतात. निर्दोष अशा युक्तीस अनुमान म्हणतात. आचार्य म्हणतातः—

**प्रतिज्ञातार्थसिद्ध्यर्थं व्याप्तिरेव यदोदिता**
**अवशिष्टं किमत्रास्ति लिंगं तत्र विजानतः**

[ अन्वयः—प्रतिज्ञार्थ सिद्ध्यर्थं यदा व्याप्तिः उदिता तदा तत्र लिंगं विजानतः किं अवशिष्टं अस्ति. अर्थः—प्रतिज्ञेनें कथन केलेल्या या अर्थाच्या सिद्धिसाठीं ज्यावेळीं व्याप्ति सांगितली जाते त्यावेळीं व्याप्तिप्रमाणें लिंगज्ञान झाल्यावर त्या ठिकाणीं कोणता आक्षेप शिल्लक राहातो ? ]

## याचें स्पष्टीकरण

" हा पर्वत अग्निमान् आहे " असें म्हटल्यावर दुसरा विचारतो कीं, अरे, हा पर्वत अग्निमान् आहे हें कशावरून ? त्याच्या प्रश्नास उत्तर देतो कीं, बाबारे, जो धूमवान् आहे तो अग्निमान् आहे ( जें स्थळ धुरानें व्यापलेलें असतें तें स्थळ अग्नीनें युक्त असते. ) अशी व्याप्ति सांगितल्यावर ऐकणाऱ्यास तें पटते. मग त्या ठिकाणीं कोणती असंगति येते. एवं नुसत्या व्याप्ति ज्ञानानें कार्य होत असतां अनुमानास पांच अगर तीन अवयवांची जरूरी काय आहे ? म्हणूनच आचार्यांनीं वरील प्रमाणें अनुमानाचें लक्षण केलें आहे. साध्य ज्ञानास व्याप्ति हीच प्रयोजक असल्यामुळें इतर अवयव पांच, तीन, दोन असावेत या नियमाची जरूरी नाहीं.

अनुमानांत " स्वार्थानुमान व परार्थानुमान " असे भेद आहेत.

एके ठिकाणीं एक प्रकारची स्थिति पाहिली असतां त्यावरून दुसरीकडे तशाच प्रकारची स्थिति आढळल्यास आपणांस जें ज्ञान होतें त्यांस स्वार्थानुमान म्हणतात. आपण आपल्या घरीं स्वयंपाकघरांत धूर निघत असलेला पाहतों त्यावरून आपली पक्की समजूत झालेली असते कीं, जेथें धूर आहे तेथें अग्नि आहे. यालाच व्याप्तिज्ञान म्हणतात. आणि या व्याप्तिज्ञानावरून इतरत्र कोठेंहि धूर निघत असला तर त्या ठिकाणीं अग्नि आहे असें जें ज्ञान आपणांस होतें आणि मग आपण स्वतःशीं म्हणतो कीं, " हें स्थळ अग्नीनें युक्त आहे " यालाच स्वार्थानुमान म्हणतात.

आणि हें ज्ञांन ज्यावेळीं दुसऱ्यांस सांगतों त्यावेळीं जें अनुमान केलें जातें त्यांस परार्थानुमान असें म्हणतात.

**[ यत्परापदेशानपेक्ष्यं व्याप्तिस्मृतिमद् व्याप्यदर्शनं तत्स्वार्थम् । परोपदेशापेक्षं तु परार्थं ]** एवंच ": निर्दोषोपपत्तिरनुमानम् " अशी जी व्याख्या केली आहे तीच योग्य आहे. उपपत्तीला खालीलप्रमाणें दोष

येतात. विरोध असंगति, न्यून, आधिक्य, संवाद व अनुक्ति हे मुख्य सहा दोष आहेत. बाकीच्या सर्व दोषांचा (नैय्यायिकांनीं व इतरांनीं मानलेल्या सर्व दोषांचा) या सहांतच अंतर्भाव होतो.

## आगम

सर्व प्रमाणांत आगम प्रमाण हें श्रेष्ठ आहे. अतीन्द्रिय वस्तुच्या ज्ञानाला आगमच पाहिजे. श्रीमदाचार्यांनीं आगम शब्दाची व्युत्पत्ति खालीलप्रमाणें केली आहे.

**आगमः–आ–सम्यक्, गम्यंते ज्ञायंते ते आगमाः** (ज्याच्या योगानें उत्तमरीत्या (परमात्मा) जाणला जातो तो आगम होय. " **निर्दोषशब्द आगमः** " अशी आगमाची व्याख्या आहे.

[धर्म, अधर्म, मोक्ष आणि अतीन्द्रिय वस्तु ज्यायोगें उत्तम तऱ्हेनें जाणलें जातात तो आगम होय.]

हे आगम पौरुषेय व अपौरुषेय असें द्विविध आहेत. पौरुषेय आगम म्हणजे आप्तवाक्यें होत. आप्त शब्दाची व्याख्या " आप्तस्तु यथार्थवक्ता " अशी केली आहे भ्रम, प्रमाद, विप्रलिप्सा, कापट्य, रचनेचा विस्कळित-पणा इत्यादि दोषरहित ज्ञान प्रतिपादन करणारे त्यांस यथार्थ वक्ता म्हणतात. उदाहरण वेदव्यास, श्रीमदानंदतीर्थभगवत्पादाचार्य इत्यादिक होत. वेदानुसारी तत्व प्रतिपादन करणाराहि यथार्थवक्ता होय. सत् सिद्धांताचे प्रतिपादक ते सदागम होत. या सदागमानें परमात्म्याचें ज्ञान होतें. पौरुषेय आगमास त्याच्या वेदानुसारित्वामुळें व त्यांच्या आप्तत्वामुळें प्रामाण्य आहे. व वेद हे अपौरुषेय असल्यामुळें ते स्वतःच प्रमाण आहेत. या सर्वांचा विचार करून पौरुषेय व अपौरुषेय आगम कोणती प्रमाण आहेत हें स्पष्टतया सांगितलें आहे.

**ऋगाद्या भारतं चैव पंचरात्रमथाखिलम्।**
**मूलरामायणं चैव पुराणं चैतदात्मकम् ॥**
**ये चानयायिनस्तेषां सर्वे तेच सदागमाः ॥**

[ ऋग्वेदादि वेद, भारत, पंचरात्र, मूलरामायण व ह्यांना अनु-
सरणारे पुराण हे सर्व सदागम होत. ]

भारताविषयीं आचार्यांनीं गीतातात्पर्य ग्रंथांत म्हटलें आहे.

" स्वयं नारायणो देवो ब्रह्मरुद्रेपूर्वकैः ।
अर्थितो व्यासतां प्राप्य केवलं तत्वनिर्णयम् ॥
चकार पंचमं वेदं महाभारतसंज्ञितं ॥

[ ब्रह्मरुद्रादि देवांनीं प्रार्थना केल्यावरून वेदव्यास नामक अवतार साक्षात् श्रीहरीनें घेतला व केवल तत्वनिर्णयात्मक महाभारत या नांवाचा पांचवा वेद रचला. ]

"पंचरात्रस्य कृत्स्नस्य वक्ता नारायणः स्वयम्" असें पुराणांतरीं कथन केलें असल्यामुळें पंचरात्रागमांस प्रामाण्य आहे. तसेंच मूलरामायणहि होय. वेदव्यासांनींच ब्रह्मसूत्रें रचलीं असल्यामुळें तींहि प्रमाण होत.

वेद हे अपौरुषेय असल्यामुळें ते स्वतःच प्रमाण आहेत. त्यांचें अपौरुषेयत्व वेदांनींच सिद्ध केलें आहे. कित्येक प्राचीनांना व अर्वाचीनांस वेद हें अपौरुषेय आहेत हें म्हणणें पटत नाहीं. सामान्यतः विचार कर ण्यासाठीं गोष्ट आहे कीं वेदामध्यें कोठेंतरी लेखकाचें नांव आहे काय ? वेदासारख्या प्रचंड ग्रंथाचें कर्तृत्व ज्याचेकडे आहे त्यानें आपलें नांव चोरून ठेवण्याचें कारण काय ? वेदाचें छंद, ऋषि इत्यादि दिसतात याचा अर्थ एवढाच कीं, त्या ऋषींनीं समाधि मार्गानें श्रीहरीचे ध्यानांत मग्न असतां, श्रीहरीच्या कृपेनेंच तें परमात्मविषयक ज्ञान प्रथम स्फुरण पावलें, म्हणून त्यांचें नांव त्या ऋचांचे ऋषि म्हणून पडलें. तें नांव त्यांच्या कर्तृत्वाचें द्योतक नव्हे.

आगमांत एखादे वेळेस आपाततः परस्पर विरोधि अशीं वाक्यें आढळलीं तरी उपक्रम, उपसंहार, अभ्यास, अपूर्वत्व, अर्थवाद, उपपत्ति अशा सहा तऱ्हेनें अर्थनिर्णय करावा. तरच त्यापासून यथार्थज्ञान प्राप्त होईल. नाहींतर अन्यथाज्ञान मिळेल. कारण वेदाचे अर्थ तीन प्रकारांनीं होतात.

त्रयोर्थाः सर्ववेदेषु दशार्थाः सर्व भारते ।
विष्णोः सहस्रनामापि निरंतरशतार्थकम् ॥

वेदांचे ३ ,भारताचे १० व विष्णुसहस्रनामाचे शंभर अर्थ आहेत.

याप्रमाणें वेदांचे अर्थ तीन असल्यामुळें सामान्य लोकांस त्याचें अर्थ-ज्ञान होत नाहीं. आपल्या पांडित्यानें कोणी अर्थ करूं लागल्यास त्याचा अनर्थ होईल. सर्व वेद परममुख्य वृत्तीनें श्रीहरीचेच वाचक आहेत.

आगमाच्या 'निर्दोषशब्द आगमः' या आचार्यांनीं केलेल्या लक्षणांत 'निर्दोष' असा शब्द आहे. निर्दोषशब्दांना आगम म्हणतात तर कोणत्या दोषांनीं आगम दुष्ट होऊं शकतात, ते दोष कोणते हे शास्त्रकार सांगतात. आगमास सामान्यः खालीलप्रमाणें दोष येतात.

अन्वयाभावामुळें, अवबोधकत्व, विपरीतबोधकत्व, ज्ञातज्ञापकत्व, अप्रयोजनत्व, अनभिमतप्रयोजनत्व, अशक्यसाधनप्रतिपादन, लहान उपाय असतांहि मोठा उपाय सांगणें या दोषांनीं रहित असें शब्द-समूहात्मक वाक्य हें प्रमाण म्हणून गणलें जातें.

सर्व पुराणांचे त्रिविध अर्थ असल्यामुळें त्या त्या प्रमाणें अर्थ करावा. म्हणजे आपततः विरोधी भासणाऱ्या वाक्यांचा विरोधपरिहार होईल.

याप्रमाणें त्रिविध प्रमाणांचा अगदीं स्थूलतया विचार केला आहे.

श्रीमध्वाचार्यांप्रमाणें रामानुजाचार्य, निंबार्क व वल्लभाचार्य हेंहि मुख्यतः प्रत्यक्ष, अनुमान, आगम अशीं तीन प्रमाणें मानतात.

"प्रत्यक्षमनुमानं च शाब्दं च विविधागमम् ।
त्रयं सुविदितं कार्यं धर्मसिद्धिमभीप्सता ॥"

हा मनुस्मृतींतील श्लोक उद्धृत करून प्रत्यक्ष, अनुमान आगम अशीं त्रिविध प्रमाणें आहेत असें रामानुजाचार्यांनीं प्रतिपादन केलें आहे.

वल्लभाचार्य आगमाच्या विरुद्ध नसणारे सर्व प्रमाण होत असें सामान्यतः म्हणतात. आगमहि कोणते याचा स्पष्ट निर्देश केला आहे.

**वेदाः श्रीकृष्णवाक्यानि व्याससूत्राणि चैवहि ।**
**समाधिभाषा व्यासस्य प्रमाणं तच्चतुष्टयम् ॥** (शुद्धाद्वैत मार्तण्ड)

वेद, गीता, ब्रह्मसूत्र, भागवत अशीं चार मुख्य प्रमाणें आहेत. यांच्या विरुद्ध असणाऱ्या कोणासहि प्रमाण नाहीं. निंबार्कहि वरीलप्रमाणेंच प्रमाणत्रय मानतात.

" तत्रिविधं–प्रत्यक्षानुमानशब्दभेदात " (वेदांतरत्नजूमंषा)

शंकराचार्य मात्र तीन प्रमाणाऐवजीं सहा प्रमाणें मानतात.

तानि प्रमाणानि षट् । प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, आगम, अर्थापत्ति, अनुपलब्धिभेदात् ।।

[ तीं प्रमाणें प्रत्यक्ष, अनुमान उपमान, आगम, अर्थापत्ति, अनुपलब्धि अशीं सहा आहेत. ]

ह्या सहा प्रमाणांत अर्थापत्ति, उपमान, अनुपलब्धि हीं तीन प्रमाणें स्वतंत्रया मानण्याची जरूरी नाहीं असें रामानुजाचार्य, निंबार्क, मध्वाचार्य म्हणतात. अनुव्याख्यानांतील भक्तिपादांत आचार्य म्हणतात :—

" अर्थापत्त्युपमाभावा अनुमान्तर्गता क्वचित् ।।

अर्थापत्ति, उपमान, अनुपलब्धि यांचा अनुमानांत अंतर्भाव होत असल्यामुळें त्यांना स्वतंत्रतया प्रमाण म्हणून मानूं नये.

उपमादीनां चात्रैवान्तर्भावान्नपार्थक्यम् ( वेदांतरत्न मंजूषा )

उपमानादिकांचा वरील प्रमाणत्रयांतच समावेश होत असल्यामुळें त्या उपमादिकांना पृथक् प्रमाणत्व नाहीं असें निंबार्कानुयायी म्हणतात.

रामानुजाचार्यहि वरील प्रमाणेंच म्हणतात.

हे सिद्ध करण्याकरितां या आचार्यत्रयांचा युक्तिवाद स्वतंत्र आहे.

हा विषय शास्त्रीय परिभाषेचा असल्यामुळें तो सर्वेच्या सर्व अगर अंशतः द्यावा असें म्हटलें तरी ग्रंथविस्तार फार होईल म्हणून संक्षेपानें नुसतें विषायांचें दिग्दर्शन केलें आहे .

येणेंप्रमाणें या प्रमाणांचा विचार केला आहे.

या प्रमाणांचा निश्चय झाल्यावर तद्वारा नित्य कोण व अनित्य कोण याचें यथार्थ ज्ञान होतें व याप्रमाणें ज्ञान झाल्यावर अनित्य विषयाचें ठिकाणीं वैराग्य उत्पन्न होतें. शमदमादिकांनीं संपन्न असणारा वैराग्यशील, श्रीहरीचा एकनिष्ठ भक्त असणारा मुमुक्षु दीर्घकाल श्रवणमननादिरूप भक्ति करतो. त्या अखंड भक्तीनें भगवत्प्रसाद होऊन सर्व अनिष्टांची निवृत्ति होते व स्वस्वरूपादिर्भावरूप मुक्ति त्यांस प्राप्त होते. म्हणून परंपरया प्रमाण प्रमेयांचे ज्ञान अवश्य पाहिजे.

---

## प्रकरण १० वें

# वेदैकवेद्य परमात्मा

गेल्या प्रकरणांत द्वैतसिद्धान्तांतील मुख्य तत्व सिद्ध करण्यासाठीं प्रत्यक्ष, अनुमान, आगम अशी तीन प्रमाणें मानलीं आहेत हें दाखविलें आहे. यावर अशी शंका येईल कीं, अखिल वेदांमध्यें श्रीविष्णुचेंच महात्म्यवर्णन कोठें आहे ? अग्नि, इंद्र, वरुण, सोम इत्यादि अनेक देवतांच्या स्तुतिपर वेदांत वाक्यें आहेत. मग नुसतें विष्णुसर्वोत्तमत्व प्रतिपादन केलें आहे असें कसें म्हणतां ?

या प्रश्नाचें उत्तर स्पष्टपणें " अखिलाम्नायैकवेद्यो हरिः " या वाक्यानें दिलें आहे. सर्व वेदांमध्यें इंद्र, चंद्र, रुद्र इत्यादि अनेक देवतांचें वर्णन केलें असलें तरी परममुख्यवृत्त्या तें वर्णन श्रीहरीचेंच आहे. म्हणून अखिल वेदानें वाच्य परमात्माच आहे. तर अखिल वेदैकवेद्यत्व श्रीहरीचें ठिकाणीं कसें आहे हें या प्रकरणांत दाखवावयाचें आहे.

शब्दाचें अर्थज्ञान करून देणाऱ्या योग, रुढि, योगरुढी अशा त्रिविध शक्ति आहेत. ज्या शब्दाचा धात्वर्थ न घेतां एकदम अर्थाची प्रतीति होते त्यांस रुढार्थ म्हणतात. उदाहरण " कुशल " हा शब्द घ्यावा. याचा धात्वर्थ न घेतां एकदम " दक्ष " असा अर्थ प्रतीत होतो. यास रुढार्थ म्हणतात.

जो शब्द उच्चारल्याबरोबर धात्वर्थ व प्रत्ययार्थ प्रकट होतो त्यांस यौगिक अर्थ म्हणावा.उदाहरण पाचक शब्द घ्यावा. " पचतीति पाचकः " या व्युत्पत्तीनें त्याचा अर्थ प्रतीत होतो म्हणून त्यास योगिक अर्थ म्हणतात.

ज्या ठिकाणीं धात्वर्थ रूढार्थ, हे दोन्ही प्रतीत होतात त्यांस ' योगरुढी ' असें म्हणतात.

उदाहरण ' पंकज ' शब्द घ्यावा. या ठिकाणीं " **पंकात् जातं पंकजं** " अशा व्युत्पत्तीनें रुढीनें कमळ असा अर्थ प्रतीत होतो. नाहींतर नुसता धात्वर्थ घेतल्यास पंकज शब्दाचे अर्थ अनेक होतील पण धात्वर्थाबरोबर

रुढार्थहि घेतल्यामुळें तो शब्द कमलवाचक झाला. यास योगरुढी असें नांव आहे.

याप्रमाणें वेदांतील कांहीं शब्द धात्वर्थानें श्रीहरीचे वाचक आहेत तर कांहीं शब्द श्रीहरीचे ठिकाणीं योगिक बलानें प्रवृत्त आहेत. तर कांहीं शब्द योगरुढीनें श्रीहरीचे वाचक आहेत. एवंच वेदांतील सर्व शब्द श्रीहरीचेच वाचक आहेत यांत शंका नाहीं.

याविषयीं श्रुति, स्मृति, पुराणें हीं प्रमाण आहेत.

१ यो देवानां नामधा एक एव।
२ नामानि सर्वाणि यमाविशंति तं वै विष्णुं परममुदाहरंति।
३ सर्वे वेदा यत्पदमानमंति।
४ सर्वे वेदा युक्तयः सुप्रमाणा ब्राह्म ज्ञानं त्वेकमेव प्रकाशयंति।
५ एकं सत् विप्रा बहुधा वदंति।
६ वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यः।
७ वेदे रामायणे चैव पुराणे भारते तथा।
आदावंते च मध्येच विष्णुस्सर्वत्र गीयते॥
८ वासुदेवपरा वेदाः।
९ ततो वेदास्तत्पराः सर्व एव।

इत्यादि श्रुति, स्मृति, पुराणवचनांचा विचार करून श्रीमध्वाचार्यांनीं भाष्यांत खालीलप्रमाणें सिद्धांत सांगितला आहे.

परम मुख्यवृत्तीनें यच्चावत् शब्द श्रीहरीचेच वाचक असून अमुख्यवृत्तीनें, लौकिकरुढीनें इतर देवतांचे वाचक आहेत.

नाग्न्यादयः शब्दाः अग्न्यादिवाचकास्तथापि साक्षादेवानन्ययोगेन ब्रह्मवाचकैः शब्दैः व्यवहारार्थमनभिज्ञानाच्च अन्यत्र व्यवहरंतीत्यभ्युपगमेऽविरोधं जैमिनिर्वक्ति॥

[ अग्नी आदि शब्द जरीं अग्नी आदिचे वाचक आहेत तथापि साक्षात् अनन्यरुढीनें (परममुख्यवृत्त्या) श्रीहरीचे वाचक आहेत. तरीहि व्यवहारासाठीं त्यांचा अन्यत्र उपयोग केला जातो म्हणून विरोध नाहीं. ]

याप्रमाणें वेदांतील यच्चावत् शब्द श्रीहरीचेच वाचक आहेत. या शिवाय कांहीं स्पष्ट वचनें पुराणांतरीं आहेत.

> चतुर्मुखः शतानंदो ब्रह्मणः पद्मभूरिति ।
> उग्रो भस्मधरो नग्नः कपालीति शिवस्य च ॥
> विशेषनामानि ददौ स्वकीयान्यापि केशवः (ब्रह्मपु०)

विष्णुसहस्रनामांत सर्व, शर्व, इंद्र, चंद्र वगैरे अनेक नांवें श्रीहरीची वाचक आहेत हें दाखविलें आहेच.

एवंच सर्व वेदांत, पुराणांत, श्रीहरीचेंच गुणवर्णन केलें आहे. तोच सर्वोत्तम आहे. तोच जगच्चालक, सर्वान्तर्यामि, आनंदपरिपूर्ण आहे. तोच सर्वतंत्रस्वतंत्र आहे म्हणून त्यालाच शरण जाणें, त्याची उपासना करणें हें श्रेयस्कर होय.



# प्रकरण ११ वें

# उपसंहार

तत्वज्ञानविभागांतील दहा प्रकरणांत श्रीमन्मध्वाचार्यांच्या सिद्धान्ताचें अंशतः दिग्दर्शन केलें आहे. सामान्यतः विष्णुभक्तीला प्राधान्य देऊन तत्वज्ञानाची मांडणी करणारे चार आचार्य होत असें पद्मपुराण, भविष्य-पुराण यांत प्रतिपादन केलें आहे.

अतः कलौ भविष्यंति चत्वारः संप्रदायिनः।
श्रीब्रह्मरुद्रसनका वैष्णवाः क्षितिपावनाः ॥
उच्यते क्रमतः सिद्धिस्तत्राचार्यचतुष्टयम् ।
संप्रदाये तु सनके त्वाचार्योहि निमानुजः॥
तत्र श्रीसांप्रदाये तु नाम्ना रामानुजो मतः।
सांप्रदाये ब्रह्मनाम्नि मध्वाचार्यः प्रतिष्ठितः॥

(पद्मपुराण)

विष्णुस्वामी प्रथमतो निंबादित्यो द्वितीयकः।
मध्वाचार्यस्तृतीयस्तु तुर्यो रामानुजस्तथा॥

(भविष्यपुराण—परिशिष्ट)

वल्लभाचार्य यांचा सांप्रदाय विष्णुस्वामी सांप्रदायांतच अंतर्भूत होतो असें आर्यविद्यासुधाकरांत म्हटलें आहे. चैतन्य सांप्रदाय हा माध्व सांप्रदायांत अंतर्भूत होतो.

## रामानुज दर्शन

रामानुजाचार्यांचा जन्म शके १०४९ प्लवंग संवत्सरीं भूतपुरी नामक गांवांत झाला. त्यांच्या वडिलांचें नांव केशव भट्ट व मातेचें नांव मति असें होते. यानीं संन्यास ग्रहण करून आपल्या विशिष्टाद्वैतवादाची स्थापना

केली. हे भूतलावर १२० वर्षे होते. यांनीं वेदांतसार, वेदांतदीप, वेदार्थ संग्रह, श्रीभाष्य, श्रीरंगगद्य, वैकुंठगद्य, श्रीशरणागतिगद्य, गीताभाष्य आदि ग्रंथ रचले आहेत. यानां श्रीवैष्णव म्हणतात. कारण हा सांप्रदाय श्रीलक्ष्मीपासून निघाला म्हणून यांना श्रीवैष्णव म्हणतात.

## यांचे मताचा सारांश

ब्रह्म हें अनंतानंतगुणपरिपूर्ण, निर्दोष, जगदुत्पत्यादिकर्ता असून विष्णु, हरी, वासुदेव आदि अनंत शब्दांनीं वाच्य आहे. ब्रह्म हेंच ब्रह्माण्डाला उपादान कारण व निमित्त कारण असल्यामुळें जगत् सत्य आहे. ब्रह्मच जगद्रूपानें परिणाम पावते. जीव हा अणु असून ते त्रिविध आहेत. जीवानें परमात्म्याची भक्ती करूनच मोक्षपद प्राप्त करून घेतलें पाहिजे. जीव हा परतंत्र असला तरी त्यालाहि किंचित् स्वातंत्र्य आहेच. मोक्ष म्हणजे "सकलकर्मनिवृत्तिपूर्वक जगत्सृष्टिसामर्थ्य, लक्ष्मीप्राप्ति याशिवाय परमात्म्याच्या आनंदाचा अनुभव घेणें हीच मुक्ति होय. त्रिविध जीवात ब्रह्मोपासननिष्ठ हें अर्चिरादिमार्गानें विष्णुलोकांस जाऊन तेथें परमात्मानंदाचा अनुभव घेतात. बद्धजीव हें धूमादि मार्गानें चंद्रलोकांस जाऊन निरनिराळ्या लोकांत जातात व कर्मफलाचा उपभोग घेऊन पुन्हां या मृत्युलोकावर प्राप्त होतात. पापकर्मी जीव हे नानाविध नरकांत जाऊन दुःख भोगतात. मोक्ष स्थितींत तारतम्य नाहीं. व मुक्तानांहि आनंद एका योग्यतेचा प्राप्त होतो. विशिष्टाद्वैताच्या सिद्धिसाटीं प्रत्यक्ष, अनुमान, आगम, हीं तीन प्रमाणं मानतात. जीवांस परमात्म्याची शक्ति प्रकृति हिचे आवरण असल्यामुळें अज्ञानादि दुःखें त्यांस प्राप्त होतात. व हें आवरण परमात्मकृपेनें दूर होतें.

याप्रमाणें रामानुजाचार्यांचें मत जीव, परमात्मा, जगत् व मोक्ष यासंबंधीं आहे.

## माध्वसिद्धान्ताशीं वैलक्षण्य

श्रीमध्वाचार्य हें श्रीहरी जगाला निमित्तकारण आहे व प्रकृति ही साक्षात् वा परंपरेनें उपादान कारण आहे असें मानतात तर रामानुजाचार्य ब्रह्मच जगाला निमित्त व उपादान कारण आहे असें

मानतात. त्यामुळें ब्रह्मच जगद्रूपानें परिणाम पावतें असें त्यांना म्हणावें लागतें.

मुक्त जीवांना मुक्तींत आनंदतारतम्य आहे, मुक्त जीवांतहि तारतम्य आहे, असें मध्वाचार्य म्हणतात. तर रामानुजाचार्य मुक्तजीवांना आनंद एकच प्रमाणांत सारखा मिळतो असें मानतात. व त्यांत तारतम्य नाहीं.

एवढाच मुख्यतः रामानुजाचार्य व मध्वाचार्य यांच्या सिद्धान्तांत फरक आहे.

रामानुजाचार्यांनीं, निंबार्काचार्यांनीं, वल्लभाचार्यांनीं मानलेल्या विकृत व अविकृत परिणामवादाचें खंडन जगत्सत्यत्व या प्रकरणांत केलेलें आहे.

## निंबार्क

यांचा जन्म शक १०४१ मध्यें झाला असावा असें कित्येकांचें मत आहे. दक्षिण भारतांत गोदावरी नदीच्या तीरीं वैदूर्यपट्टण नामक गांवीं यांचा जन्म झाला. यांच्या वडिलांचें नांव अरुणमुनि असें असून मातेचें नांव जयंती असें आहे. यांना विष्णुचें आयुध सुदर्शन यांचा अवतार मानतात. यांना यांच्या उपनयनाचे वेळीं साक्षात् देवर्षि नारद यांनीं गोपालमंत्राचा उपदेश केला असें म्हणतात. ह्या सांप्रदायाचे प्रवर्तक सनकादिक ऋषि आहेत म्हणून यांना सनकसांप्रदाय म्हणतात.

यांचें संन्यासोत्तर ग्रहण केलेलें नांव नियमानंद असें होतें. देवाचार्य नामक यांच्या शिष्यानें आपल्या ग्रंथाच्या प्रारंभीं याच नांवानें उल्लेख करून त्यांस नमस्कार केला आहे. यांचा कांहीं ठिकाणीं निमानुज असाहि उल्लेख आहे. एकदां एक संन्यासी यांच्या आश्रमांत सिद्धान्तचर्चा करण्या-साठीं आले असतां सिद्धान्तचर्चेंत कसा वेळ गेला हें कांहीं त्यांना कळ-लेंच नाहीं. संध्याकाळ झाली तरी त्यांचें भोजन झालें नव्हतें. आलेल्या संन्याश्यास रात्र झाल्यामुळें भोजन करतां येणें शक्य नव्हतें. त्यामुळें नियमानंदास अतिशय वाईट वाटलें. तेव्हां त्यांनीं गोपालकृष्णाचें चिंतन केलें. त्यावेळीं श्रीकृष्णांनीं आपलें सुदर्शन चक्र सूर्यनारायणाच्या रूपानें प्रकट केलें. व तें सुदर्शन चक्र सूर्यरुपांत नियमानंदांनीं आपल्या

आश्रमांतील निंबाच्या झाडावर चढून त्या संन्याशांस दाखविलें. सूर्यदर्शनानंतर त्यासंन्याशानें भोजन केलें. नंतर तो संन्यासी म्हणाला:—

" महाराज, रात्र झाली तरी सूर्यनारायणाचें दर्शन निंबवृक्षावरून आपण घडविलें. म्हणून आपण निंबार्क या नांवानें प्रसिद्ध व्हाल " असें सांगितलें. तेव्हांपासून हे नियमानंद निंबार्क या नांवानें प्रसिद्ध झाले. यांनीं प्रसृत केलेल्या सिद्धान्तास भेदाभेदवाद असें म्हणतात. यांच्या मताचें तात्पर्य पुढीलप्रमाणें आहे.

ब्रह्म हेंच जगाचें निमित्त व उपादान कारण आहे. त्यामुळें जग सत्य आहे. जीव अस्वतंत्र आहे. परमात्मा स्वतंत्र आहे. व परब्रह्म म्हणजे श्रीपुरुषोत्तम गोपालकृष्ण होय. त्या परब्रह्माचे गुणावतार, पुरुषावतार, व लीलावतार, असे त्रिविध अवतार आहेत. ब्रह्मादिदेव हे सर्व त्याचें आज्ञाधारक आहेत. प्रत्यक्ष, अनुमान आगम हेच तत्वसिद्धिकरिता प्रमाण होत. जगत् हें ब्रह्माचा परिणाम आहे असें हेहि मानतात. पण रामानुज, वल्लभ, सांख्य याप्रमाणें यांनीं परिणाम मानला नाहीं. तर परिणाम म्हणजे 'वस्तुतस्तु आत्मकृतेः परिणामादित्यादौ परिणामशब्दः शक्तिविक्षेपवाचकः' [ वेदांत–तत्व–बोध ] असा त्यांनीं परिणाम शब्दाचा अर्थ केला आहे. मोक्षप्राप्तीसाठीं प्रत्येकानें श्रीकृष्णाची उपासना केली पाहिजे. निंबार्काचार्यांचा भेदाभेद्वाद म्हणजे काय याची कल्पना येण्याकरितां त्यांच्या अनुयायांनीं मांडलेली कल्पना त्यांच्यांच शब्दांत देत आहे.

'तथाच विश्वात्मा पुरुषोत्तमः स्वाश्रितात्मसत्तया विश्वस्माद् भिन्नः । तथैव आत्मीयचेतनाचेतननियम्यवर्गवृत्तिपरतंत्रसत्वाभावरूपेण विश्वविलक्षणत्वापरपर्यायेण सार्वज्ञादिवद्भावरूपेणात्मासाधारणेन धर्मेण अस्थूलादि वाक्यप्रतिपाद्येन विश्वस्माद्भिन्न इति विश्वभिन्नाभिन्न श्रीपुरुषोत्तम परब्रह्मभूतो भगवान् रमाकान्त सर्ववेदांतार्थ इति सिद्धान्तः । [ वेदांतरत्न–मंजूषा ]

तो परमात्मा विश्वांत त्यांचीच सत्ता व्यापून असल्यामुळें विश्वाभिन्न आहे. व हे जीव नियम्य असल्यामुळें त्यांचे ठिकाणीं असलेले पारतंत्र्यादि हे परब्रह्माचें ठिकाणीं नाहींत व विलक्षण शक्तित्मवामुळें तो परमात्मा

या विश्वाहून भिन्न आहे. अशारीतिनें तो परमात्मा जगताहून अभिन्न आहे व भिन्नहि आहे. म्हणून भेदाभेदवादी असें यांना म्हणतात.

या भेदाभेदवादाच्या सिद्धिकरितां प्रत्यक्ष, अनुमान आगम हीं तीन प्रमाणें आहेत.

याप्रमाणें निंबार्काचार्यांचा सिद्धान्त आहे त्याचें श्रीमध्वाचार्यांच्या सिद्धान्ताशीं बहुतांशीं साम्य आहे. पण भेदाभेद म्हणून दोन्हीं मानतात, हें श्रीमध्वाचार्यांना मान्य नाहीं.

## वल्लभाचार्य

तेलंगण प्रांतांत कांकरवाड नामक गांवीं लक्ष्मणभट्ट नामक सोमयाजी ब्राह्मण रहात असे. हेच वल्लभाचार्यांचें वडील होत. यांच्या मातुःश्रीचें नांव एल्लाम्मा असें होतें. यांचा जन्म वैशाख वद्य ११ संवत् १५३५ मध्यें चंपारण्य येथें झाला. यांना त्यांचे अनुयायी श्रीकृष्णरूप समजतात. यांनी शुद्धाद्वैतमताचा प्रसार केला आहे. अवतारकार्य पूर्ण झाल्यावर काशी येथें हनुमान् घाटावर स्नानासाठीं गेले. पाण्यांत शिरल्याबरोबर तेथून एक अग्निशिखा निघाली व सर्वलोक पाहात असतां सदेह आकाशांत लीन झाले. हनुमान् घाटावरच एक आचार्यांचें मंदिर आहे.

वल्लभाचार्यांनीं एकुण अठ्ठावीस ग्रंथ रचले आहेत. त्यांत प्रामुख्यानें अणुभाष्य, तत्वदीपनिबंध, निबंध सप्रकाश, भागवतसुबोधिनी, भागवतसूक्ष्म टीका, पूर्व–मीमांसा–भाष्य हे ग्रंथ होत. भगद्गीतेवरहि यांचे भाष्य असावें असें म्हणतात. तें उपलब्ध नाहीं. यांच्या सिद्धान्तास शुद्धाद्वैत म्हणतात. यांचें तत्वज्ञान एका तत्सांप्रदायिकानें एका श्लोकांत ग्रथित केलें आहे. तो श्लोक असाः—

> सद्रूपं कृष्णरूपं जगदिदमखिलं व्रीहिसूच्यग्रकल्पो
> जीवोऽणुः सच्चिदात्मा व्रजपतिचरणे सर्वसारैव भक्तिः।
> साकारं ब्रह्म तद्वद् व्रजभुवि रमते सच्चिदानंदरूप
> मित्याकारप्रकारो विलसतु सततं वल्लभाचार्यमार्गः ॥

अखिल विश्व हें सत् आहे. कृष्णरुप आहे. जीव सत् व चित् असून व्रीहि व सुई याच्या अग्रभागाइतका अणु आहे. व्रजभूमींत विहार करणारे

साकार सच्चिदानंदरूप श्रीकृष्ण भगवान् परब्रह्म आहेत. व श्रीकृष्णभक्ति सर्व साधनांचें सार आहे.

या सर्व गोष्टींच्या सिद्धीकरितां वेद, ब्रह्मसूत्रें गीता व भागवत ही सर्व प्रमाण आहेत. मायासंबंधरहित अशा दोन तत्वांचें अद्वैत होय.

-शुद्धाद्वैत या शब्दाची व्युतत्ति उपोद्घातांत दिलेली आहे.

## माध्वमताशीं वैलक्षण्य

वल्लभाचार्य शुद्धाद्वैतवादी आहेत; तर मध्वाचार्य द्वैतवादी होत. हे मध्वाचार्य तीन प्रमाणें मानतात तर यांनीं प्रमाणांची संख्या निश्चितपणें न सांगतां नुसतें मोघमपणें प्रमाणें कोणतीं मानावीत हें सांगितलें आहे. मध्वाचार्यांच्या मतानें ब्रह्म हें नेहमीं प्राकृतधर्मरहित अप्राकृत सधर्मक आहे. तर वल्लभाचार्य हें ब्रह्म नेहमीं सधर्मक व निधर्मक आहे असें मानतात. मध्वाचार्य ब्रह्म विरूद्धधर्मास (दोषांस) कदापि आश्रय नाहीं असें म्हणतात, तर वल्लभाचार्य ब्रह्माचें ठिकाणीं गुणविरुद्ध धर्म आहेत असें मानतात. हे वल्लभाचार्य परिणामवाद मानतात. तर मध्वाचार्यांना तें मान्य नाहीं. वल्लभाचार्य अंशांशी भावानें जीवब्रह्माचा अभेद आहे असें मानतात.

येणेंप्रमाणें या उभय आचार्यांचें मतांत स्थूलतया भेद आहे. सूक्ष्म मतभेद पुष्कळच आहेत.

## श्रीचैतन्य

यांना गौरांग असें दुसरें नांव आहे. यांनीं मध्वाचार्यांच्या पीठस्थ यतीकडून संन्यास घेतला. यांचा जन्म बंगालमध्यें नडिया—नवद्वीप येथें झाला. यांचा जन्म शक १४२० फाल्गुन शु० पौर्णिमेच्या दिवशीं झाला. यांच्या वडिलांचें नांव जगन्नाथ व मातेचें नांव शचीदेवी असें होतें. यांचें नांव विश्वंभर असें मातापित्यांनीं ठेवलें. वयाच्या चोविसाव्या वर्षीं यांनीं संन्यास घेतला. हे शक १४६८ सालीं मनुजदृष्टीला अगोचर झाले. यांच्या मतावर निंबार्काचार्यांच्या मताची छाप पडलेली आढळून येते. चैतन्य सांप्रदायांस गौडीय वैष्णव सांप्रदाय म्हणतात. या मताचें सार एका पंडितानें एका श्लोकांत ग्रथित केलें आहे. तो श्लोक असाः—

**आराध्यो भगवान् व्रजेशतनयस्तद्धाम वृंदावनं रम्या काचिदुपासना व्रजवधूवर्गेण या कल्पिता। शास्त्रं भागवतं प्रमाणममलं प्रेमा पुमर्थो महान् श्रीचैतन्यमहाप्रभोर्मतमिदं तत्राग्रहो नःपरः ॥**

भगवान् श्रीकृष्ण आराध्य होत. त्यांचें विशेष सांनिध्य वृंदावनांत आहे. निर्दोष उपासना (गोपिकांकडून केली गेलेली उपासना) श्रेष्ठ होय. श्रीमद्भागवत हें सर्वश्रेष्ठ प्रमाण होय. श्रीकृष्णावर प्रेम हेंच सार होय.

याप्रमाणें श्रीकृष्णचैतन्यांचें मत होय. प्रस्थानत्रयीवर या मताचें भाष्य बलदेव विद्याभूषणानें रचलेलें आहे. सामान्यतः माध्वतत्वज्ञानाशीं यांचें तत्वज्ञान बरेंचसें जुळतें. फरक फारच सूक्ष्म आहे.

## या उभयमतांतील सूक्ष्म भेद

भेद असेल तर तो एवढाच आहे कीं, माध्व हें मोक्षप्राप्ती ही ब्राह्मणवर्णातच होते म्हणतात व चैतन्य मात्र साधन पूर्ण झालें कीं, कोणत्याहि जातींत मोक्ष प्राप्त होतो असें म्हणतात एवढाच काय तो फरक आहे. बाकी कांहीं आचार विचारांत फरक असेल तो निराळा आहे.

याप्रमाणें वैष्णवभक्तीप्रधान असणाऱ्या या पांच आचार्यांचें मत आहे. मध्वाचार्यांशिवाय रामानुज, निंबार्क वल्लभ यांनीं मानलेला परिणामवाद हाच त्यांच्या तत्वज्ञानाचा मूल पाया आहे. शंकराचार्यांच्या तत्वज्ञानाचा मूल पाया अध्यासमूलक विवर्तवाद होय. व अध्यासास कारण माया होय.

जगामध्यें कोणत्याहि कार्याकडे दृष्टि फेकली तर निमित्त व उपादान कारण एक असलेलें कोठेंहि आढळणार नाहीं. निमित्तकारण निराळें, उपादान कारण निराळें, असाच नेहमींचा प्रत्यय आहे. परिणामवादामुळें परब्रह्म हें अपूर्ण आहे असेंच म्हटल्यासारखें होतें. तीच गोष्ट विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत वगैरे संबंधानें म्हणतां येईल. कारण विशिष्टाद्वैतवादी रामानुजाचार्य हें मुक्तींत देखील लक्ष्मी, सृष्ट्यादिकर्तृत्वाचा अधिकार यांचेवांचून परमात्मानंद प्राप्त होतो असें म्हणतात. तर प्रश्न हा येतो. कीं कार्य हें कारणांत परिणत झाल्यावर त्यांचें अस्तित्व उरलें कोठें ? माती घटाला कारण आहे. त्याप्रमाणें घट हा परत मृत्तिकेंत आल्यावर घटाची अवस्था

उरली कोठून? जगत् हें ब्रह्माचा परिणाम असें रामानुजाचार्य म्हणतात. मग तेंच परिणामरूप जग उलट कारण ब्रह्म झाल्यावर ब्रह्माला जो आनंद प्राप्त होतो तोच आनंद सर्वांना कां प्राप्त होऊं नये? जर कार्यरूप जगत् व कारण रूप ब्रह्म यांच्यातील द्वैत नष्ट झाल्यावर परब्रह्माचें सर्वगुण, आनंद मुक्त जीवांनां प्राप्त होत नसेल तर द्वैत नष्ट झालें असें कसें म्हणतां येईल? तीच गोष्ट वल्लभाचार्य यांची होय. तात्पर्य कोणत्याहि रीतीनें परिणामवाद उपयुक्त ठरत नाहीं.

शंकराचार्यांचें तत्वज्ञान व बौद्धतत्वज्ञान यांत शब्दाशिवाय कोणताहि फरक नाहीं, हें उभयतांच्या तत्वज्ञानाच्या तुलनेवरून कळून येईल.

शंकराचार्य व्यावहारीक सत्य व पारमार्थिक सत्य असें द्विविध सत्य मानतात. तर बौद्धहि सत्य मिविध मानतात.

द्वे सत्ये समुपाश्रित्य बुद्धानां धर्मदेशना।
लोके सांवृतसत्यं च सत्यं च परमार्थतः॥

दोन सत्यांचा अवलंब करून बुद्धाची धर्मतत्वांची मांडणी आहे. त्यापैकीं व्यवहारांत सांवृत सत्य, व परमार्थांत परमार्थतः सत्य असें आहे.

शंकराचार्यांचें व्यावहारिक सत्य व बुद्धाचे सांवृत सत्य यांत कांहीहि फरक नाहीं.

शंकराचार्य हें सर्व जगत् ब्रह्मावर आरोपित आहे असें समजतात, तर बौद्धहि तसेंच समजतात.

अनक्षरस्य धर्मस्य श्रुतिः का देशना च का।
श्रूयते दृश्यते चापि समारोपादनक्षरः॥ (बोधिचर्यावतार)

[अनक्षर असणाऱ्या धर्माची श्रुति–श्रवण–देशना (पहाणें–उपदेश) ही कशी होईल? जें श्रवण केलें जातें अगर पाहिलें जातें तें अनक्षरावरीलआरोपामुळें होय.]

म्हणजे हें जग जें दिसतें तें केवळ आरोपामुळें होय, असें बौद्धाचें मत आहे.

शिवाय ब्रह्म हें अनिर्वचनीय आहे असें शंकराचार्य म्हणतात, तर बौद्धहि तसेंच म्हणतात.

माध्यमकारिकांचा कर्ता नागार्जुन हा महायानविंशक नामक ग्रंथांत परमतत्व हें "वाचाऽवाच्यं" वाणीनें अवाच्य आहे असेंच म्हणतो.

बौद्ध वेदालां अप्रमाण मानतात तर शंकराचार्य वेदांस द्राविडी प्राणायामानें अप्रमाण मानतात. कारण, ब्रह्मातिरिक्त सर्व वस्तुच जर मिथ्या आहेत जर वेदहि ब्रह्मातिरिक्तच आहेत कीं नाहींत ? म्हणून वेद हे व्यावहारिक सत्यांस कथन करणारे व्यावहारिकतया प्रमाण होत. वेदांस पारमार्थिक सत्यत्व नसल्यामुळें इतर सर्व दृश्यवस्तुप्रमाणें तेहि मिथ्याच होत. असेंच म्हटल्यासारखें होतें.

याप्रमाणें बौद्ध व शांकर तत्वज्ञानांत पुष्कळांशीं साम्य असल्यामुळें अलीकडील पुष्कळ निःपक्षपाती विद्वानांनीं बौद्धवाद व शंकराचार्यांचें तत्वज्ञान यांत फरक नाहीं असेंच म्हटलें आहे.

भरतखंडातून बौद्धांचें खंडन शंकराचार्य यांनीं केलें आहे असा जो प्रवाद आहे तोहि भ्रममूलक आहे. त्यांस इतिहासाचा दाखला नाहीं. या विषयीं विशेष माहिती वै. श्री. १००८ सत्यध्यानतीर्थ श्रीपाद यांनीं रचलेला 'सिव्हिलसूट' भाग ४ था हा ग्रंथ पहावा अशी, वाचकांस आग्रहाची विनंति आहे.

येणें प्रमाणें 'मध्वाचार्य व त्यांचें तत्वज्ञान' हा ग्रंथ ईशप्रेरणेनेंच तयार झाला आहे. तर त्याच परमात्म्याचे चरणीं समर्पण करून विराम घेतों.

वाग्यज्ञेनार्चितो देवः प्रीयतां कमलापतिः ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

# परिशिष्ट



नरहरितीर्थांचे एकुण सहा शिलालेख आहेत. त्यांपैकीं एक शक ११८६ या सालचा आहे. त्यानंतर पंधरा वर्षांत एकहि शिलालेख उपलब्ध झालेला नाहीं. त्यानंतर पुन्हां शक १२०३ या सालचा उपलब्ध झालेला आहे. यानंतरचे शिलालेख शक १२१५ सालापर्यंतचे उपलब्ध आहेत. यांत सर्वांत मोठा शिलालेख शक १२०३ या सालचा आहे. सदर शिलालेख गंजम जिल्ह्यांत चिकाकोल तालुक्यामध्यें श्रीकूर्म क्षेत्रांत योगानंदनरसिंहाच्या देवालयांत आहे.

सदर शिलालेख एपिग्राफिका इंडिका, भाग ६ वा, पृष्ठ २६६ ते २७० वर छापलेले आहेत.

देवः श्रीकमलाविलासलहरीपात्रं कलिप्रोन्मिलत्<br>
क्लेशक्लिष्टजनेऽखिलक्षितितले संलीनबोधोदये ॥<br>
स्वीयश्रीपदपंकजैकशरणान्संरक्षितुं सन्मुनि-<br>
र्जातः श्रीपुरुषोत्तमाभिधमहातीर्थस्सुमत्यग्रणीः ॥ १ ॥

यन्मुनिभाषितभाष्यं भूष्यं किल तीर्थिकप्रवरसंघैः<br>
उन्मादवादिद्विरदप्रतिकुंभमंकुशं भवति ॥ २ ॥

तस्य ज्ञानकलाकलोदयकलो वैयासिकं गोगणं<br>
मंदैर्भिन्नपथप्रतारितमलं सुव्यक्तभेदे पथि॥<br>
नेतुं संधृतदंडमंडितकरो यः प्रादुरासीन्मुनि<br>
व्रातैरसेव्यपदारविंदयुगलश्चानंदतीर्थो मुनिः ॥ ३ ॥

यन्मुखनिस्सृतभाषालळितप्रकारपदविन्यासा ।<br>
कमलापति कमलं भजते भजमानभवभयारातिम् ॥ ४ ॥

आनंदतीर्थभगवत्पादाचार्यसरस्वती ।
लोकेऽत्र हरिपादाब्जयुगलप्राप्तये नु ( अ ) सा ॥ ५ ॥
तस्माल्लोकसुरक्षणातिनिपुणात्संप्राप्तकर्तव्यधी-
र्द्वेधामुत्र तथात्र योऽवति जनान् कालिंगभूसंभवान् ॥
पित्र्याचारमुपैति सूनुरिति सन्नीतिस्थितौ धर्मत-
श्शत्रुक्ष्मापतिवर्गदुर्गनिवहा भीतानभीतः स्वयम् ॥ ६ ॥
यश्च श्रीकमठादिनायकमहाकार्यैकनद्धव्रत-
स्तस्य प्रच्युतिवारणाय शबरानीकक्षितीध्राशनिम् ॥
धत्ते सत्करवालमस्य तटिता ( ? ) संत्यक्तजीवे रिपौ ।
हन्तव्या नवशेषणान्निजविधिर्नो यस्य बोध्यस्तराम् ॥ ७ ॥
तेनानेन श्रीमन्नरहरितीर्थाख्यमुनिवरेण्येन ।
कलिसमयप्रल्हादप्रभाव परितोष्य नृहरिरूपेण ॥ ८ ॥
स्वस्तिश्री शकवत्सरे हुतवहव्योमद्वयक्ष्मायुते
मेषे शुक्लशशांकशेखरदिने वारे च सौम्ये वरे ।
प्रासादं कमठाधिपस्य पुरतो निर्माय शर्मप्रदो
योगानंदनृसिंह एव भगवान् प्रीत्या प्रतिष्ठापितः ॥९॥

हा शिलालेख शक १२०३ मेषमहिना शुद्ध अष्टमीचा आहे. याची इंग्रजी तारीख २९ मार्च १२८१ शनिवार आहे. हा शिलालेख एच्. कृष्णशास्त्री यांनीं संपादन केला आहे.

यानंतरचे शिलालेख डॉ. किलहार्न यांनीं संपादन केले आहेत. एपिग्राफिका इंडिका भाग ६ वा पृष्ठ २६६ ते २७० पर्यंत या चार शिलालेखांविषयीं नुसती माहिती-शक, तिथी, सन, तारीख व शिलालेख कशाविषयीं आहे वगैरे बद्दल माहिती दिली आहे.

[ खालील शिलालेख गंजम जिल्ह्यांतील चिकाकोल तालुक्यांत श्रीकूर्मक्षेत्रांत योगानंद नृसिंहाच्या देवालयांत आहे. ]

१ शक ११८६ अद्य त्रयोदशी कन्याराशिचा महिना याची इंग्रजी तारीख १९ सप्टेंबर १२६४ ही आहे. या शिलालेखांत नरहरितीर्थांनीं सुवर्णदान दिल्याचा उल्लेख आहे.

२ हा शिलालेख विझगापट्टण जिल्ह्यांत सिंहाचलम् येथील लक्ष्मीनृसिंह देवालयावर कोरलेला आहे. हा शक १२१३ पौष महिन्यांतील असून याची इंग्रजी तारीख २१ जानेवारी इ. स. १२९२ ही आहे.

३ हा शिलालेखहि सिंहाचलम् येथील लक्ष्मीनृसिंह देवालयावर असून शक १२१४ शु. एकादशीचा आहे. याची इंग्रजी तारीख २६ जुलै इ. स. १२९२ आहे.

४ हा शिलालेख शक १२१५ मंगळवार पौर्णिमेचा असून वृषभ राशीचा महिना आहे. इंग्रजी तारीख २१ मे १२९३ आहे.

[सदर शिलालेखांत वीर नरसिंह दुसरा यांस अठरावे वर्ष लागल्याबद्दल नरहरितीर्थांनीं सुवर्णदान दिल्याचा उल्लेख आहे. हा शिलालेख तेलगू लिपींत असून श्रीकूर्म येथील देवालयांत कोरलेला आहे.]

५ हा शिलालेख शक १२१५ माघशुक्लपंचमी रविवारचा आहे. याची इंग्रजी तारीख ३ जानेवारी १२९४ ही आहे.

[हा शिलालेखहि चिकाकोल तालुक्यांत योगानंद नृसिंहदेवालयांत कोरलेला असून हा संस्कृत भाषा व तेलगू लिपींत आहे.]